# प्राचीन
# भारतीय शिक्षणपद्धति

लेखक

अनन्त सदाशिव अळतेकर, एम्.ए., एल्एल्.बी., डी. लिट्.
ाचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयाचे
'मणीन्द्रचन्द्र नंदी' अध्यापक,
हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस.

सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड

[ शके १८५७ ] नागपूर [ सन १९३५

मुद्रकः—पांडुरंग नारायण वनहट्टी, बी. एस्सी.,
व्यवस्थापक, नारायण मुद्रणालय, सितावर्डी, नागपूर.

प्रकाशकः—वेंकटेश शामराव बळकुंदी, बी. ए., एल्एल्. बी.
मॅनेजिंग डायरेक्टर सुविचार प्रकाशन मंडळ, लि०,
धनतोली, नागपूर.

# प्रस्तावना

वैदिक काळापासून ते सुमारें इ. स. १२०० पर्यंतच्या भारतीय शिक्षण पद्धतीच्या स्वरूपाचें विवेचन या पुस्तकांत करण्यांत आलें आहे. बौद्ध, जैन व हिंदु धर्म व संस्कृति या एकाच वृक्षाच्या शाखा असल्यामुळें प्रस्तुत पुस्तकांत बौद्धादि धर्मग्रंथांतून मिळणाऱ्या माहितीचाही उपयोग करण्यांत आलेला आहे. प्राचीन इतिहासाचा काल मुसलमानी अंमल प्रस्थापन होण्याच्या वेळीं संपतो, असा सामान्यतः इतिहासज्ञांचा संकेत असल्यामुळें या विषयाचा इतिहास तेराव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत नेण्यांत आला आहे. तदुत्तरकालीन पुराव्याचा कांही ठिकाणीं विषयपूर्तीकरितां उपयोग केलेला आहे.

दोषैकदृष्टि किंवा गुणैकदृष्टि न ठेवतां प्रस्तुत पुस्तकामध्यें प्राचीन शिक्षणपद्धतीचें यथार्थ स्वरूपाविष्करण करण्याचा प्रयत्न केला आहे. पुस्तक वाचून आपल्या शिक्षणपद्धतींत जे अनेक गुण होते, त्यांची वाचकांना योग्य कल्पना यावी, व जे थोडे खरोखरीचे, किंवा आपण आधुनिक दृष्टीने पाहतो म्हणून दिसणारे, दोष होते, ते का उत्पन्न झाले हें कळावें असा लेखकाचा हेतु आहे. प्राचीन राज्यघटना, समाजशास्त्र वगैरे विषयांवर जीं बरींच पुस्तकें अलीकडे प्रसिद्ध होत आहेत, त्यांमधील विवेचन स्मृत्यादि ग्रंथांत जे नियम किंवा विधानें आढळतात, त्यांच्या आधारेंच बरेंचसें केलेलें आढळतें. प्रस्तुत पुस्तकामध्यें शिक्षणविषयक निरनिराळ्या बाबींबद्दल शास्त्रकारांचें मत किंवा त्यांनी सांगितलेले नियम काय आहेत एवढ्याचाच विचार न करतां, प्रस्तुत नियम प्रत्यक्ष आच-

रणामध्यें किती येत, याचीही छाननी निःसंशय ऐतिहासिक पुराव्याच्या आधारें करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. निरनिराळया कालखंडांत काय काय फरक पडत गेले, याचीही वाचकांना योग्य कल्पना येईल अशी खबरदारी घेण्यांत आली आहे. निवळ ऐतिहासिक पुरावा दुर्दैवाने जितका मिळावा तितका मिळत नाही, व त्यामुळें इतिहासलेखकाचें काम फार कठिण होतें. तक्षशिलेमध्यें इ. स. पू. सातव्या शतकांत गरीब विद्यार्थ्यांच्या करितां रात्रीचे वर्ग अध्यापक चालवीत हें खरें असलें, तरी ती प्रथा इ. स. च्या बाराव्या शतकांत मदुरेंत सुरू असेलच असें नाही हें खरें; तथापि भरतखंडांत आर्य संस्कृति सामान्यतः इतकी एकजिनसी आहे की, शिक्षणपद्धतीच्या बाबतींत तरी निरनिराळ्या शतकांतील व प्रांतांतील निवळ ऐतिहासिक पुरावा एकत्र करून त्याचा जर धर्मग्रंथांतील नियमांशीं समन्वय केला, तर त्यापासून एकंदर भारतीय शिक्षणपद्धतीचें बरेंच विश्वसनीय चित्र निघूं शकेल, असें प्रस्तुत लेखकास वाटतें.

पुस्तकांत मांडलेली विचारसरणी किंवा सिद्धांत कितपत सत्याच्या कसोटीस उतरतात, हें जिज्ञासू व अभ्यासक वाचकांना पाहतां यावें, म्हणून पुस्तकांत बहुतेक महत्त्वाच्या ठिकाणीं मूल आधारभूत वचनें किंवा त्यांचे संदर्भ टीपांमध्यें देण्यांत आले आहेत. सामान्य वाचकांच्या दृष्टीने सदरहू टीपा महत्त्वाच्या नसल्या तरी तज्ज्ञ अभ्यासकांना त्या फार उपयोगी पडतील म्हणून त्या मुद्दाम देण्यांत आल्या आहेत. पुस्तक सामान्य वाचकांस आवडावें, तज्ज्ञांनाही संकलनात्मक बिलकुल वाटूं नये, अशा धोरणाने लिहिलें आहे. तें कितपत साध्य झालें आहे तें ठरविणें अधिकारी लोकांवर सोपवितों.

माझे स्नेही व नवभारत ग्रंथमालेचे विद्वान् संपादक प्रो. बनहट्टी यांना हें पुस्तक लिहिलें गेल्याबद्दलचें बरेंच श्रेय देणें जरूर आहे. त्यांनी जर फिरफिरून विनंती केली नसती, तर मी तें लिहिण्याचें कधी सुरू केलें असतें की नाही, याची मला शंका वाटते. मातृभाषेची सेवा करण्यास त्यांनी जी मला संधि दिली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

बनारस हिंदु युनिव्हर्सिटी
वर्षप्रतिपदा शके १८५७

अ. स. अळतेकर

# अनुक्रमणिका

| प्रकरण | | | पृष्ठ |
|---|---|---|---|
| १. | शिक्षणविषयक संस्कार | ... | १ |
| २. | गुरु व शिष्य | ... | ३१ |
| ३. | विद्यार्थिदशा व तीतील जीवनक्रम | ... | ४७ |
| ४. | शिक्षणक्रम, शिक्षणपद्धति व परीक्षा | ... | ६५ |
| ५. | धंदेशिक्षण | ... | ८७ |
| ६. | प्राथमिक शिक्षण | ... | ११२ |
| ७. | स्त्रीशिक्षण | ... | १२२ |
| ८. | शिक्षणकेन्द्रें व शिक्षणसंस्था | ... | १३६ |
| ९ | शिक्षणकार्य व समाज आणि राजसत्ता | ... | १६५ |
| १०. | ध्येय व गुणदोषविवेचन | ... | १७९ |
| | संदर्भ ग्रंथांची यादी | ... | २०२ |
| | संक्षेपसंकेतांचा खुलासा | ... | २०४ |
| | सूची | ... | २०५ |

# प्राचीन
# भारतीय शिक्षण-पद्धति



## प्रकरण पहिलें

## शिक्षणविषयक संस्कार

मनुष्याच्या वैयक्तिक व सामाजिक आयुष्यक्रमावर हिंदु समाजामध्यें धर्माचा पगडा बराच बसला आहे. नवीन जन्मलेल्या मुलाचें नामकरण करावयाचें असो अगर त्यास प्रथम अन्न खावयास द्यावयाचें असो, घर बांधावयाचें असो अगर राज्याभिषेक व्हावयाचा असो, आपल्या हिंदुधर्माचें अस्तित्व व व्यापकता आपणास त्या ठिकाणी आढळून आल्याशिवाय राहत नाही. या व अशाच प्रकारच्या बाबी या व्यावहारिक स्वरूपाच्या असून इतर धर्म त्याकडे फारसें लक्ष देत नाहीत. पण मनुष्यप्राणी हा परमेश्वरास कसा चटकन विसरतो हें हिंदुधर्मप्रवर्तकांस पूर्णपणें माहीत असल्यामुळें त्याला परमेश्वराची आठवण वारंवार व्हावी व त्याचें स्मरण त्याने शक्य तितक्या जास्त वेळ कृतज्ञतापूर्वक करावें या हेतूस्तव त्यांनी वर उल्लेखिलेल्यासारख्या सामाजिक बाबींनाही धार्मिक स्वरूप दिलें आहे. मुलास जन्मानंतर प्रथम घराबाहेर नेणें, अगर त्यास शिक्षण द्यावयास आरंभ करणें, या बाबी वास्तविक सर्वस्वीं सामाजिक स्वरूपाच्याच आहेत. पण अशा प्रसंगीं प्रेमळ मातापितरांस जो आनंद होतो त्यास धार्मिक स्वरूप

दिलें तर तीं त्या प्रसंगीं परमेश्वराचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करून त्यास दुवा देतील या विचाराने आपल्या धर्मामध्यें अशा प्रसंगास धार्मिक संस्कारांचें स्वरूप दिलें आहे. या असल्या संस्कारप्रसंगीं जे आचार किंवा जे मंत्र सांगितले आहेत त्यांवरून त्या प्रसंगांचें महत्त्व आपणास सुलभ तऱ्हेनें समजून येतें. म्हणून या पहिल्या प्रकरणामध्यें हिंदुधर्मामध्यें जे शिक्षणविषयक संस्कार सांगितले आहेत त्यांचें स्वरूप व मर्म काय याचा आपण विचार करूं. त्या योगाने शिक्षणशास्त्रविषयक बऱ्याच कल्पना व ध्येयें यांजवर चांगलाच प्रकाश पडेल.

## विद्यारंभ संस्कार

शिक्षणविषयक संस्कारांमध्यें कालानुक्रमें विद्यारंभ किंवा अक्षरस्वीकरण हा संस्कार सर्वांत आद्य होय. पांचव्या वर्षाच्या सुमारास ज्या वेळी प्राथमिक शिक्षणास प्रारंभ होऊन मुलें अक्षरें शिकूं लागतात त्या वेळीं हा संस्कार करावा असें शास्त्रकारांचें मत आहे. कांही अनपेक्षित अडचणींमुळें जर हा संस्कार पांचव्या वर्षी झाला नाही तर तो मुंजीच्या आधी तरी अवश्यमेव करावा असें बृहस्पतीचें मत आहे. प्राथमिक शिक्षणाच्या प्रारंभास पांचवें वर्ष हा उत्तम काल होय हे मत जें आता सर्वसंमत झालें आहे तें आपल्या शिक्षणतज्ज्ञांस पूर्वी पटलें होतें असें यावरून दिसतें. मुलांच्या शिक्षणाच्या प्रारंभीं सर्वच वर्णांनी करावयाचा हा संस्कार स्वाभाविकच अगदी साधा व सोपा आहे. उत्तरायणामध्यें शुभ मूहूर्तावर गुरूला घरीं बोलावून आणावयाचें, त्याने मुलाकडून विनायक, सरस्वती, कुलस्वामी व सूत्रकार यांचें पूजन करवावयाचें, व त्यानंतर गुरूने मुलाचा हात धरून चांदीच्या अगर सोन्याच्या लेखणीने तांदळावर त्याच्याकरवीं प्रथम अक्षरें लिहवावयाचीं, अशा प्रकारचें या संस्काराचें मुख्य स्वरूप असे. क्वचित् कांही शास्त्रकारांचें मत या प्रसंगीं होम करावा असेंही आहे. पण तें मत सर्व शास्त्रकारांना संमत नव्हतें. संस्काराच्या शेवटीं निमंत्रित शिष्टांना भोजन घालून गुरूला दक्षिणा देण्यांत येई.[१]

---

१. या परिच्छेदांत दिलेली माहिती वीरमित्रोदय, संस्कारप्रकाश, पृष्ठें ३२१ ते पुढे; स्मृतिचंद्रिका, संस्कारकाण्ड, पृष्ठें ६७ ते पुढे; याज्ञवल्क्य स्मृति १,१३ वरील अपरार्काची टीका व गोपीनाथभट्टाची संस्काररत्नमाला या ग्रंथांवरून घेतलेली आहे.

विद्यारंभ संस्कार व्यक्तीच्या आयुष्यांत पहिला असला तरी तो ऐतिहासिक दृष्टया उपनयनाप्रमाणें प्राचीन नाही. त्याचें वर्णन ज्या ग्रंथांमध्यें आढळतें ते सर्व फार अर्वाचीन म्हणजे गेल्या ८०० – ९०० वर्षांतीलच आहेत. संस्कारांचे सांगोपांग विवेचन ज्या गृह्यसूत्र ग्रंथांत आढळतें त्यांमध्यें या संस्काराचा मागमूसही नाही. गृह्यसूत्र ग्रंथांमध्यें सामान्यत: ४० संस्कार सांगितलेले आढळून येतात, त्यांमध्यें गृहनिष्क्रमण किंवा अन्नप्राशन यांसारखे क्षुल्लक प्रसंगसुद्धा संस्काराच्या पवित्र भावनेने उदात्त केलेले आढळतात; पण विद्यारंभासारख्या व्यक्तीच्या अगर समाजाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगाचा मात्र आवश्यक संस्कारांमध्यें अतर्भाव केलेला आढळून येत नाही. असें का झालें याचें गूढ उकलणें फारसें अवघड नाही. गृह्यसूत्रकाल हा जरी सुमारें इ. स. पूर्व ७०० ते २०० हा असला, तरी त्या गृह्यसूत्र ग्रंथांत ग्रथित केलेले संस्कार त्यापेक्षा फार प्राचीन कालापासून चालत आलेले आहेत. निदानपक्षी उपनयन संस्काराच्या बाबतींत तरी ही गोष्ट अक्षरशः सत्य आहे, हें त्या संस्काराचें जें वर्णन अथर्ववेदांत आढळतें त्यावरून दिसून येतें. उपनयनसंस्कार समाजांत फार प्राचीन कालापासून रूढ असल्यामुळें प्रथमत: विद्यारंभाकरितां निराळा संस्कार सांगण्याची गरज भासली नाही. 'द्वितीयजन्मन: पूर्वमारभेताक्षरान् सुधी: ।' या बृहस्पतीच्या वचनावरून जरी अक्षरस्वीकरण किंवा विद्यारंभ संस्कार उपनयनाहून भिन्न होता असें दिसलें, तरी वैदिक कालामध्यें असे दोन भिन्न संस्कार रूढ नव्हते. यास कारण म्हणजे त्या वेळीं अक्षराचें अस्तित्वच लोकांना माहीत नव्हतें. हिंदुलोकांना लिपि केव्हा अवगत झाली ह्या प्रश्नाचा सांगोपांग विचार करणें येथे शक्य नाही; ब्राह्मणकालामध्यें लिपीचें ज्ञान हिंदूंना होतें याबद्दल पुष्कळच सांस्कृतिक व आनुमानिक पुरावा आढळतो,[१] पण ऋग्वेदकालीं लेखनकला अवगत होती याबद्दल अद्याप पुरावा मिळत नाही.[२]

---

१. ओझा : प्राचीन लिपिमाला, पृष्ठ १–१६.

२. सिंधमध्यें अज्ञात लिपींमध्ये वर कांहीं तरी लिहिलेल्या मुद्रा सापडल्या आहेत, पण त्या आर्यांच्या आहेत याबद्दल अद्याप पुरावा नाही. वैदिक आर्यांचे शत्रु जे दस्यू त्यांच्या त्या असाव्यात. कदाचित् त्यांच्यापासून आर्यांनी लिपि घेतली असावी.

अतिप्राचीन वैदिक कालामध्ये लेखनकलाच माहीत नव्हती; तेव्हा साह-जिकच त्या वेळी धुळाक्षरें शिकण्याच्या वेळचा, उपनयनाहून निराळा असा, संस्कार समाजामध्यें रूढ झाला नाही. शिक्षणास प्रारंभ उपनयनाच्या वेळींच होई. मंत्रांची भाषा तीच सामान्य जनभाषा होती; व्याकरण-शास्त्राचा अद्याप मागमूसही नव्हता, लेखनकलाही अजून प्रचारांत याव-याची होती. अशा वेळी स्वाभाविकपणें प्राथमिक शिक्षणाचा प्रारंभ लेखनवाचनाने होण्याचे ऐवजी वैदिक मंत्र पाठ करण्यास सुरुवात करण्यानेच होई. वैदिक वाङमय हें आर्यांना फारच पूज्य वाटत असे, म्हणून तें शिकण्यास प्रारंभ करण्याच्या वेळीं उपनयन हा धार्मिक संस्कार सांगितलेला होता. त्याव्यतिरिक्त अर्वाचीन विद्यारंभसंस्कारा-सारख्या संस्काराची जरूरी स्वाभाविकच त्या वेळी लोकांस भासली नाही.

कांही कालाने लिपि प्रचारांत आली व पुढे मंत्रभाषा व व्यावहारिक बोली यांमध्यें फरक पडूं लागला; त्यामुळें व्याकरणशास्त्र जन्मास आलें. परिणामतः वैदिक मंत्र पाठ करण्यास सुरुवात करण्याच्या पूर्वी थोडेंसें प्राथमिक शिक्षण देण्याची जरूरी भासूं लागली. ही जरूरी जेव्हा भासूं लागली तेव्हा विद्यारंभासारखा एक निराळा संस्कार असावा असें समाजास वाटूं लागलें. जुन्यास नवें वळण द्यावयाचें किंवा आहे त्यांतच भागवावयाचें अशी हिंदूंची एक फार प्राचीन प्रवृत्ति आहे. तिला अनुसरून चौल म्हणजे शेंडी राखण्याच्या संस्काराच्या वेळींच अक्षर-स्वीकरण संस्कार उरकून घेण्याची प्रथा प्रथम समाजांत पडली. 'वृत्तचौलकर्मा लिपिं संख्यानं चोपयुंजीत।' (अर्थशास्त्र १,२), 'निवृत्तचौ-लकर्मणोश्च तयोस्त्रयीवर्जमितरास्तिस्रो विद्याः सावधानेन मनसा परि-निष्ठापिताः।' (उत्तररामचरित, अंक २.) इत्यादि पुराव्यांवरून वरील विधानास पुष्टि मिळते. चौलकर्माची व विद्यारंभ संस्काराची अशी सांगड कां घालण्यांत आली हें कोडें सोडविणेंही फारसें कठीण नाही. चौलकर्म पांचव्या वर्षाच्या सुमारास करीत; तेव्हा तो काल अक्षरारंभास योग्यच होता. चौलकर्माच्या वेळीं शेंड्या व जावळें किती राखावयाचीं हें त्या त्या घराण्याच्या गोत्रावर व प्रवरसंख्येवर अवलंबून असे, असें 'यथर्षि शिखां निदधाति।' (आश्व. गृ. सू. १६.६); 'दक्षिणतः कपर्दो वसिष्ठानामुभयतो

भार्गवकाश्यपानां पंचचूडा अंगिरसाम् ।' (वाराह गृ. सू. ४) इत्यादि वचनांवरून दिसून येतें. गोत्रऋषि व प्रवरऋषि यांचा त्या घराण्याच्या विद्वत्तापरंपरेशीं बराच निकट संबंध होता अगर आहे असें मानलें जात असे. तेव्हा विद्यारंभ संस्काराची उणीव प्रथम प्रथम चौलकर्माच्या वेळींच तो संस्कार उरकून भरून काढण्यांत येऊं लागली. पुढे कांही शतकांनी विद्यारंभाकरितां पृथक् संस्कारच असणें इष्ट होय असें मत बळावूं लागलें व त्याकरितां वर वर्णन केलेला संस्कार प्रचारांत आला. ही गोष्ट बऱ्याच उशीरां झाली म्हणून हा सस्कार गृह्यसूत्रादि प्राचीन ग्रंथांत सांपडत नाही; तो अर्वाचीन धर्मनिबंधांतच आढळतो. जरुरीप्रमाणें आपल्या धर्मांत संस्कार कसे कमी जास्ती होत असत याचें विद्यारंभ संस्कार हे एक मनोरंजक व बोधप्रद उदाहरण आहे.

## उपनयन

मागे सांगितल्याप्रमाणें उपनयन हा संस्कार फार प्राचीन आहे. ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं (१०. १०९. ५) ब्रह्मचाऱ्याचा उल्लेख आढळतो व अथर्ववेदाच्या दोन सूक्तांमध्यें (६. १३८; ११. ५) ब्रह्मचारी, त्याचें कर्तव्य व आयुष्यक्रम आणि ब्रह्मचर्याचें महत्त्व, या विषयांबद्दल चर्चा आढळते. यावरून असें दिसून येतें की अथर्ववेदकाळीं ब्रह्मचर्याचें महत्त्व समाजास चांगलें पटलें होतें. ब्रह्मचर्य म्हणजे पवित्र आचरण ठेवून एकाग्र मनाने जिवापाड परिश्रम करून विद्यासंपादन करण्याचा काल, अशी त्यावेळींही लोकांची कल्पना होती. राजास जर राजकारणांत यश यावें अशी इच्छा असेल, कुमारीला जर योग्य पति आपल्याला मिळावा असें वाटत असेल, तर ब्रह्मचर्याचें योग्य प्रकारें पालन करणें हाच एक योग्य उपाय होय, अशी अथर्ववेदकालीं दृढ समजूत होती (११. ५. १७–१८). इन्द्राचें देवांमधील प्रमुखपणही त्याच्या ब्रह्मचर्याचेंच फल होय (११. ५. १९), व सृष्टींतील नानाविध स्वाभाविक घडामोडी ब्रह्मचर्याच्याच अदृश्य फलापासून होतात, अशाही कल्पना अथर्ववेदांत आढळतात (११. ५. १).

स्मृतिकालाप्रमाणें वेदकालामध्येंही ब्रह्मचारी हा 'मुंज' गवताची मेखला घालून कृष्णाजिन पांघरीत असे, शिरोभागीं प्रायः जटाभार

धारण करी व दररोज अग्नीमध्यें समिधांचें हवन करी. भिक्षाचरणावर राहण्याची प्रथाही त्यावेळीं समाजांत रूढ होती. शतपथ ब्राह्मणामध्यें उपनयन संस्काराचें सविस्तर वर्णन आढळतें (११. ५. ४); व गोपथ ब्राह्मणामध्ये ब्रह्मचर्याचें विवेचन करितांना, निरनिराळे नियम कां पाळावेत याबद्दल मनोरंजक व उद्बोधक कारणें दिलेली आढळतात (१. २. १–८).

असो; वरील विवेचनावरून उपनयनाची चाल फार जुनी आहे हें दिसून येईल. उपनयनाचें मूळ स्वरूप हल्ली जवळ जवळ पूर्णपणें विसरून गेले असल्यामुळें व ह्या संस्कारांत यज्ञोपवीत ऊर्फ जानवे घालतात म्हणून, त्या संस्कारास उत्तर हिंदुस्थानामध्यें 'जनुआ,' व इंग्रजीमध्यें Thread Ceremony, असें म्हणतात; ह्या संस्कारांत 'मुंज' नांवाच्या गवताची मेखला कंबरेला बांधतात म्हणून त्या समारंभास मराठींत 'मुंज' म्हणतात. पण वास्तविक या तीन्हीपैकी एकाही शब्दावरून उपनयनाचें मूळ स्वरूप कळून येणें शक्य नाही. 'गुरोर्व्रतानां वेदस्य यमस्य नियमस्य च। देवतानां समीपं वा येनासौ नीयते द्विजः। तदुपानयनं प्रोक्तम्।' असें जें एक स्मृतिवचन वीरमित्रोदयांत उद्धृत केलेलें आढळतें, (संस्कारप्रकाश, पृ. ३३४) त्यावरून उत्तरस्मृतिकालामध्ये उपनयन आर्यधर्माच्या व संस्कृतीच्या निरनिराळ्या स्वरूपांशीं कसें संबद्ध झालें होतें हें आपणांस यथार्थपणें समजतें. हें जरी खरें असलें, तरी त्यावरून फार प्राचीन काला पासून उपनयनाशीं या सर्व कल्पना निगडित होत्या हें मानणें योग्य होणा नाही. प्रथमतः गुरूजवळ ( उप ) शिष्यास नेण्याच्या ( नयन ) वेळेच संस्कार म्हणजे उपनयन, अशीच कल्पना समाजांत रूढ होती. अर्था जर एखादा विद्यार्थी एक गुरु सोडून दुसऱ्या गुरूकडे अध्यय नास गेला तर त्यावेळीही हा संस्कार पुन्हा करावा हें क्रमप्राप्तच होतें व अशा तऱ्हेची पूर्वी चाल होती असेंही उपनिषदांवरून आढळ् येतें. बृहदारण्यक उपनिषदामध्यें गृहस्थाश्रमी वयस्क विद्यार्थ्यांचें दुसऱ्या नवीन गुरूकडे जाण्याचे वेळीं पुन्हा एकदा उपनयन केलेलें आ ळतें (६. २. ४); अश्वपतिराजाकडे ज्या वेळीं ब्रह्मजिज्ञासु गृहस्थाश्र ब्राह्मण वेदान्त शिकण्यास येतात त्या वेळीं त्या राजाने त्यांचें उपन न करतांच त्यांना ('अनुपनीयैव तान्') ब्रह्मविद्या शिकविली

छांदोग्योपनिषदावरून दिसून येतें (५. ११. ७). या ठिकाणीं योजलेल्या 'अनुपनीयैव तान्' या शब्दांवरून सामान्यत: अशा वेळीं उपनयन होत असे, अश्वपतिराजाने सामान्य नियमास अपवाद करूनच या प्रसंगी उपनयनास फाटा दिला होता, हें उघड दिसतें. निराळ्या गुरुकडे अध्ययनास जाण्याच्या वेळींच नव्हे तर निराळा वेद अगर निराळें शास्त्र शिकण्याच्या वेळींही पुन्हा उपनयन करावें, अशा तऱ्हेची कांही शास्त्रकारांचीं वचनें वीरमित्रोदयामध्यें उद्धृत केलेली आढळतात (संस्कारप्रकाश पृ. ३३७, ५४३). पण हें मत एकंदरीत बहुजनसमाजास पटलें नाही असे दिसतें.

असो; उपनयन संस्कार विद्यार्थिदशेंत ज्या अर्थी अनेकदा करण्याचाही वारंवार प्रसंग येई, त्या अर्थी तो संस्कार अगदी सोपा व सुटसुटीतच असला पाहिजे. फार प्राचीन काळी बापच मुलाला प्राय: वेद शिकवीत असे, त्या वेळीं तर हा संस्कार पंचमहायज्ञासारखा घरांतच, गाजावाजा न होतां, केला जात असे. श्वेतकेतूस वेदविद्या त्याच्या पित्यानेच शिकविली (छांदोग्योपनिषद् ५. ३), देव, मनुष्य व असुर हे आपला पिता जो प्रजापति त्याच्यापाशींच ब्रह्मचर्यव्रत आचरण करीत होते (बृहदारण्यकोपनिषद् ५. २. १), या उदाहरणांवरून उच्च व सुसंस्कृत कुटुंबांत प्राय: घरीच वेदादि विद्या मुलांना शिकवीत, असेंच दिसून येईल.[१] उपनयन हा एक घरगुती संस्कार असल्यामुळे तो अगदी साधाच असे. हातामध्यें एक समिधा घेऊन मुलगा आला म्हणजे त्यास ब्रह्मचर्य व्रत पाळावयाचें आहे असें गुरु समजत असे; व लगेच त्याच्याकडून त्या समिधेचें आपल्या होमांत हवन करवून त्यास वेद शिकविण्यास प्रारंभ करी (छां. उप ४. ५. ५; ५. ११. ५; मुंडक १. २. १२). अग्नीमध्यें होमहवन करणें हें एक ब्रह्मचाऱ्याचें महत्त्वाचें कर्तव्य असे. हातामध्यें समिधा घेऊन येण्याने आपण तें योग्य प्रकारें बजावण्यास राजी आहों असें विद्यार्थी आश्वासन देई. 'वाचा ह स्मैव

---

१. सतराव्या शतकामधील वीरमित्रोदयामध्येंही, उपनयामध्यें पिताच गुरु असणें हा उत्तम पक्ष, त्याच्या अभावीं इतर गुरूकडे जाणें हा गौण पक्ष, असें मत प्रतिपादिलेलें आढळतें. पृ. ३३७.

पूर्वमुपयंति ।' या बृहदारण्यकोपनिषदांतील वचनावरून तर एके काळीं शिष्याने शिकण्याची इच्छा व गुरूने शिकण्याची तयारी तोंडीच दर्शविली तरीही तेवढ्यानेच उपनयन समाप्त होई व मग लगेच शिक्षणास प्रारंभ होई, असें दिसून येतें.

उपनयन हा संस्कार वेदाभ्यासाच्या प्रारंभींच करण्याचा असल्या-मुळें अनेक शतकांपर्यंत सर्व त्रैवर्णिकांना तो हल्लीसारखा नितान्त आव-श्यक संस्कार मानला जात नसे. जे वेदाध्ययन करीत तेच उपनयन करीत, जे वेदाध्ययनास नालायक असत त्यांना हा संस्कार करून देत नसत, असें ' अशूद्राणामदुष्टकर्मणामुपनयनम् ' या आपस्तंबाच्या वचनावरून स्पष्ट दिसून येतें (आ. गृ. सू. १. १. ५). 'विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम गोपाय मां शेवधिष्टेऽहमस्मि। असूयकायानृजवेऽयताय न मा ब्रूया वीर्यवती तथा स्याम् ॥ '(निरुक्त, २. ४. १) या वचनावरूनही तोच ध्वनि निघतो. जसें आजकाल प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होऊन ज्यांनी आपली विश्वविद्याल-यीन शिक्षण घेण्याची योग्यता सिद्ध केली आहे त्यांसच कॉलेजमध्यें घेतात, तसेंच पूर्वीही आर्य संस्कृतीचा गाभा जें वैदिक वाङमय त्याच्या अध्ययनास सद्वर्तनी व बुद्धिमान् मुलांनाच परवानगी मिळे. अर्थातच उपनयन हा सर्वांना अत्यावश्यक असा संस्कार मानला जात नसे. ' वत्स श्वेतकेतो वस ब्रम्हचर्यम् न हि अस्मत्कुलीनो ब्रह्मबन्धुरिव भवति ।' (छां. उ. ६. २. १) या वचनावरूनही विद्वत्तेबद्दल नांवाजलेल्या ब्राह्मण घराण्यांमध्येंच प्राचीन काळीं उपनयन रूढ होतें, असें दिसून येईल. पुढे कांही कालाने मात्र उपनयन सर्व ब्राह्मण समाजांत रूढ झालें व मग त्याचा त्रैवर्णिकांत प्रसार झाला. वर्णाश्रमधर्माप्रमाणें उपनयन हें सर्व त्रैवर्णिकांना अत्यावश्यक आहे हें खरें, पण वैदिक कालीं हल्लीची आश्रमव्यवस्था शिष्टसंमत नव्हती हें आपणांस विसरतां यावयाचें नाही. उपनयनानें मनुष्य 'द्विज' होतो ही कल्पना अथर्ववेदामध्येंही आढळते खरी (२२.५.३), पण तेवढ्यावरून उपनयन हें त्या वेळीं सर्वांस आव-श्यक होतें हें सिद्ध होत नाही. 'अजातो ह वै तावत्पुरुषो यावन्न यजते।' (श.प.ब्रा. २. ३.४); 'यस्य पिता पितामहो वा सोमं न पिबेत्स व्रात्यः।' इत्यादि श्रुतिवचनांवरून वेदकालीं वैदिक दीक्षेला सुद्धा द्वितीय जन्म

मानीत व ती न घेणाऱ्यास म्हणजे यज्ञ न करणाऱ्यास व्रात्य असें संबोधीत, हें दिसून येईल.[१] मनु (२,३९), याज्ञवल्क्य (१,३७-३८) इत्यादि स्मृतींमध्यें, उपनयन न करणाऱ्यास 'व्रात्य' ही अपमानास्पद संज्ञा दिली आहे; पण वैदिक कालीं ही संज्ञा फक्त यज्ञ न करणाराला लावीत. उपनयन न करणाऱ्यास व्रात्य म्हणत असल्याचा पुरावा सापडत नाही.

प्रथम प्रथम उपनयन हा अत्यन्त आवश्यक संस्कार नव्हता; उपनयनामुळें वैदिक वाङ्मयाच्या पवित्र पुस्तकालयामध्यें प्रवेश करण्याची मुभा मिळत असल्यामुळें तो संस्कार योग्य मनुष्यांच्या बावतींतच करीत, इतरांचा तो होत नसे, हें वरील विवेचनावरून दिसून येईल. पुढे वैदिक वाङ्मय जसजसें अधिकाधिक वाढूं लागलें तसतसें समाजामधील शक्य तितक्या जास्त मनुष्यांच्या मदतीशिवाय तें जतन करून ठेवणें शक्य नाही हें समाजधुरीणांना कळून येऊं लागलें.[२] सद्वर्तनी लोकांनीच वेदाभ्यास करावा हें चांगलें, व वेदद्वेष्टया लोकांच्या हातीं वेद जाणें म्हणजे मोठीच आपत्ति होय, हें सर्वांनाच मान्य होतें; पण संस्काराच्या प्रभावानें, व ब्रह्मचर्याश्रमांतील पवित्र वातावरणामुळें, अनिष्ट प्रवृत्तीचे लोकही सद्वर्तनी होण्याचा पुष्कळच संभव होता. सर्व त्रैवर्णिक समाजाचें सहकार्य जरूर तर सक्तीनें मिळविल्याशिवाय दिवसेंदिवस वाढून अफाट बनलेलें वैदिक वाङ्मय कालाच्या तावडींतून बचावणें शक्य नाही, हें धडधडीत दिसूं लागल्यामुळें समाजधुरीणांनी उपनयन हा नितांत आवश्यक संस्कार करावा असें ठरविलें. यामुळेंच उत्तरकालीन स्मृतीमध्यें ज्याचें उपनयन योग्य कालीं झालें नसेल तो व्रात्य, त्याशीं कोणीही कसलाही व्यवहार करूं नये, अशा तऱ्हेचीं वचनें आढळतात. उपनयनानेच मनुष्यास खरें 'द्विजत्व' प्राप्त होतें, तें न केलें तर त्यास विवाहादि संस्कार करण्यास बिलकुल अधिकार नाही, अशा तऱ्हेची विचारसरणीही उपनयन संस्कार

---

१ हें श्रुतिवचन पराशर माधव, पुस्तक १ भाग १ पृ. १६५ मध्यें माधवाचार्यांनीं उध्दृत केलेलें आढळतें.

२ वेद लिहून ठेवणें हें एक मोठें पाप मानलें जात असल्यामुळें पिढ्यानपिढ्या ते मुखोद्गत करणें हाच एक उपाय वेद जतन करण्यास राहिला होता.

अत्यावश्यक मानला जावा याकरितांच अंगीकारण्यांत येऊं लागली. उपनयन हा शिक्षणविषयक संस्कार मानला गेला तर वैदिक वाङमयाचा अभ्यास करणारेच तो करतील, इतर करणार नाहीत, म्हणून 'उपनयन हा शारीरिक संस्कार आहे,' असें मत प्रतिपादण्यांत येऊं लागलें. हेतु हा की शारीरिक संस्कार ठरल्यावर उपनयन हें सर्व त्रैवर्णिकांस, ते देहधारी आहेत या एका कारणामुळेंच, अत्यंतावश्यक होईल; व त्यामुळें वैदिक वाङमय जतन करण्याच्या कार्यामध्यें सर्व समाजाची मदत सुलभतेने प्राप्त होईल.

उपनयन हा शारीरिक संस्कार ठरल्यामुळें वरील उच्च हेतु साध्य झाला यांत बिलकुल संशय नाही. पण त्यामुळें एक चमत्कारिक परिस्थितीही उत्पन्न झाली. उपनयनसंस्कार न करणारे ते 'व्रात्य' असें ठरल्यावर मूक, बधिर व अंध, अशा लोकांच्या बाबतींतही तो संस्कार करण्याची आवश्यकता क्रमप्राप्तच झाली. उपनयन हा जर एक शारीरिक संस्कार असेल तर तो वरील विकलांग लोकांच्या बाबतींतही करणें जरूर ठरणारच. पण उपनयन हा मूळचा वैदिक शिक्षणाच्या प्रारंभाचा संस्कार आहे हेंही स्मृतिकार विसरले नव्हते, व मूक व बधिर बटूकडून वेदाध्ययन करविणें हें सर्वस्वीं अशक्य आहे हें त्यांना उघड दिसत होतें. अशांचें उपनयन करूं नये म्हणावें, तर उपनयन हा शारीरिक संस्कार मानण्यांत येऊं लागल्यामुळें ते लोक 'व्रात्य' राहून त्यांचे विवाहादि संस्कार होणें अशक्य होणार होतें. बरें, उपनयन हें त्यांनाही आवश्यक आहे म्हणावें, तर उपनयनाच्या वेळीं मूकबधिर विद्यार्थ्यांना किमानपक्षीं गायत्री मंत्र तरी कसा शिकवावयाचा, हा प्रश्न दत्त म्हणून उभा राहत होता. शंख–लिखित ऋषींचें मत मूकबधिरांचें उपनयन करूं नये असें होतें. इतर कांही शास्त्रकारांचें म्हणणें त्यांच्या अगदी उलट होतें; उपनयनामध्यें शिष्याने उच्चारावयाचे मंत्र गुरूने त्याच्या वतीने म्हणावे म्हणजे झालें. अशी शक्कल त्यांनी सुचविली आहे. ही शक्कल सुज्ञांच्या बुद्धीस पटण्याजोगी नाही; पण मूकबधिरांच्या विवाहास अडचण पडूं नये, व वाचेनें शक्य नसलें तरी खुणांनी वैदिक संस्कृतीचें महत्त्व अशा लोकांनाही समाजाने थोडेंबहुत पटवून देण्याचा प्रयत्न करावा, या

कारणास्तव मूकबधिरांचेंही उपनयन कांही निबंधकारांनी इष्ट मानलें असावें, असें वाटतें.[१]

उपनयन हा शिक्षणविषयक एक संस्कार मानला जाण्याऐवजी शारीरिक संस्कार मानण्यांत येऊं लागल्यामुळें आणखी एक चमत्कारिक परिणाम घडून आला. पूर्वीच्या काळीं दुसऱ्या नव्या गुरूकडे जाण्याच्या वेळी दुसरें उपनयन करावें असा रिवाज होता. उत्तरकालीन स्मृतीमध्यें, लसूण किंवा कांदा खाल्ला, किंवा मद्यप्राशन केलें, किंवा कुत्रा चावला, तर पुन्हा उपनयन करावें, अशी आज्ञा दिलेली आढळते. सकृद्दर्शनी हें आपणांस चमत्कारिक दिसतें, पण थोडा विचार केल्यास तें तर्कशुद्ध आहे अशी खात्री पटते. उपनयन हा शारीरिक संस्कार; अभक्ष्यभक्षणाने किंवा अपेयपानाने शरीर दूषित होणार; उपनयन हें शरीरशुद्धिकारक कर्म; तेव्हा एखाद्या कारणाने शरीर दूषित झाल्यास पुन्हा उपनयन करणें हा क्रमप्राप्तच उपाय ठरतो. म्हणून उत्तरकालीन स्मृतिकारांनी वरील प्रसंगीं उपनयन पुन्हा करावें अशी तर्कशुद्ध आज्ञा केलेली आहे.

मध्ययुगामध्यें उपनयन संस्काराने मनुष्यशरीरासच नव्हे, तर मनुष्येतरांसही पावित्र्य प्राप्त होतें अशी भावना समाजामध्यें रूढ होऊं लागली. म्हैसूर संस्थानांतील मळवल्ली तालुक्यामध्यें इ. स. १३५८ मध्यें कोरलेल्या एका शिलालेखावरून असें दिसून येतें की, त्या वेळी एका ब्राह्मणाने एका देवस्थानास एक बाग दान केली; तिच्या चारी कोपऱ्यांस चार पिंपळाचीं झाडें लावली, व त्या झाडांचे उपनयन समारंभ थाटाने उरकून टाकले. पिंपळ हा पवित्र वृक्ष हें खरें, पण उपनयना-सारख्या पावन संस्काराने त्याचें पावित्र्य कां वाढवूं नये, अशा विचार-सरणीने वरील विप्र महाशयांनी पिंपळाच्या मुंजी केल्या हें उघड आहे.

उपनयन हा एक अत्यंत आवश्यक व पावित्र्यवर्धक शारीरिक संस्कार मानल्यामुळें मूकबधिरांचें उपनयन, अश्वत्थवृक्षाचें उपनयन, यासारख्या कांही चमत्कारिक रूढी व विक्षिप्त प्रकार सुरू झाले हें खरें; तथापि त्यामुळें समाजाचा जो एकंदरींत फायदा झाला त्याकडे

---

१ वीरमित्रोदय सं. प्र., पृ. ४०६, ५४५–७ यामधे मूकबधिरांच्या उपनयना-बद्दलचें विवेचन व शास्त्रकारांचीं परस्परविरोधी मतें वाचकांस सापडतील.

दुर्लक्ष करितां यावयाचें नाही. सर्व त्रैवर्णिकांना उपनयन हें अत्यावश्यक झाल्यामुळेंच वैदिक वाङमय जतन करणें सुलभ झालें. उपनयनाच्या वेळी थोडे तरी वैदिक मंत्र सर्वांना शिकवीत असत, व ते शिकण्याची पात्रता येण्यास थोडेंबहुत प्राथमिक शिक्षणही जरूर असे. विशेषतः ज्या वेळी लोकभाषा ही वेदभाषेहून विभिन्न झाली, त्यावेळी प्रथम थोडें बहुत लेखन, वाचन व व्याकरण आल्याशिवाय वैदिकाध्ययन अशक्य होऊं लागलें. त्यामुळें सर्व त्रैवर्णिकांना उपनयनाबरोबर प्राथमिक शिक्षणही सक्तीचें झालें. साहजिकच त्या योगानें समाजामध्यें साक्षरतेचा प्रसार बराच झाला. इ. स. पू. चवथ्या शतकामध्यें त्रैवर्णिकांपैकी शेंकडा ७५ लोक तरी साक्षर होते, हें पुढे सहाव्या प्रकरणामध्यें वाचकास कळून येईल. दुर्दैवाने पुढे 'कलौ आद्यंतयोः स्थितिः' हे वचन प्रमाण मानण्यांत येऊन क्षत्रिय व वैश्य या दोन सामाजिक दृष्टया अत्यंत महत्त्वाच्या जातीचें अस्तित्वच नाकबूल करण्यांत येऊं लागलें; त्या योगाने या वर्गांचें उपनयन अशक्य होऊन त्यांच्यामध्यें साक्षरतेच्या प्रसारास आळा पडू लागला. पण वरील वचन रूढ होण्यापूर्वी उपनयन सक्तीचें करण्याने प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसारास फार मदत झाली, ही गोष्ट प्राचीन शिक्षणपद्धतीच्या इतिहासकारास नमूद करून ठेवावीच लागेल.

उपनयनाचें मूलस्वरूप, व त्यांत कालमानाने झालेले फरक, यांचें विवेचन संपल्यावर आता आपण उपनयनाच्या कालाचा थोडासा विचार करूं. मन्वादि उत्तरकालीन स्मृतींमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचें उपनयन अनुक्रमें आठव्या, अकराव्या व बाराव्या वर्षी करावें, असा विधि आढळतो. क्षत्रिय व वैश्य यांना उपनयनाचा काल ब्राह्मणांपेक्षा असा उशीरा कां सांगितला आहे, याबद्दल पुष्कळ लोकांनी बराच ऊहापोह केलेला आहे. सामान्यतः क्षत्रिय व वैश्य यांच्या वेदाध्ययनाचा काल ब्राह्मणांपेक्षा कमीच असणार हें उघड आहे. पण त्याकरितां सर्वांना आठव्या वर्षीच उपनयन करण्यास सांगून, क्षत्रिय व वैश्य यांचें समावर्तन ब्राह्मणांपेक्षा लवकर करण्यास परवानगी देणें अधिक समंजसपणाचें झालें असतें. ब्राह्मणांचें उपनयन क्षत्रियादिकांपेक्षा लवकर करण्यास

सांगण्याचा हेतु त्यांची बौद्धिक श्रेष्ठता अशा रीतीने जगाच्या निदर्शनास आणणें हाच असावा, अशा तऱ्हेचे विचार कांही ग्रंथकारांनी प्रगट केलेले आहेत.[१] पण सदरहू विचारसरणी बरीच सदोष आहे. उत्तरकालीन स्मृतींमध्यें ब्राह्मणादिकांच्या उपनयनकालासबंधी जी एकवाक्यता दिसते तिचें करण मेधातिथीच्या मनु २, ३८ वरील टीकेवरून दिसून येतें. उपनयनाच्या वेळीं सूर्याच्या प्रार्थनेचा जो सावित्री मंत्र पाठ करावयाचा असतो तो ब्राह्मण विद्यार्थ्यांच्या बाबतींत गायत्री वृत्ताचा म्हणजे दर चरणास आठ अक्षरांचा असे, क्षत्रियांच्या बाबतींत त्रिष्टुभ वृत्ताचा म्हणजे दर चरणास अकरा अक्षरांचा असे, व वैश्यांच्या बाबतींत जगती वृत्ताचा म्हणजे दर चरणास बारा अक्षरांचा असे; म्हणून त्यांचें उपनयन अनुक्रमें आठव्या, अकराव्या व बाराव्या वर्षीं करावें असें सांगितलें आहे, असें मेधातिथीचें म्हणणें आहे. वीरमित्रोदयामध्येंही याच मताचा अनुवाद आढळतो (पृ. ३४४). सारांश, उत्तरकालीन स्मृतींनी उपनयनाकरितां हीं जीं वर्षें ब्राह्मणादिकांच्या बाबतींत सांगितलीं आहेत त्यांमध्यें विशेष असा कांहीच गूढ हेतु नाही. मानवगृह्यसूत्र, गौतमधर्मसूत्र, यांसारख्या प्राचीन स्मृतिग्रंथांमध्यें कधी पांचव्या, कधी सातव्या, तर कधी नवव्या वर्षी उपनयन करावें असें सांगितलें आहे. बौधायन गृह्यसूत्रकार तर उपनयन हें आठव्या वर्षापासून सोळाव्या वर्षांपर्यंत केव्हाही करावें, तें जास्त उशीरा केलें तर जास्त बरें, असें मत प्रतिपादन करितात.[३] सारांश, आठव्या वर्षींच ब्राह्मणांचें उपनयन व्हावें असा प्राचीन ग्रंथकारांचा बिलकुल कटाक्ष नाही. उत्तरकालीन स्मृतींचाही ब्राह्मणांचें उपनयन आठव्या वर्षीं करावयास सांगण्यांत कांही विशिष्ट गूढ हेतु नव्हता, हें वरील विवेचनावरून दिसून येईल.

उपनयनाच्या कालाच्या बाबतींत कांही स्मृतिकार पांचवें तर कांही सोळावें वर्ष सांगतात, हें आपण पाहिलें आहे. आता अशा तऱ्हेचा

---

१ KEAY : *Ancient Indian Education*, l. c. 29.

२ DAS : *The Educational System of the Ancient Hindus*, p. 72.

३ अष्टमे आयुष्कामं नवमे तेजस्कामं त्रयोदशे मेधाकामं चतुर्दशे पुष्टिकामं षोडशे सर्वकामम्। बौधायन गृह्यसूत्र २, ५, ५.

मोठा विकल्प या बाबतींत का आढळतो, याचा आपण थोडासा विचार करूं. उपनयनाचें स्वरूप कसकसें बदलत गेलें हें आपण वर पाहिलेंच आहे. प्राचीन वेदकालामध्यें, ज्या वेळीं लेखनवाचनादिक हें वेदाध्ययनाच्या पूर्वी शिकण्याची जरूर नव्हती, त्यावेळीं वेदाध्ययनप्रारंभ म्हणजेच प्राथमिक-शिक्षणप्रारभ होता; अर्थातच त्यावेळीं उपनयन हें ब्राह्मण कुटुबांत अगदी लवकर म्हणजे सहाव्या वर्षीही होत असे. पण इतक्या लहान मुलांना पुष्कळदा वैदिक मंत्र स्पष्टपणें उच्चारणें शक्य नसे; म्हणून उपनयनापासून एक वर्षानें शिष्यास गायत्री मंत्र शिकविण्याची चाल कित्येक ठिकाणी होती.[१] पुढे लोकभाषा ही वेदभाषेहून भिन्न होऊं लागली, लेखनकला रूढ झाली, व्याकरण, शिक्षा, वगैरे शास्त्रांचा उदय होऊन वेदाध्ययनाच्या पूर्वी त्यांचा थोडासा अभ्यास करणें जरूर भासूं लागलें; त्यामुळे उपनयनाचा काल पुढे ढकलणें आवश्यक भासूं लागलें. उपनयन हें प्राथमिक शिक्षणाच्या प्रारंभीं न होतां दुय्यम शिक्षणाच्या प्रारंभाच्या वेळीं होऊं लागलें; व तें निरनिराळ्या परिस्थितीप्रमाणें ८ पासून १६ वर्षपर्यंत केव्हा तरी आपापल्या सोयीप्रमाणें लोक करू लागले. विद्वान् व सुसंस्कृत ब्राह्मण कुटुंबांमध्यें प्राथमिक शिक्षण लवकर संपून आठव्या वर्षाच्या सुमारास वेदाध्ययनास सुरुवात करणें शक्य होई; क्षत्रियादिकांना वेदाध्ययनाकरितां परगृहीं जावें लागे, म्हणून त्यांना थोडेंसें उशीरा म्हणजे अकराव्या बाराव्या वर्षी उपनयन करणें सोइस्कर वाटे. प्रत्येक कुटुबाची परिस्थिति वेगवेगळी असे, म्हणून प्राचीन स्मृतिकारांनी आठपासून सोळा वर्षांपर्यंत केव्हाही उपनयन करावें अशा तऱ्हेची सवलत दिलेली आढळते. इसवी सनाच्या प्रारंभाच्या वेळीं सामान्यत: ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचीं उपनयनें आठव्या, अकराव्या व बाराव्या वर्षांच्या सुमारास होत, म्हणून मन्वादि स्मृतींमध्यें ते ते काल त्यांस विहित सांगितले आहेत. पण त्याच वर्षांबद्दल त्यांचाही आग्रह नाही. मात्र सोळा वर्षांच्या पुढे उपनयन ठेऊं नये याबद्दल प्राचीन व

---

१ 'तां ह स्म एतां पुरा संवत्सरे अन्वाहुः।' श. प. ब्रा. ११. ५. ४. ५. सदरहू स्थळीं याबद्दल दिलेले कारण असमंजस म्हणून अग्राह्य आहे.

अर्वाचीन स्मृतिकारांचें ऐकमत्य दिसतें.[१] सोळा वर्षांपर्यंत ज्याने शिक्षणास प्रारंभ केलेला नाही त्यास त्यापुढे प्रारंभ करून शिक्षणांत प्रावीण्य मिळणें हें सामान्यतः कठीण आहे, हें सर्व शिक्षणशास्त्रज्ञ कबूल करतील. 'नातिषोडशवर्षमुपनयीत। प्रसृष्टवृषणो ह्येष वृषलीभूतो भवति।' या जैमिनिगृह्यसूत्रांतील वचनावरून, सोळाव्या वर्षी शिक्षणास प्रारंभ करणाऱ्या विद्यार्थ्याचें लक्ष अभ्यासापेक्षा चैन करण्याकडेच जास्त लागेल, तेव्हा त्यास इतक्या उशीरा शिकवीत बसणें फारसें फायदेशीर होणार नाही, असें प्राचीन हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांचेंही मत होतें, असें दिसून येईल.

उपनयन संस्कारांतील निरनिराळे विधि व त्यावेळीं म्हणण्यांत येणारे मंत्र, यापासून शिक्षणशास्त्रास उपयोगी अशी बरीच माहिती मिळते; म्हणून आता आपण त्यांचा विचार करूं. उपनयनाच्या प्रारंभी मातृभोजन होतें. या चालीचा उल्लेख मानवगृह्यसूत्रांतही आढळतो. भोजनानंतर वपन व मग स्नान असा पौर्वापर्वविपर्यय हिंदु धर्मकृत्यांत कधीच दिसून येत नाही. पण उपनयनामध्ये तो दिसून येण्याचें कारण शोधणें फारसें कठीण नाही. उपनयनापूर्वीचें स्वच्छन्द वृत्तीचें वागणें आता ब्रह्मचर्यामध्यें बंद व्हावयाचें, तेव्हा नवीन निर्बंध अंमलांत येण्याच्या पूर्वी एकदा शेवटच्या वेळी मुलाला आपल्या आईच्या संगात, व स्नानाच्या आधी, जेवण्याची मुभा द्यावी, असाच मातृभोजनाचा हेतु असावा.

मातृभोजनानंतर मुलाची हजामत करीत. वपनाचा विधि बऱ्याचशा हिंदु संस्कारांत शुद्धीच्या दृष्टीने सांगितलेला दिसतो. मग स्नान झाल्या-

---

१ क्षत्रियांचें उपनयन २२ व्या किंवा ३३ व्या वर्षापर्यंत व वैश्याचें २४ किंवा ३६ वर्षांपर्यंत केलें तरी चालेल, अशा तऱ्हेचीं वचनें कांही ठिकाणीं आढळतात; पण तीं केवळ ११ व १२ या आकड्यांच्या गुणाकारावर बसवलेलीं आहेत; त्यांस शिक्षणशास्त्रदृष्ट्या फारसें महत्त्व नाही. वीरमित्रोदयामध्यें जो ३६ वर्षांपर्यंतचा काल अभिमत मानला आहे त्यास कारण कदाचित् परिस्थितिही असेल. शिवाजीमहाराजांचें उपनयन अभिषेकप्रसंगीं झालें होतें; यावरून ज्या थोड्या क्षत्रिय वैश्य कुटुंबांत उपनयन होत असे त्यांत तें पुष्कळदा फार उशीरां होई असें दिसून येईल. त्यामुळें निबंधकारासही ३६ वर्षांपर्यंत उपनयनास सवलत देणें जरूर वाटूं लागलें असावें.

वर बटूच्या कंबरेभोवती मेखला बांधून त्यास कौपीन म्हणजे लंगोटी घालण्यांत येई. पोरकटपणाचा काल आता संपला हें विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्याकरितां या वेळीं लंगोटी घालण्यास सुरवात करण्यांत येई; ब्रह्मचाऱ्याला बारावें वर्ष लागलें म्हणजे त्यास लंगोटीऐवजी धोतर नेसण्यास देण्याचा प्रघात असे; तोही शिष्टाचाराच्या दृष्टीने योग्यच होता (वीरमित्रोदय, पृ. ४३२). ब्रह्मचाऱ्याची मेखला तीन दोरे विणून केलेली असे. आपणास आता तीन वेदांच्या अध्ययनामध्यें मग्न होऊन राहावयाचें आहे याची जाणीव ब्रह्मचाऱ्यास अहोरात्र राहावी या हेतूने मेखला तीन दोऱ्यांची करण्यांत येई, असें वीरमित्रोदयामध्यें उद्धृत केलेल्या आश्वलायनांच्या वचनावरून दिसून येतें ('वेदत्रयेणावृतोऽहमिति मन्येत स द्विजः।' पृ. ४६२). 'ऋतस्य गोप्त्री तपसस्तरुत्री घ्नती रक्षांसि सहमाना अरातीः। सा मां समन्तमभिपर्येहि भद्रे धर्तारस्ते सुभगे मा रिषाम ॥' हा बहुतेक सर्व गृह्यसूत्रांमध्यें आढळणारा मंत्र मेखला धारण करण्याच्या वेळीं म्हणण्यांत येई. आपल्या शरीरावर अष्टौप्रहर धारण करावयाची मेखला आपलें पावित्र्य रक्षण करून आपलें नैतिक व शारीरिक सामर्थ्य वाढवण्यास मदत करील अशी भावना ब्रह्मचाऱ्याच्या मनांत बिंबून राहावी, असाच या मंत्राचा हेतु आहे, हें उघड दिसून येईल.[१]

धार्मिक कृत्याच्या प्रसंगीं उघडें बसणें हिंदु समाजामध्यें अप्रशस्त मानलें जातें,[२] म्हणून ब्रह्मचाऱ्याला उपनयनाच्या प्रसंगीं एक उपरणें पांघरण्यास देण्यांत येई. अति प्राचीन काळीं,–ज्या वेळीं विणण्याची कला माहीत नव्हती त्या वेळीं–हें उपरणें म्हणजे हरिणाचें कातडें असे; म्हणून या प्रसंगीं अजिन धारण करण्याचा विधि सांगितलेला आढळतो. मनोहर

१ अथर्ववेद ६, १३३, ४ मध्यें 'श्रद्धाया दुहिता तपसोऽधिजाता स्वसा ऋषीणा भूतकृतां बभूव' हा मंत्र या प्रसंगास उद्देशून सांगितला आहे. त्याचाही भावार्थ वरीलप्रमाणेंच आहे.

२ स्नानं दानं तपो होमः स्वाध्यायपितृतर्पणम्। नैकवस्त्रो द्विजः कुर्यात् श्राद्धभोजनसत्क्रियाः।

योगयाज्ञवल्क्य (स्मृतिचंद्रिका, संस्कारकाण्ड, पृ. २९९ मध्यें उद्धृत)

व चकचकित दिसणारें हरिणाजिन हें ब्रह्मवर्चसाचें द्योतक आहे व तें आपणास मिळवावयाचें आहे, हें हरिणाजिन वापरतांना ब्रह्मचाऱ्यानें ध्यानांत ठेवावें, असें गोपथ ब्राह्मणाचें म्हणणें आहे. ब्रह्मचाऱ्याच्या ध्यानांत आपलें कर्तव्य सर्वकाळ राहावें म्हणून शास्त्रामध्यें कशी योजना केली आहे हें यावरून दिसून येईल. विणण्याची कला अवगत झाल्यावर हरिणाजिनाची जरूरी राहिली नाही; तेव्हा उत्तरीय किंवा उपरण्याबद्दल वाटल्यास सुताचें कापड वापरावें किंवा वाटल्यास हरिणाचें कातडें वापरावें, असा विकल्प तैत्तिरीय आरण्यकामध्यें आढळून येतो ('अजिनं वासो वा दक्षिणत उपवीय' २. १). पण जुन्यास चिकटून राहण्याची प्रवृत्ति हिंदु समाजांत फार प्राचीन असल्यामुळें हरिणाजिन व उत्तरीय हीं दोन्हीही उपनयनाच्या वेळीं वापरण्याचा प्रघात सुरू झाला. उपनयनाच्या वेळीं हें बटूला द्यावयाचें उपरणें 'सद्यः कृत्तोतम्' म्हणजे त्याच वेळीं घरीं विणलेलें असावें, असें बौधायन व मानव गृह्यसूत्रांमध्यें विधान आढळतें. त्यावरून प्राचीन काळीं सूत कातणें व कापड विणणें ह्या दोन्हीही गोष्टी घरोघरी होत असत असें दिसून येईल.

ज्या गृह्यसूत्र ग्रंथांमध्यें उपनयनाचें सविस्तर वर्णन आढळतें त्यांमध्यें उपनयनाच्या वेळीं यज्ञोपवीत उर्फ जानवें घालावें असें कोठेंच सांगितलेलें आढळत नाही. हल्लीच्या हिंदु समाजास याचें फार आश्चर्य वाटेल. पण यज्ञोपवीताचें मूळ स्वरूप माहीत असणाऱ्यास यामध्यें मुळीच कांही चमत्कारिक दिसणार नाही. अतिप्राचीन काळीं जें हरिणाजिन व मग पुढे जें उपरणें बटूला देत असत, त्याचाच यज्ञोपवीताच्या जागीं उपयोग होत असे. यज्ञाच्या वेळीं जें उत्तरीय वस्त्र पांघरतात तें यज्ञोपवीत, अशी यज्ञोपवीताची व्युत्पत्ति आहे. नेहमीचें उपरणें यज्ञयागादिकांचे वेळीं डाव्या खांद्यावरून व उजव्या खांद्याखालून वापरीत व तें तसें असलें म्हणजे त्यास यज्ञोपवीत म्हणावें, असें वचन तैत्तिरीय संहितेंत सापडतें.[१] यज्ञोपवीत उपरण्यासारख्या कपड्याचें करणें हा

१ वासोविन्यासविशेषो यज्ञोपवीतम् । दक्षिणं बाहुमुद्धरते अवधत्ते सव्यमिति यज्ञोपवीतमिति ब्राम्हणम् । तै. सं. २. १. ३.

उत्तम पक्ष, कपडा मिळाला नाही तरच तें सूत्राचें करावें, असें ऋष्यशृंग ऋषीचें मत होतें.[१] पुढे पुढे सर्व आयुष्य म्हणजेच एक यज्ञ अशी कल्पना रूढ झाली; पण दिवसांतील चोवीस तास एखादें उपरणें यज्ञोपवीत म्हणून एकसारखें वापरणें अशक्य दिसूं लागल्यामुळे त्याच्याऐवजी एखादें सुटसुटीत सूत्रच वापरावें असें स्मृतिकारांस वाटूं लागून त्यांनी हल्लीचें जानवें वापरण्याची सुधारणा अंमलांत आणली. 'नित्यमुत्तरं वासः कार्यम् । अपि वा सूत्रमेवोपवीतार्थे ।' या आपस्तंबांच्या वचनावरून हें स्पष्टपणें दिसून येईल (आ. ध. सू. २. २. ४. २१–२२). उपनयनामध्यें जानवें हें वस्तुतः किती गौण आहे हें यावरून दिसून येईल.

मेखला, कौपीन व यज्ञोपवीत हीं धारण केल्यावर मग खऱ्या उपनयनास प्रारंभ होतो. आर्यांची अतिप्राचीन देवता जी अग्नि तिच्या होमामध्यें प्रथम बटूकडून पवित्र समिधांचें हवन करविण्यांत येई. अग्नीने स्वतःप्रमाणें बटूलाही तेजस्वी व बलवान बनवावें अशी प्रार्थना या वेळीं म्हणण्याच्या मंत्रांत केलेली आढळते (उदा० भा. गृ. सू. १. ५ पहा). ब्रह्मचर्य हा शिक्षणाप्रमाणेंच धर्माचरणाच्या दृष्टीनेही फार महत्त्वाचा काल आहे हें विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्याच्या हेतूने त्यास भग, यम, अर्यमा, सविता वगैरे वैदिक देवतांच्या हवालीं करण्याचा मग समारंभ होई. 'देव सवितर् एष ते ब्रह्मचारी स मा मृत ।' (अ. गृ. सू. १. २०. ६.) हा मंत्र ब्रह्मचाऱ्यास सूर्याच्या हवालीं करतांना म्हणण्यांत येई; असल्या प्रार्थनांमुळें, जोंपर्यंत आपण ब्रह्मचर्याचें पालन करितों तोंपर्यंत आपला पाठिराखा परमेश्वर आहे, अशी आत्मविश्वासाची भावना विद्यार्थ्याच्या मनांत बिंबण्यास फार चांगली मदत होई. मग ब्रह्मचाऱ्यास 'तूं कुणाचा ब्रह्मचारी ?' असा गुरु प्रश्न करी; व तो स्वाभाविकपणें 'मी तुमचा विद्यार्थी' असें उत्तर देई. 'तूं चुकलास; तूं माझा ब्रह्मचारी नसून सर्व देवांमध्यें महाप्रतापी जो इन्द्र व महातेजस्वी जो अग्नि त्यांचा ब्रह्मचारी तूं आहेस. मी त्यांचा केवळ प्रतिनिधि आहें, व त्यांच्याच आज्ञेने तुला आज शिकविण्यास प्रारंभ करणार.' असें त्यास गुरु समजावून देई. विद्यार्जनाचें व संस्कृतिरक्षणाचे

१ स्मृ. चं. आ. का. पृ. ८४ मध्यें उद्धृत.

कार्य इतकें पवित्र आहे की, परमेश्वर स्वत: त्यामध्यें योग्य विद्यार्थ्यास मदत करतो असा विश्वास विद्यार्थ्याच्या मनावर बिंबवून देण्याचा शास्त्रकारानी फार प्रयत्न केला आहे; व तो अनाठायी आहे असें कोण शिक्षणशास्त्रज्ञ म्हणेल ?

गुरु व शिष्य याचें परस्परांवर निस्सीम प्रेम व अढळ श्रद्धा असली तरच शिक्षणामध्यें विद्यार्थ्याची झपाट्याने प्रगति होईल, हें दर्शविण्या-करितां 'हृदयस्पर्शना' चा विधि मग करण्यांत येई. विद्यार्थ्याच्या छातीवर हात ठेवून आपणा दोघांमध्यें चिरकालीन प्रेम व विश्वास नांदावा अशा अर्थाचा मंत्र या वेळीं गुरु जपत असे (हि. गृ. सू. २. ५. ११.). परस्पर विश्वास व प्रेम यांजबरोबर दृढोद्योगाचीही विद्यार्जनास फार जरूर आहे; ही गोष्ट ठसविण्याकरितां मग 'अश्मारोहणा'चा विधि करण्यांत येई. गुरु शिष्यास एका दगडावर उभा करी व निश्चयाने व शरीराने दगडासारखा दृढ हो, अशा अर्थाचा मंत्र त्यावेळीं जपत असे ( मा. गृ. सू. १. २२. १२. ).

हें सर्व झाल्यावर गुरूजवळ जाण्याचा म्हणजे उपनयनाचा विधि पुरा होई व गुरु शिष्यास वेद शिकविण्यास प्रारंभ करी. सूर्य ही देवता फार प्राचीन काळापासून मानवजातीने अत्यंत पवित्र व तेजस्वी मानली आहे. म्हणून विद्यार्थ्यांस प्रथम सूर्याच्या प्रार्थनेचा मंत्र शिकवण्यांत येई. सवित्याच्या प्रार्थनेचा हा मंत्र, म्हणून त्यास 'सावित्री' मंत्र म्हणत. ब्राह्मणांच्या बाबतीत तो गायत्री वृत्तांत असे म्हणून त्यास पुढे लक्षणेने गायत्री मंत्र म्हणू लागले.

तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात् ॥

ऋग्वेद ३. ६२. १०.

'सवितादेवाच्या सर्वश्रेष्ठ तेजाचें आपण ध्यान करूं या; म्हणजे तो आमच्या बुद्धीस चेतना देईल,' असा सावित्री मंत्राचा अर्थ आहे.[१]

---

१. गायत्री मंत्राचा हा अर्थ सरळ व सर्वांस पटणारा असा आहे. पुढे पुढे गायत्री मंत्रामध्य आध्यात्मिक सिद्धांत हुडकून काढण्याची प्रवृत्ति ज्या वेळीं वाढूं लागली, त्या वेळीं मंत्राच्या पहिल्या 'तत्' अक्षराने प्रकृति, दुसऱ्या 'स' अक्षराने आपलें अंतःकरण, तिसऱ्या 'वि' अक्षराने बुद्धि इत्यादिकांचा निर्देश करण्यांत आलेला आहे, अशा प्रकारचीं मतें प्रतिपादण्यांत येऊं लागलीं (बृहत्पराशर ४. ७५–७७). पण त्यांमध्यें फारसा ग्राह्यांश नाही.

बुद्धीच्या श्रेष्ठतेवर जगांतील श्रेष्ठत्व अवलंबून आहे ही कल्पना विद्यार्थ्यांच्या मनावर या मंत्रामुळे चांगली बिंबत असे. उत्तरकालीन स्मृतिकाराचें असें मत आहे की, सवित्याच्या प्रार्थनेचा हा रोज म्हणण्याचा मंत्र क्षत्रियांच्या बाबतींत 'त्रिष्टुभ्' वृत्ताचा व वैश्यांच्या बाबतींत 'जगती' वृत्ताचा असावा. पण तें मत प्राचीन काळच्या ऋषींना सम्मत होतें असें दिसत नाही. कारण, त्यांनी तसें कोठेच सांगितलें नाही. त्रिष्टुभ् व जगती वृत्तांतील कोणते विशिष्ट मंत्र क्षत्रियवैश्यांस सूर्यप्रार्थनेकरितां शिकवावे याबद्दल अर्वाचीन स्मृतिकारांमध्येंही ऐकमत्य नाही, या गोष्टीवरूनही हेंच दिसून येतें. मेधातिथीच्या मतें (मनु २. ३८)

आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ।
हिरण्येन सविता रथेन देवो याति भुवनानि पश्यन् ॥

ऋग्वेद १. ३५. २

हा क्षत्रियांचा सावित्री मंत्र होय. सांख्यायन गृह्यसूत्रावरील टीकाकार जो नारायण त्याच्या मतें

हिरण्यपाणिः सविता विचर्षणिः उभे द्यावापृथिवी अंतरीयते ।
अपामीवां बाधते वेति सूर्यमभिकृष्णेन रजसा द्यामृणोति ॥

ऋ. वे. १. ३५. ९

हा क्षत्रियांचा सावित्री मंत्र होय. वैश्यांच्या सावित्री मंत्राच्या बाबतींतही असाच मतभेद आहे. मेधातिथि, शातातप व लौगाक्षि यांच्या मतें वैश्यांनी पुढील मंत्राचा सावित्री मंत्र म्हणून उपयोग करावा:—

विश्वा रूपाणि प्रतिमुंचते कविः प्रासावीद्भद्रं द्विपदे चतुष्पदे ।
वि नाकमख्यत्सविता वरेण्योऽनु प्रयाणमुषसो विराजति ॥

ऋ. वे. ५.८१.२

अश्व. गृ. सू. (३,७) व वाराह गृ. सू. (६) यांत पुढील मंत्र हा वैश्यांचा सावित्री मंत्र म्हणून दिला आहे.—

युंजते मनः उत युंजते धियः विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः ।
वि होत्रा दधे वयुनाविद् एक इन्मही देवस्य सवितुः परिष्टुतिः ॥

ऋ. वे. ५.८१.१

सांख्यायन गृह्यसूत्राचाटीकाकार नारायण याच्या मतें

हंस: शुचिषद्वसुरंतरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ।
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतम् ॥
ऋ.वे. ४.४०.५

हा वैश्यांचा सावित्री मंत्र होय. प्रथमत: सर्व त्रैवर्णिकांस एकच, म्हणजे 'तत्सवितु:' हा सावित्री मंत्र शिकवीत; पुढे जातिभेद जास्त बद्धमूल झाल्यावर क्षत्रिय व वैश्य यांना निराळे सावित्री मंत्र सांगण्याची कल्पना निघाली असें वाटतें. प्राचीन काळीच जर निरनिराळ्या वर्णाचे निरनिराळे सावित्री मंत्र असते, तर त्यांचा उल्लेख प्राचीन ग्रंथांत कां आढळूं नये? तसेंच अर्वाचीन ग्रंथकारांचेंही क्षत्रियवैश्यांच्या विशिष्ट सावित्री मंत्रा-बद्दल एकमत कां असूं नये?

रात्रीं प्रवास करतांना अगर नव्या तळ्यामध्यें स्नान करितांना ब्रह्मचाऱ्यास आत्मविश्वास वाटावा या कारणास्तव मग त्यास एक 'दंड' उर्फ लाठी देण्यांत येई. दंडधारणामध्यें दुसराही एक उद्देश असे. प्रवाशाच्या हातीं नेहमी दंड असतो. मीही ज्ञान-देशास पोहचूं इच्छिणारा एक प्रवासीच आहें ही भावना दंडधारणाने विद्यार्थ्याच्या मनांत साहजिक बिंबवली जाई.

दंडधारण करून मग विद्यार्थी भिक्षाचरणाकरितां बाहेर पडे. पहिल्या दिवशीचें भिक्षाचरण औपचारिकच असे; त्या वेळीं आई, मावशी वगैरे नातलगांकडेच ब्रह्मचारी भिक्षेकरितां जाई. ब्रह्मचर्यामध्यें अखेर-पर्यंत विद्यार्थ्यांने भिक्षान्नावरच निर्वाह करावा, असें धर्मशास्त्रकारांचें मत आहे. त्याप्रमाणें कितपत वस्तुस्थिति होती, हें पुढे आपण तिसऱ्या प्रकरणांत पाहूं. उपनयनानंतर तिसऱ्या दिवशीं, विद्यार्थ्याची बुद्धि तीव्र व कार्यक्षम व्हावी, म्हणून 'मेधाजनन' नांवाचा एक विधि करीत. तो झाला म्हणजे उपनयन संस्कार समाप्त होई.

ज्या वेळीं उमनयनांतील निरनिराळ्या विधींचा व मंत्रांचा अर्थ सर्व लोकांस कळत असे, त्या वेळीं उपनयन संस्कारापासून समाजास फारच फायदा होत असला पाहिजे, हें वाचकांस आता सहजच कळून येईल. 'स्वावलंबन, स्वाभिमान व संयमन यायोगें नितान्त उदात्त असा आपला आयुष्याचा काल आता सुरू होणार आहे. ज्ञानार्जन हें कष्ट-

साध्य तर खरेंच, पण जर निश्चयाने व एकाग्रतेने आपण आपलें कर्तव्य केले तर आपणांस अंगीकृत कार्यांत खास यश येईल; कारण परमेश्वराचें साहाय्यही आपणास उपनयनमंत्रांनी प्राप्त झालेलें आहे. आपण इन्द्राप्रमाणें वीर्यवान् व अग्नीप्रमाणें तेजस्वी होऊं; आपणास अशक्य असें कांहीच राहणार नाहीं. आपल्या आश्रमाचे नियम पाळले तर प्रत्यक्ष मृत्यूसही आपणाला हात लावतां येणार नाही.' अशा तऱ्हेची भावना व आत्मविश्वास विद्यार्थ्यांच्या अंतःकरणामध्यें उपनयनमंत्रांमुळें उत्पन्न होई. शिक्षणशास्त्रदृष्टया अशा प्रकारच्या आत्मविश्वासाचें महत्त्व व फल पुष्कळच आहे.

## उपाकर्म व उत्सर्जन

ब्रह्मचर्याश्रमांत विद्यार्थ्यास दरवर्षीं कांही व प्रसंगविशेषीं कांही, धार्मिक विधि करावे लागत. उपाकर्म उर्फ श्रावणी व उत्सर्जन यांचा पहिल्या सदरांत अंतर्भाव होतो. अश्वमेध शिकण्याच्या वेळीं 'आश्वमेधिक व्रत,' उपनिषदें शिकण्याच्या वेळीं 'रहस्य व्रत', आरण्यकें सुरू करण्याच्या वेळी 'व्रातिक व्रत,' वगैरे जीं विशेष प्रसंगीं विशिष्ट व्रतें ब्रह्मचाऱ्यास करावीं लागत त्यांचा अंतर्भाव दुसऱ्या सदरांत होतो. शिक्षणशास्त्रदृष्ट्या या व्रतांचें फारसें महत्त्व नाही; म्हणून आता आपण पहिल्या सदरांत मोडणाऱ्या उपाकर्म व उत्सर्जन यांसंबंधीं थोडेंसें विवेचन करूं.

उपाकर्म उर्फ श्रावणी म्हणजें यज्ञोपवीत बदलण्याचा वार्षिक दिवस अशी समाजामध्यें हल्ली समजूत आहे; पण ती सर्वस्वीं भ्रममूलक आहे. ज्या गृह्यसूत्रांमध्यें उपाकर्माचें सविस्तर विवेचन आढळते त्यांमध्यें यज्ञोपवीतधारणाचा उल्लेखही प्रायः आढळत नाही. बहुतेक सर्व हिंदु व्रतांच्या व संस्कारांच्या वेळीं यज्ञोपवीत, अजिन, दंड वगैरे नवे धारण करावे लागत, त्याप्रमाणें उपाकर्माच्या प्रसंगींही नवें जानवें घालीत असत; पण नवें जानवें घालणें हा उपाकर्माचा प्रधान हेतु नव्हता. उपाकर्म म्हणजे 'छंदसामुपाकर्म' याचें संक्षिप्त रूप होय. वेदांचा संग्रह करण्याच्या वेळीं म्हणजे प्रतिवर्षी वेदाध्ययनास प्रारंभ करण्याच्या

प्रसंगीं विद्यार्थ्यांनी आपल्या गुरुजनासमवेत करण्याचा तो एक सोपा व सुटसुटीत पण शिक्षणशास्त्रदृष्ट्या महत्त्वपूर्ण असा विधि होता. विवाहाच्या वेळीं वरास नवा धोतरजोडा नेसण्यास देतात म्हणून जुनें धोतर बदलून नवें धोतर नेसण्यास घेणें हेंच विवाहाचें मुख्य प्रयोजन आहे, असें म्हणणें जितकें समंजस होईल, तितकेंच उपाकर्म उर्फ श्रावणी म्हणजे जानवें बदलण्याचा विधि होय, असें प्रतिपादणेंही बरोबर ठरेल.

वाचकांना वरील विधान चमत्कारिक वाटेल; पण तें सत्य आहे. 'अध्येष्यमाणः अध्याप्यैरन्वारब्धः (उपाकर्म करोति),' (अ. गृ. सू. ३. ४. १०); 'समारब्धेष्वन्तेवासिषु उपाकर्म कुर्वीत। सहान्तेवासिभिः ग्रामादभिनिष्क्रम्य उत्सर्जनविधिः।' (बौ. गृ. सू. ३. १. ३); 'शिष्याणां सावित्र्यनुवचनं यथोपनयने' (खा. गृ. सू. ३. २. १८–१९); वगैरे वचनांवरून श्रावणीचा विधि शिष्य व गुरु यांनी वार्षिक 'कॉलेज टर्म' सुरू होण्याच्या वेळीं करण्याचा असे, हें स्पष्ट दिसून येईल. ज्या गुरूला पुष्कळ शिष्य आपल्यापाशीं शिकावयास असावे अशी महत्त्वाकांक्षा असे, त्यानें श्रावणीच्या वेळीं जपण्याचा मंत्र वाराह गृह्यसूत्रांत आढळतो (खंड ७); व पारस्कर गृह्यसूत्रामध्यें ( २. १० ) श्रावणीच्या वेळीं जितके तीळ गुरु अग्नीमध्यें हवन करील तितके शिष्य त्यास मिळतील, असें विधान सापडतें. या सर्व वचनांवरून श्रावणी हा एक वैदिक शाळांतील सांवत्सरिक अधिवेशन सुरू होण्याच्या वेळीं करण्याचा धार्मिक विधि असे, हें स्वच्छपणें दिसून येईल. 'अतोऽध्यापयतोऽपि निरग्नेः साग्नेरपि अनध्यापयतः (उपाकर्मणि) नाधिकारः।' असें जें पारस्कर गृह्यसूत्रावरील टीकाकार हरिहर यानें विधान केलें आहे, त्यावरूनही हेंच दिसून येईल.

असें असेल तर हल्ली गुरुशिष्याव्यतिरिक्तही समाजांतील सर्व उपनीत व गृहस्थाश्रमी लोक जी श्रावणी करितात, ती कां, असा प्रश्न उत्पन्न होईल. पूर्वकालीन समाजसुधारकांनी घडवून आणलेली ही एक सुधारणा होय. शिक्षण संपलें व 'डिग्री' मिळाली म्हणजे शिकलेलें बहुतेक सर्व थोड्याच वेळांत विद्यार्थी विसरतात, हें आपण हल्ली पाहतोंच. पूर्वींही तसाच प्रकार होऊं लागला होता. इतिहास, अर्थशास्त्र, वाङ्मय, वगैरे

पूर्वाश्रमांत शिकलेल्या विषयांतील प्रमेयांची स्थूल कल्पना असली, तर एखाद्या सुशिक्षित पदवीधरास हल्लीच्या काळीं वेळ मारून नेतां येते. वेदाध्ययन केलेला स्नातक जर वेदमंत्र विसरला, तर त्यास अशा तऱ्हेनें वेळ मारून नेणें शक्य नव्हतें. स्वर, वर्ण वगैरेमध्यें थोडीही चूक न होतां त्यास वैदिक मंत्राचा उपयोग करावा लागे. शिकलेले वेदमंत्र विसरूं नयेत म्हणून रोज स्वाध्यायामध्यें थोडा तरी वेळ घालावा अशा प्रकारची एक योजना पंचमहायज्ञांत करून ठेवलेली होतीच, पण रोजच्या व्यवहाराच्या दगदगीत स्वाध्यायाची पुष्कळदा बरीच गळचेपी होऊं लागली. शिकलेले वेदमंत्र जर विसरावयाचे नसतील, त्यांच्यावर कालाने येणारा शिळेपणा जर काढून टाकावयाचा असेल (यातयामतानिरासार्थम्), तर त्याबद्दल निराळी तजवीज करणें जरूर आहे असें समाजधुरीणांस वाटूं लागलें. तेव्हा कृषिप्रधान देशांत ज्या वेळीं विशेष काम नसतें त्या पावसाळ्याच्या वेळीं चार महिने सर्व स्नातकांनी दरवर्षी वेदांची पुन्हा उजळणी करावी, अशा हेतूने उपाकर्म उर्फ श्रावणी सर्वांनाच सक्तीची करण्यांत आली. श्वेतकेतु ऋषि तर, याच्याही पुढे जाऊन, सर्व विवाहित मनुष्यांनीही दरवर्षी या वेळी दोन महिने तरी गुरुगृहीं राहावें असें प्रतिपादूं लागले होते (आ. ध. सू. १. १. २. १२). गृहस्थाश्रमांतही बरीच धार्मिक व सामाजिक कर्तव्यकर्मे असतात, दर वर्षी दोन महिने घर सोडून जाण्याने त्यांमध्यें बराच व्यत्यय येईल, या कारणास्तव आपस्तंब ऋषीना श्वेतकेतूंची सुधारणा संमत नव्हती. उपाकर्म सर्वांनाच सक्तीचें करावें, गुरुगृही जाण्याची सक्ती मात्र असूं नये; श्रावणीनंतर चार महिने सर्वांनी आपल्या घरांतच पण विशेष मन लावून व जास्त वेळ खर्च करून वेदांची उजळणी करावी व त्यांतील 'यातयामता' म्हणजे शिळेपणा काढून टाकावा अशा तऱ्हेची अखेर समंजसपणाची तडजोड झाली व श्रावणी सर्वांना सक्तीची झाली.

आषाढ, श्रावण किंवा भाद्रपद पौर्णिमेला पाऊस पडून वनस्पति व शेतें उगवूं लागलीं म्हणजे उपाकर्माला सुरुवात करावयाची असे. कृषिप्रधान देशांत ही वेळ सर्वांना फुरसतीची असते. हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत आषाढ ते भाद्रपदपर्यंत केव्हा तरी पावसाळा सुरू होतो, म्हणून

श्रावणीच्या कालाबद्दल असा विकल्प आढळतो. पण सामान्यत: श्रावण महिना हा बहुसंख्याकांस या दृष्टीने सोयीचा होता, म्हणून उपाकर्म श्रावण महिन्यांत करण्यांत येऊं लागलें व त्याला श्रावणी हें नांव मिळालें. हस्त नक्षत्राची अधिष्ठात्री देवता सविता व वेदांतील सारसर्वस्व मानण्यांत आलेल्या गायत्री मंत्रांतही त्याच देवतेची प्रार्थना आहे, तेव्हा प्रतिवार्षिक वेदाध्ययनाचें अधिवेशन श्रावण महिन्यांतील हस्त नक्षत्राच्या दिवशीं म्हणजे श्रावण शु. ५ ला करावें अशीही एक प्रथा पडली. गुरुमुखांतून वेद श्रवण करूनच शिष्यांनी वेद शिकावयाचे असत, तेव्हा वेदाध्ययनप्रारंभास श्रावण महिन्यांतील 'श्रवण' नक्षत्राचा दिवस म्हणजे पौर्णिमा चांगली, या भावनेने पौर्णिमेस श्रावणी करण्याचा प्रघात निघाला असावा.

गुरुशिष्यांनी विद्यालयाच्या वार्षिक अधिवेशनाच्या प्रारंभीं करावयाचा उपाकर्म हा विधि आहे हें ध्यानांत ठेवलें म्हणजे त्याच्या स्वरूपाची कल्पना आपणास सहज येईल. अति प्राचीन काळीं वेद हाच अध्ययनाचा प्रमुख विषय असे, तेव्हा उपाकर्माच्या वेळीं वैदिक देवतांचें हवन करून विद्यार्थ्यांची बुद्धि व धारणा वाढावी अशी प्रार्थना करण्यांत येई, व मग जे महाभाग ऋषि वेदांचे द्रष्टे होते त्यांना हवनादिक अर्पण करून कृतज्ञतापूर्वक प्रणाम करण्यांत येई. निरनिराळ्या वेदांच्या देवता व द्रष्टे निरनिराळे असत म्हणून निरनिराळ्या शाखांचें उपाकर्मही निरनिराळें करावें लागे. ऋग्वेद्यांच्या उपाकर्मांत सविता, श्रद्धा, मेधा, प्रज्ञा, धारणा वगैरे देवतांना हवि देऊन मग ज्या ऋग्वेदाचा अभ्यास करावयाचा असे, त्याच्या दहा मंडळांच्या पहिल्या व शेवटल्या ऋचा म्हणून त्यांतील देवतांना व द्रष्ट्यांना हविर्भाग देण्यांत येत. यजुर्वेद हा यागप्रधान आहे, म्हणून यजुर्वेदी लोक उपाकर्माच्या वेळीं प्रथम याज्ञिक व मग संहितांच्या देवतांना हवि अर्पण करून मग यजुर्वेद संहितेच्या निरनिराळ्या कांडांच्या मंत्रद्रष्ट्या ऋषींची प्रार्थना करतात. त्यानंतर ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, इतिहास, पुराण या वाङ्मयाला हवि अर्पण करण्यांत येतात. त्यानंतर यजुर्वेदविषयक वाङ्मयामध्यें ग्रंथ व टीका लिहून ज्यांनी अमोलिक भर टाकली आहे, असे जे

कृष्णद्वैपायन, वैशंपायन, कृष्णयजुर्वेदकार तित्तिरि, यजुर्वेदपदपाठकार आत्रेय, वृत्तिकार कौंडिन्य, प्रवचनकार बोधायन, सूत्रकार आपस्तंब, व इतर सत्याषाढ, हिरण्यकेशि, वाजसनेय, याज्ञवल्क्य, भारद्वाज, अग्निवेश्य वगैरे ग्रंथकार, यांना कृतज्ञतापूर्वक अभिवादन करण्यांत येई. सामवेदाच्या उपाकर्मामध्येंही अशाच प्रकारें जैमिनि, तालवकार, राणायनि, भागुरि वगैरे सामवेदीय ग्रंथकारांना हवि अर्पण करण्यांत येई. यानंतर गुरु व शिष्य हे आपल्या सर्वांच्या हातून एकनिष्ठपणें अध्ययनकार्य होवो अशी देवांची प्रार्थना करून अध्ययनास सुरुवात करीत.

ज्या वाङ्मयाचें किंवा ग्रंथांचें अध्ययन करावयाचें त्यांच्या कर्त्यांचें अध्ययनाचे प्रारंभीं कृतज्ञतापूर्वक स्मरण करून त्यांना अभिवादन करावयाचें ही उपाकर्मांतील मुख्य कल्पना उदात्त आहे यांत शंका नाही. वैदिकेतर वाङ्मयाच्या अध्ययनाच्या वेळीही हल्ली जर आपण हा प्रघात पाडला तर त्यापासून विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तीवर इष्ट प्रकारचा परिणाम होईल यांत संशय नाही. त्याचप्रमाणें विद्यार्थिदशेनंतरही सर्वांनी दर वर्षीं कांही वेळ जुन्या अभ्यासाची उजळणी करण्यांत व नवें ज्ञान संपादन करण्यांत घालवावा हीही उपाकर्मांतील कल्पना फार उपयुक्त आहे हें सर्व शिक्षणशास्त्रज्ञ कबूल करतील.

अधिवेशन संपण्याच्या वेळीं उत्सर्जन संस्कार करण्यांत येई. त्या वेळेचा विधिही जवळ जवळ उपाकर्मासारखाच असे. अध्ययनाच्या प्रारंभीं जसें वैदिक देवता व ग्रंथकार यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करणें जरूर वाटे तसें त्याच्या शेवटींही वाटे, म्हणून शाळा बंद होण्याच्या वेळीं उत्सर्जन विधि करण्यांत येई. आजकाल आपण उपाकर्म व उत्सर्जन दोन्हीही एकाच दिवशीं करितों; एका दृष्टीने तें योग्यच आहे. उपाकर्मानंतर वेदाध्ययनच जर व्हावयाचें नाही तर तीं दोन्हीही एकाच दिवशीं केलीं म्हणून काय वाईट ?

## समावर्तन

वेदाध्ययन संपवून ब्रह्मचारी गुरुगृहाहून स्वगृहीं परत जाण्याला ( समावर्तण्याला ) निघाला म्हणजे समावर्तन संस्कार करण्यांत येई. समावर्तन किंवा सोडमुंज हा एक लग्नापूर्वीं सर्वांनी करावयाचा आव-

श्यक संस्कार आहे, तो केल्याशिवाय लग्न होणें शक्य नाही, असा हल्ली सार्वत्रिक समज आहे. ऐतिहासिक दृष्ट्या तो बराच चुकीचा आहे. बी. ए. झालेल्या विद्यार्थ्यांसच जसा पदवीदानसमारंभास हजर राहण्याचा हक्क असतो, इतरांस तेथे मज्जाव होतो, त्याचप्रमाणें पूर्वी ज्यांचें वेदाध्ययन संपूर्ण झालेलें असे, त्यांचेंच समावर्तन करण्यांत येई. मानव गृह्यसूत्रकार तर केवळ संपूर्ण वेद पाठ केल्याने समावर्तनाची पात्रता येत नाही, वेदाचा अर्थ सांगण्याइतकी विद्वत्ता ब्रह्मचाऱ्याच्या अंगीं असेल तरच त्याचें समावर्तन करावें, असें प्रतिपादन करितात (१. २. ३.). पुढे उपनयन हा जेव्हा आवश्यक शारीरिक संस्कार मानण्यांत येऊं लागला तेव्हा समावर्तनही सर्वांचें करावें असें समाजास वाटूं लागलें. वेदांचा अर्थ सांगण्याची पात्रता नसली, तरी संपूर्ण वेद म्हणण्याची तरी असावी, तीही नसली तरी वेदांचा कांही भाग तरी येत असावा, निदान विद्यार्थ्याने ब्रह्मचर्यनियमांचें पालन केलेलें असावें म्हणजे झालें, असें स्मृतिकारांस वाटूं लागलें व त्यामुळें समावर्तन हें विवाहापूर्वी करावयाचा आवश्यक संस्कार बनलें.

वेदाध्ययन केव्हा संपावयाचें हें प्रत्येकाच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून राही; त्यामुळें समावर्तन संस्कार वयाच्या अमुकच वर्षी करावा असा कोठे नियम आढळत नाही. सुमारे २० ते २४ वर्षांच्या वेळीं अध्ययन संपत असे व समावर्तनाच्या वेळीं ब्रह्मचारी प्रायः इतके मोठे असत. ब्रह्मचाऱ्याला सुमारें सोळाव्या वर्षी दाढी येई, तेव्हा शेंडी राखण्याच्या वेळेचेच मंत्र म्हणून गोदान नांवाचा संस्कार करण्यांत येऊन त्याच्या दाढीचें वपन करण्यांत येई. इसवी सनाच्या आरंभाच्या सुमारास जेव्हा बालविवाह समाजांत रूढ होऊं लागले त्या वेळीं सोळाव्या वर्षी करण्यांत येणाऱ्या गोदानाच्या वेळींच समावर्तन संस्कार उरकून विवाह करावा अशा विचारसरणीचा कांही धर्मशास्त्रकार अंगीकार करूं लागले.[१] सोळाव्या वर्षी विवाह केला तर १२ वर्षें ब्रह्मचर्य कसें शक्य होईल, ही शंका जैमिनि गृह्यसूत्राचा टीकाकार श्रीनिवासाचार्य यांच्यासारख्यांना आल्याशिवाय

१. आगोदानकर्मणः (ब्रह्मचर्यम्) इत्येके । भा. गृ. सू. २. ९. वा. गृ.सू. ९ ही पहा.

राहिली नाही. पण पांचव्या वर्षी उपनयन केलें तर १६ वर्षं संपण्याच्या वेळी १२ वर्षं ब्रह्मचर्याचें पालन पुरे होईल, तेव्हा गोदानाच्या वेळीं समावर्तन करण्यास हरकत नाही, अशी शक्कल त्यांनी लढविली आहे.[१] पण गोदानाच्या वेळीं समावर्तन उरकण्याची चाल ही बालविवाहामुळे पुढे निघालेली आहे यांत मुळीच शंका नाही. समावर्तनाच्या वेळी सामान्यतः कृतविद्य ब्रह्मचारी प्राचीन काळी २० ते २४ वर्षांचा असे.

विद्यार्जनाला हिंदुधर्म व समाज किती महत्त्व देई हें समावर्तन संस्काराच्या आलोकनाने दिसून येईल. समावर्तनाच्या दिवशीं दुपारी १२ वाजेपर्यंत ब्रह्मचाऱ्याने आपल्या खोलीच्या बाहेर पडावयाचें नसे. सूर्याचें जें विश्वविजयी तेज आहे, तें स्नातकाच्या विद्यातेजापासूनच त्यास मिळालें आहे, तेव्हा प्रातःकाळीं मंदतेजाच्या सूर्यनारायणापुढे उग्र प्रकाशाचा नवा करकरीत स्नातक गेला, तर त्याचा एक प्रकारें अपमान होईल म्हणून त्याने तसें करूं नये असें भारद्वाजांचें म्हणणें आहे.[२] विद्यातेजाच्या महतीची केवढी ही उच्च कल्पना! बारा वाजतां बाहेर पडल्यावर मुखमार्जन करून मेखला, अजिन, दंड वगैरे जे ब्रह्मचर्याश्रमाचे निदर्शक पदार्थ असत, त्यांचा ब्रह्मचाऱ्याने त्याग करावयाचा असे. ब्रह्मचर्याबरोबर त्याचें असिधाराव्रतही समावर्तनाच्या वेळीं संपे; माला, दागिने, छत्री वगैरे पदार्थ ब्रह्मचाऱ्याला न वापरू देण्याचा ज्या गुरूचा कटाक्ष असे तोच गुरु स्वतः समावर्तनाच्या वेळीं स्नातकास सुगंधी पाण्याने स्नान घाली, व मग नवे कपडे, दागिने, पुष्पमाला, जोडा, छत्री वगैरे पदार्थ स्वतः त्यास वापरण्यास देई. मग होम होई व स्नातकास पुष्कळ विद्यार्थी मिळोत अशी प्रार्थना करण्यांत येई. त्यानंतर स्नातकाला मधुपर्क देण्यांत येई.

नवीन कपडे परिधान केलेल्या व मालादिकांनी विभूषित झालेल्या स्नातकास रथांत अगर हत्तीवर बसवून गुरु विद्वज्जनपरिषदेमध्यें नेई. कृतविद्य स्नातक म्हणून त्याची इतर विद्वान लोकांशीं ओळख करून दिल्यावर सभा बरखास्त होई. इतर विद्वान लोक या वेळीं त्याची परीक्षा

---

१. ज. गृ. सू. २. १८ वरील टीका पहा.

२. एतद्धस्स्नातानां ह वा एष एतत्तेजसा तपति तस्मादेनमेतदहर्नाभितपेत्। भा. गृ. सू. २. १. १८.

अशी घेत नसत. फार तर एखाद्या वेळीं एखादा चौकस बहुश्रुत त्यास एखादा प्रश्न विचारी; पण स्नातक होण्याची योग्यता ब्रह्मचाऱ्याचा गुरु स्वतःच ठरवी. विद्वज्जनपरिषदेला त्या बाबतींत अधिकार नसे.

## धनुर्वेदीय व आयुर्वेदीय उपनयन

उपनयन संस्कार हा वेदाध्ययनासंबंधींच प्रथम उद्दिष्ट असे; पण पुढे लष्करी शिक्षण, वैद्यकीय शिक्षण, वगैरे बाबतींतही धनुर्वेदीय उपनयन, आयुर्वेदीय उपनयन, यांसारखे संस्कार सुरू करण्यांत आले. हे संस्कार समाजांत कितपत रूढ होते हें ठरविण्यास फारसा पुरावा नाही. धनुर्वेद उपनयन ज्या वसिष्ठांच्या धनुर्वेदसंहिता नामक पुस्तकांत १०–१२ ओळींत वर्णिलेलें आढळते तें पुस्तक अगदी अर्वाचीन आहे असें दिसतें. आयुर्वेदीय उपनयन चरक व सुश्रुत या दोनही ग्रंथांत आढळतें, पण जेथे आयुर्वेदीय शिक्षणपरंपरा अविच्छिन्न चालत आली आहे त्या बंगाल, संयुक्तप्रांत वगैरे प्रदेशांतही त्याचा आज प्रचार नाही.

धनुर्वेदीय उपनयनाचा अधिकार चारी वर्णांस असे; त्या वेळीं ब्राह्मण विद्यार्थास धनुष्य, क्षत्रियास तलवार, वैश्यास भाला व शूद्रास गदा देण्यांत येई. आयुर्वेदीय उपनयनाचाही सर्व वर्णांस अधिकार असे. शस्त्रक्रियेचा विशेष विचार करणाऱ्या सुश्रुतामध्ये, शूद्र विद्यार्थ्यांनाही आयुर्वेद शिकवावा व त्यांचें अमंत्रक उपनयन करावें, असें सांगितलें आहे. तलवारीचा आनुवंशिक सराव असणारे क्षत्रिय व शूद्र हेच बहुधा व्यवहारांत नाणावलेले शस्त्रक्रियेमधील तज्ज्ञ असावेत; त्यामुळे सुश्रुतामध्ये शूद्रांनाही वैद्यविद्येचा अधिकार आहे, असें मुद्दाम विधान केलेलें असावें असें वाटतें.

आयुर्वेदीय उपनयनामध्यें, होम करून त्यामध्यें धन्वंतरि, अश्विदेव, वगैरे वैद्यविद्याभिमानी देवतांना हवि अर्पण करीत असत. नंतर गुरु ब्रह्मचर्याचे नियम विद्यार्थ्यास समजाऊन देऊन यावज्जीव आयुर्वेदाचें अध्ययन व संशोधन करण्याचें महत्त्व पटवून देई. आपणास माहीत असलेलें सर्व तुला शिकवीन, कांहीही मागे ठेवणार नाही, असेंही तो अभिवचन देई.

## छुरिकाबंधन किंवा खरग् बंधाई

वेदाध्ययन संपलें म्हणजे जसें समावर्तन करण्यांत येई, तसें धनुर्वेदाध्ययन संपलें म्हणजे 'छुरिकाबंधन' नामक विधि करीत असत. लष्करी शिक्षण संपलें म्हणजे एका शुभ दिवशीं इष्ट देवतांचें पूजन झाल्यावर गुरु विद्यार्थ्याच्या कंबरेस एक तलवार लटकावीत असे; त्याचें शिक्षण संपलें याचें ते एक निदर्शक मानलें जाई. या संस्काराचा उल्लेख जरी फक्त नारद स्मृतीत असला[१] तरी तो संस्कार एकोणिसाव्या शतका-मध्येंही राजपुतान्यांत सर्व कुलीन राजपूत घराण्यांत प्रचारांत होता, या कारणास्तव प्राचीन काळीं उच्च कुलांत तो सामान्यत: रूढ होता असे मानण्यास फारसा प्रत्यवाय नाही. राजपुतान्यांत त्यास ' खरग् बंधाई ' म्हणतात व तो लष्करी शिक्षण संपलें म्हणजे विवाहापूर्वी करीत असत.

वैदिकेतर शिक्षणासंबंधीं वरील तीनच धार्मिक संस्कार आढळून येतात. कदाचित् आणखीही कांही प्रचारांत असतील, पण त्यांचा उल्लेख बहुतेक स्मृति ब्राह्मणांनी लिहिलेल्या आहेत म्हणून त्यांमध्ये आला नसावा. ब्राह्मणेतरांनी जर कांही स्मृति लिहिल्या असत्या, तर त्यांमध्ये धनुर्वेदीय उपनयनासारख्या संस्काराचें जास्त सविस्तर विवेचन आढळून आलें असतें.



१. नारदस्मृतींतील या बाबतींतील वचनें वी. मि. सं. पृ. ५८० मध्यें उध्दृत केलेलीं आढळतात.

# प्रकरण दुसरें

# गुरु व शिष्य

एखाद्या शिक्षणपद्धतीचें स्वरूप व कार्यक्षमता चांगली कळून यावयाची असेल तर गुरु व शिष्य यांचीं ध्येयें कोणतीं असत, त्यांचे परस्पर संबंध कशा प्रकारचे असत, त्यांचा आयुष्यक्रम कसा असे, याचें आपणास चांगलें ज्ञान व्हावयास पाहिजे. सबब या प्रश्नाचा ऊहापोह या प्रकरणामध्यें करण्याचें योजिलें आहे.

## गुरूचें महत्त्व

हिंदु शिक्षणपद्धतींत गुरूचें जितकें महत्त्व मानलें आहे, तितकें इतरत्र क्वचितच आपणास पाहावयास सापडेल. गुरु हा शिष्याचा आध्यात्मिक पिता असल्यामुळे आईबापांपेक्षाही गुरूला अधिक मान देण्यांत येई. गुरूच्या आध्यात्मिक पितृत्वाची कल्पना अथर्ववेदापासून तों थेट आधुनिक ग्रंथांपर्यंत आढळते.[१] अज्ञानांधकारांतून ज्ञानाच्या प्रकाशांत नेणारा वाटाड्या म्हणून त्याचें महत्त्व फार मानलें जाई. गुरूशिवाय विद्येमध्यें प्रावीण्य मिळणें शक्य नाहीं, अशी कल्पना समाजांत इतकी दृढमूल होती की एकलव्यास जेव्हा द्रोणाने शिष्य म्हणून स्वीकारण्याचें नाकारलें तेव्हा पानाच्या द्रोणासच गुरु मानून, त्याची पूजा करून, त्याने आपल्या अक्कलहुशारीच्या जोरावर धनुर्विद्या शिकण्यास प्रारंभ केला.[२] बौद्ध धर्मामध्यें गुरूचें महत्त्व मोठें मानलें आहे. संघामध्यें आलेल्या 'सद्धिविहारक' उर्फ नवभिक्षूने दहा वर्षें सतत गुरूच्या देखरेखीखाली राहून अध्ययन केलें पाहिजे असा बुद्धाचा कटाक्ष होता. त्याप्रमाणें बौद्ध लोक सातव्या शतकापर्यंत वागत असत हें इत्सिंगच्या प्रवासवृत्तावरून दिसून येतें (लेग्गे, इत्सिंग, पृ. १०४).

अति प्राचीन काळीं लेखनकला अस्तित्वांत नव्हती, व त्यावेळी

---

१. अथर्ववेद ११. ५. ३; बौ. ध. सू. १. २. ४८ पहा.

२. आदिपर्व १४३. ४३ व पुढे.

वेदादि विद्या गुरुमुखाशिवाय शिकणें अशक्य असे, म्हणून साहजिकच गुरूचें फार महत्त्व मानलें जाई. लेखनकला अवगत झाल्यावरही कैक शतकें तिचा उपयोग वेदाध्ययनामध्यें करून घेण्यांत येत नसे. वैदिक स्वर व उच्चार यांची कल्पना प्रत्यक्ष गुरुमुखाने जशी येई, तशी पुस्तकावरून येत नसे; म्हणूनच 'पुस्तकप्रत्ययाधीतं नाधीतं गुरुसंनिधौ। भ्राजते न सभामध्ये जारगर्भ इव स्त्रियः॥' अशा तऱ्हेचीं वचनें संस्कृत स्मृतीत आढळतात. ताडपत्रावर लिहिलेलीं पुस्तकेंही फार दुर्मिळ, महाग व लवकर फाटणारी अशीं असत. उपनिषत्कालामध्ये वेदांतविद्येचा उदय व प्रसार झाल्यावर तर गुरूचें महत्त्व फारच अधिक वाढलें; कारण ब्रह्मविद्येचीं गूढ तत्त्वें फारच गुप्त राखिलीं जात, व त्यामुळें तीं गुरूशिवाय कळणें अशक्य असे.[१] कला व उद्योगधंदे यांमध्यें जें खरें उच्च प्रकारचें कौशल्य असतें तें अनेक वर्षांचा सराव असलेल्या आनुभविक शिक्षकाकडून जसें प्रत्यक्ष मिळूं शकेल, तसें पुस्तकापासून तें मिळत नाही, म्हणून उपयुक्त कलांच्या शिक्षणांतही गुरूचें महत्त्व साहजिकच फार मानलें जाई.

आपणास देण्यांत येणाऱ्या मोठ्या मानास साजेल अशी पात्रता आपल्या अंगीं असावी अशाबद्दल अध्यापक फार प्रयत्न करीत असत. गोपथ ब्राह्मणामध्यें (१. १. ३१) याबद्दल एक बोधप्रद गोष्ट आहे. मौद्गल्य व मैत्रेय या दोन गुरूंमध्यें एकदा वादविवाद झाला. त्यामध्ये मैत्रेय हरला, व त्यास एक विशिष्ट विद्या येत नव्हती असें दिसून आलें. जोंपर्यंत मला ही विद्या येत नाही तोंपर्यंत वर्ग उघडणें दांभिकपणाचें आहे असे उद्गार काढून त्याने लगेच आपल्या विद्यार्थ्यांस रजा दिली, व मौद्गल्याचें शिष्यत्व पतकरलें. सर्व गुरु मैत्रेयाइतके ध्येयवादी नसतील हें खरें, पण वरील उदाहरणावरून गुरूच्या पुढे ठेवलेलीं ध्येयें किती उदात्त असत हें दिसून येईल.

शिक्षकांची कार्यक्षमता वाढण्यास हल्ली ट्रेनिंग कॉलेजामध्ये त्यांना शिक्षण देतात. प्राचीन हिंदुस्थानांत तशा प्रकारचा उपक्रम चालू होता असें दिसत नाही. समावर्तनाच्या वेळीं स्नातकास पुष्कळ विद्यार्थी

---

१. कठ उप० २. ९ व मुण्डक उप० १. २. ३ पहा.

शिकविण्यास मिळावेत अशी जी प्रार्थना करण्यांत येई, तिजवरूनही शिक्षण संपल्यावर लगेंच स्नातक शिकवण्यास पात्र मानला जाई असें दिसून येईल. प्राचीन शिक्षणपद्धति अशा प्रकारची होती, की तीमुळें ट्रेनिंग कॉलेजसारख्या संस्थेची फारशी आवश्यकता भासत नसे. प्रत्येक विद्यार्थ्यास गुरु निराळें शिकवी, त्यामुळें स्वर कसे म्हणावयाचे, उच्चार कसा करावयाचा, वगैरे गोष्टी विद्यार्थ्यास सहज कळून येत. व्याकरण, न्याय, वेदांत वगैरे शास्त्रांचे विद्यार्थी वारंवार शास्त्रार्थ व वादविवाद करीत; रोज गुरूपुढे स्वमतमंडन व परमतखंडन त्यांना करावें लागे, त्यामुळें त्यांच्या विवरणशक्तीचा चांगला विकास होई; व तिचा अध्यापनाच्या वेळीं चांगलाच उपयोग होई. प्राचीन हिंदु विद्यापीठांत प्रौढ विद्यार्थ्यांना नवीन विद्यार्थ्यांस शिकवण्याचें कामही देण्यांत येई; त्यामुळें त्यांना प्रत्यक्ष शिक्षण देण्याचाही थोडाबहुत अनुभव असे. या कारणामुळें ट्रेनिंग कॉलेज सारख्या संस्था प्राचीन हिंदुस्थानांत नव्हत्या असें दिसतें. 'शिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था संक्रान्तिरन्यस्य विशेषरूपा । यस्योभयं साधु स शिक्षकाणां धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥ '[१] या कालिदासाच्या श्लोकावरून जो स्वतः जाडा विद्वान् असून शिकवण्याचें मर्म जाणत असे त्यासच प्राचीन हिंदुस्थानांत उत्कृष्ट शिक्षक म्हणून मान मिळे हें दिसून येईल.

## शिक्षकांची सामाजिक व आर्थिक स्थिति

शिक्षकाचा धंदा प्राचीन हिंदुस्थानांत ब्राह्मणांनी स्वार्थीपणानें आपणाकरितां राखून ठेविला होता अशा प्रकारची भाषा पुष्कळदा अलीकडे ऐकूं येते, पण त्यांत फारसें ऐतिहासिक तथ्य दिसत नाही. ब्राह्म-णांनी जरी तो धंदा आपल्याकरितां राखून ठेविला होता असे मानलें, तरी त्यांत फारसा आपलपोटेपणा नव्हता. वेदान्तादि गहन विषय शिकव-णाऱ्या जाडया पंडितांनाही सामान्यतः सुताराच्या दुप्पटच वेतन मिळे हें लवकरच पुढे वाचकांना दिसून येईल. अशी परिस्थिति असल्यामुळें व्यापारामध्यें लाखो रुपये कमावण्याची महत्त्वाकांक्षा असणारे वैश्य व तरवारीच्या जोरावर ज्यांना लहानसें संस्थान स्थापणें सदा सर्वदा शक्य असे, असे क्षत्रिय यांना शिक्षकवृत्तीचा फारसा हेवा कधीच वाटला नसेल.

---

१. मालविकाग्निमित्र , पहिला अंक.

हें उघड आहे. वस्तुतः अति प्राचीन काळीं वेदाध्यापनासही ब्राह्मणेतरास मनाई नसे. 'योऽब्राह्मणो विद्यामनूच्य नैव रोचेत स एतांश्चतुर्होतॄन्... व्याचक्षीत।....तदेनं निरुच्यमानं प्रकाशं गमयति।' (९. १६) या काठकसंहितेच्या वचनावरून अब्राह्मण किंवा ब्राह्मणेतरही श्रोत्रिय म्हणून प्रसिद्ध असत, व त्यांची शिक्षक म्हणून प्रसिद्धि होण्यास प्रत्यवाय नसे असे दिसून येईल. गुह्यांचें गुह्य जी ब्रह्मविद्या तिच्या अध्यापकांपैकी अश्वपति, जनक, प्रवाहण जैवलि वगैरे सारखे बरेच शिक्षक स्वतः क्षत्रिय होते, व त्यांच्यापाशीं ब्राह्मणही वेदाध्ययन करण्यास जात, असें उपनिषदांवरून दिसून येतें.[१] प्राचीन काळीं जातिभेदाचे निर्बंध हल्लीप्रमाणें नव्हते; त्यामुळें ब्राह्मणेतर जशा वेदादिविद्या शिकवीत, तसे ब्राह्मणही वेदेतरविद्या शिकवीत. लष्करी व वैद्यक शिक्षण, ज्योतिष, सर्पविद्या वगैरे विषय तक्षशिलेमध्यें ब्राह्मण शिकवीत असें जातकांवरून दिसून येतें.[२] बौद्ध धर्म जरी वैदिक धर्माचा प्रतिस्पर्धी होता, तरी त्याच्या अग्रेसर धर्मप्रसारकांपैकी मोग्गलान, सारिपुत्त, नागसेन, वसुबन्धु, नागार्जुन वगैरे सारखे बरेच जण प्रथम ब्राह्मणच होते. यावरून ब्राह्मण लोक प्राचीन काळी सर्व प्रकारच्या विद्यांचें आलोडन करून आपल्या बुद्धिप्रभावाने निरनिराळ्या ज्ञानक्षेत्रांत ज्ञानविस्तारास मदत करीत हें दिसून येईल. पुढे पुढे जातिभेद जास्त तीव्र झाला, व ब्राह्मणांच्या कडे वेदादि वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचें शिक्षण व ब्राह्मणेतरांकडे कला व उद्योगधंदे यांचें शिक्षण अशी वाटणी पडली. या वाटणीमुळें ज्ञानप्रगति व संशोधन यांच्या कार्यास बराच धक्का बसला हें पुढे वाचकांस दिसून येईल.

प्राथमिक शिक्षकांपैकी कांही शिक्षक वैश्य किंवा व्यापारी वर्गापैकी असत. बंगाल व संयुक्त प्रांत यांमध्ये लेखनाचा पेशा मध्ययुगांत कायस्थांमध्यें बराचसा रूढ होता; त्यामुळें त्या प्रांतामध्यें इंग्रजी अमलाच्या सुरवातीस प्राथमिक शिक्षकांपैकी बरेचसे कायस्थ जातीचे होते.

प्राथमिक शिक्षक बहुतेक सर्व गृहस्थाश्रमीच असत. उच्च शिक्षणांत

---

१. बृ. उप. २.१.१४; छां. उप. ५.४.१ पहा.

२. भीमसेन जातक, परन्तप जातक, महासुत सोमजातक हीं पहा.

बहुसंख्य गृहस्थाश्रमी, कांही थोडे वानप्रस्थ व त्याहूनही थोडे संन्यासी असत. शाकुंतलांतील कण्वऋषि, हर्षचरितांतील दिवाकरमित्र, शंकराचार्य, रामानुजाचार्य वगैरे प्रसिद्ध आचार्य वानप्रस्थ किंवा संन्यासी होते, पण अशांची संख्या फार थोडी असे. बौद्ध व जैन गुरु व उपनिषदांतील आचार्य हे सर्व सन्यासीच असत, पण सर्वसंगपरित्याग करून परमेश्वरप्राप्त्यर्थ झटणाऱ्या गुरुशिष्यांचा आपणास येथे विचार करावयाचा नाही.

संस्कृत अध्यापन करणाऱ्या गृहस्थाश्रमी गुरूची प्राप्ति काय असे याबद्दल आपणास फारशी माहिती मिळत नाही. शिक्षकांना निर्वेध मासिक वेतन देणाऱ्या शिक्षणसंस्था आठव्या नवव्या शतकापर्यंत अस्तित्वांत नव्हत्या; त्यापूर्वी व त्यानंतरही शेकडा ९० शिक्षकांना विद्यार्थ्यांकडून आपखुषीने शक्त्यनुसार मिळणाऱ्या गुरुदक्षिणेवरच निर्वाहाकरितां अवलंबून राहावें लागे. सरासरीने वर्षाला अशी दक्षिणा गुरूस सामान्यतः किती मिळे याबद्दल धर्मग्रंथांत कांहीच माहिती मिळत नाही. जातकांमध्ये तक्षशिलेच्या ‘जगप्रसिद्ध’ शिक्षकाबद्दल मधून मधन बरीच माहिती मिळते, पण त्यांची वार्षिक प्राप्ति काय असे याबद्दल निश्चित असें कांहीच कळत नाही. राजपुत्र, श्रेष्ठिपुत्र वगैरे श्रीमान् विद्यार्थ्यांकडून त्यांना १००० कार्षापण म्हणजे सुमारें ३०० रुपये दक्षिणा म्हणून आगाऊ मिळत, पण इतर विद्यार्थी काय गुरुदक्षिणा देत, ३०० रुपये जी दक्षिणा मिळे, ती किती वर्षांकरितां असे, तिच्यामध्यें गुरुगृहीं मिळणाऱ्या भोजनाच्या खर्चाचा अंतर्भाव होई की नाही, वगैरे बद्दल निश्चित स्वरूपाचें कांहीच कळत नसल्यामुळें तक्षशिलेच्या ‘जगप्रसिद्ध’ शिक्षकांचें उत्पन्न किती होतें तें नक्की कळत नाही.

तामिल देशामध्यें सापडणाऱ्या ११ व्या व १२ व्या शतकांतील कांही कोरीव लेखांवरून त्याकाळीं संस्कृत अध्यापकास काय मिळत असे याची विश्वसनीय माहिती मिळते. दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील एन्नायिरम् नांवाच्या गांवीं एक संस्कृत महाविद्यालय होतें, त्यामध्यें व्याकरण, मीमांसा वगैरे विषयांच्या अध्यापकांना सालिना ३६० कळम् भात व वेदांत विषयाच्या अध्यापकास सालिना ४८० कळम् भात वेतनाबद्दल मिळे असें तेथील एका शिलालेखावरून दिसून येतें.[१] यावेळीं कुळकर्ण्याला

---

१. सौथ इंडियन एपिग्रॅफी रिपोर्ट; सन १९१७ मधील ३३३ नंबरचा कोरीव लेख.

व सुताराला सामान्यतः सालिना १५० ते २०० कळम् भात वेतनाबद्दल मिळे; तेव्हा वेदांत, मीमांसा वगैरे सारखे गहन विषय शिकवणाऱ्या जाडचा संस्कृत पंडितालाही कुळकर्णी सुताराच्या दुप्पट किंवा अडीच पटच पगार मिळे, असें दिसून येईल. गुंतूर जिल्ह्यांतील मल्कापुरम् नांवाच्या गांवामध्यें जें विद्यालय होतें, त्यामध्येंही अध्यापकांना सुताराच्या दुप्पटच पगार मिळे.[१] यावेळीं मध्यम स्थितीतील पांच माणसांच्या कुटुंबांस दरसाल भोजन खर्चास सुमारें २०० कळम् भात पुरत असे. संस्कृताध्यापकाची वार्षिक प्राप्ति सुमारें ३०० ते ४०० कळम् असे, म्हणजे अन्नवस्त्रादिकास जो खर्च येई त्याच्या सुमारें दुप्पट त्याचें वार्षिक उत्पन्न असे. अकराव्या शतकामधील परिस्थिति अशी होती व पूर्वीही बहुतकरून तोच प्रकार असावा, असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाही. तात्पर्य हें की, हिंदु समाजांत शिक्षकांना अन्नवस्त्राची ददात पडेल अशी स्थिति नव्हती. सामान्यपणें सुखाने संसारयात्रा करितां येईल इतकी त्यांची प्राप्ति असावी. पण श्रीमंतांच्या सदरांत त्यांचा अंतर्भाव होत नसे, कारण सामान्यतः कुळकर्ण्याच्या दुप्पटच त्यांची प्राप्ति असे. प्राथमिक शिक्षकांची प्राप्ति यापेक्षा बरीच कमी असे. त्यांचें उत्पन्न कुळकर्ण्याच्या सुमारें निम्में असावें असें दिसतें. याबद्दलची अधिक चर्चा सहाव्या प्रकरणांत सांपडेल.

## शिष्यत्वाची पात्रता

सामान्य विद्यार्जनास जातिभेदामुळें फारसा अडथळा येत नसे. वेदाध्ययनाची गोष्ट मात्र निराळी होती. जन्मतः जे शूद्र किंवा अस्पृश्य असतील, त्यांना वेद शिकवूं नयेत असा श्रुतिस्मृतींचा पहिल्यापासून कटाक्ष आहे, ही गोष्ट नाकबूल करणें शक्य नाही. रथकारास उपनय-नाचा अधिकार होता हें खरें पण रथकाराचा धंदा फार महत्त्वाचा, म्हणून वेदकाळीं तो आर्यांच्याच हातांत असे. आर्यांचें अनार्यांवरील श्रेष्ठत्व हें त्यांच्या रथांच्या श्रेष्ठतेवर बरेंचसें अवलंबून होतें, तेव्हा तो धंदा वैदिक कालीं आर्येतरांच्या हातीं असणें शक्य नव्हतें

१ सौ. इं. ए. रि. १९१७, पानें १२२-४

क्षत्रिय किंवा वैश्य वर्णापैकी कांही लोक हा धंदा करीत असावेत हें उघड आहे. तेव्हा रथकारांच्या उपनयनाधिकारावरून शूद्रांना वेदाधिकार प्राचीन काळीं होता हें सिद्ध होत नाही.

समाजांतील एखादा सबंध वर्ग केवळ जन्मामुळे वेदाधिकारास अनधिकारी मानला जावा, ही गोष्ट हल्लीच्या समानतेच्या युगामध्यें कोणी फारशी स्पृहणीय मानणार नाही. शूद्रांना व अतिशूद्रांना देखील जर वेदाधिकार असता तर खरोखर ती मोठी अभिमानाची गोष्ट झाली असती, यांत शंका नाही. पण शूद्रांना वेदाधिकार जो देण्यांत आला नाही त्याचें कारण आर्यांचा हटवादीपणा किंवा गुर्मी हें नव्हतें. लेखनकला जर वेदकालीं अवगत असती, किंवा तिचा शोध अगर माहिती लागल्यावर जर वेद जतन करण्याच्या कामीं तिचा लगेच उपयोग करून घेण्यास सुरुवात झाली असती, तर बहुतकरून शूद्रांना वेदाध्ययन करण्यास मनाई करण्यांत आली नसती. ' मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥ ' या मंत्रावरून वेदोच्चारणामध्यें स्वराची जरी क्षुल्लक चूक झाली, तरी त्यामुळें इष्टप्राप्ति होणार नाही, इतकेंच नव्हे तर अनर्थ कोसळून यजमानाचा किंवा वेद म्हणणाऱ्याचा सत्यानाश होईल अशी आर्य लोकांची प्रामाणिक समजूत होती हें दिसून येईल. शूद्र वगैरेंना जर वेदमंत्र शिकण्याची परवानगी दिली, तर त्यांची भाषा भिन्न व वाणी असंस्कृत असल्यामुळें त्यांच्या वेदोच्चरणामध्यें असंख्य प्रमाद घडतील, व त्यामुळें त्यांच्यावर आपत्ति कोसळतील व वेदपाठ अपभ्रष्ट होतील अशी आर्यांना भीति वाटत होती. त्यामुळेंच शूद्रांना वेदाध्ययनाची मनाई करण्यांत आली होती. जेथे स्वरादिक काटेतोलपणें म्हणण्याची जरूरी नव्हती, त्या स्मृति पुराण वगैरे धार्मिक वाङ्मयाच्या बाबतीत शूद्रांना अध्ययनाची मनाई नव्हती, इतकेंच नव्हे, तर त्रैवर्णिकेतर हिंदु समाजास वेदाधिकार नसल्यामुळें त्याची धार्मिक व आध्यात्मिक हेळसांड होऊं नये याच हेतूने भारतादि ग्रंथ मुद्दाम लिहिण्यांत आले हें ' स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा । इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् ॥ ' यासारख्या वचनावरून स्पष्टपणें दिसून येईल.[१]

१ शांतिपर्व ५०. ४०; ३२८. ४९ ही याबद्दल पहा.

वेदाध्ययनाची गोष्ट सोडून दिली तर इतर सर्व विद्या कोणाही विद्यार्थ्यास शिकतां येत. तो सद्वर्तनाचा असावा, व त्याची बौद्धिक पात्रता असावी एवढीच गुरु खबरदारी घेत असत. मंद बुद्धीची मुलें सामान्य प्रतीच्या विद्यालयांत प्रथम घेत असत, पण बुद्धिमांद्यामुळें त्यांची शिक्षणांत प्रगति होत नाही असें दिसून आलें, म्हणजे शिक्षण बंद करण्याबद्दल त्यांच्या पालकांना सल्ला देण्यांत येई. उच्च शिक्षणसंस्थांमध्ये प्रवेश मिळण्याच्या वेळी मात्र विद्यार्थ्यांची कसून परीक्षा घेत, असें नालंदा, विक्रमशिला वगैरे विश्वविद्यालयांचा जो प्रघात असे त्यावरून दिसून येईल. वरील दोनीही विश्वविद्यालयांमध्यें द्वारपाल किंवा द्वारपंडित नांवाचे अधिकारी असत, ते सर्व प्रवेशेच्छु विद्यार्थ्यांची कसून परीक्षा घेत, व जे लायख असतील त्यांनाच प्रवेश करण्याची परवानगी देत. प्रवेशेच्छु विद्यार्थ्यांपैकी शेकडा वीस ते तीस विद्यार्थीच या प्रवेशपरीक्षेंत नालंदामध्यें पास होत असत, यावरून ही परीक्षा तेथे किती कठीण असे याची चांगली कल्पना येईल.[१] पूर्वीच्या शाळेंतील मागील परीक्षेचा निकाल पाहून पुढील वर्गामध्यें परीक्षेशिवाय बसवण्याचा हल्लीचा प्रघात पूर्वी प्रचारांत नव्हता. प्रवेशाच्या वेळीं प्रत्येक विद्यार्थ्यास आपली तयारी व योग्यता प्रत्यक्ष सिद्ध करून द्यावी लागे.

## गुरुशिष्यांचे परस्पर संबंध

प्राचीन हिन्दुस्थानांत गुरूला फार मोठा मान देत हें आपण मा[illegible] पाहिलेंच आहे. मान जसा मोठा तशी त्याची जबाबदारी मोठी [illegible] कर्तव्य कठीण प्रकारचें असे. गुरुदक्षिणेबद्दल प्रथम करार करून म[illegible] शिक्षण देण्यास प्रारंभ करणाऱ्या अध्यापकाची स्मृत्यादि ग्रंथांमध्यें फा[illegible] निंदा केलेली आढळते. सद्वर्तनी विद्यार्थी कितीही गरीब असला, त्या[illegible] पासून पुढे मागे गुरुदक्षिणा मिळण्याचा संभव कितीही कमी असल[illegible] तरी गुरूला शिकवण्याचें नाकारून त्यास परत पाठवतां येत नसे. त्याच्य[illegible] शिक्षणाचीच नव्हे, तर शक्य तर त्याच्या राहण्याची व पोटापाण्याचीह[illegible] सोय गुरूसच लावून द्यावी लागे. बंगाल, बिहार, संयुक्त प्रांत यांमध[illegible]

---

१. वॉटर्स, ऑन् युआन् च्वांग, भाग २, पृ. १६५ पहा.

ज्या जुन्या संस्कृत पाठशाला आहेत, त्यांमध्यें अद्यापिही विद्यार्थ्यांकडून फी घेण्यांत येत नाही; तेथील शिक्षक स्वत: खटपट करून सार्वजनिक मदत मिळवतात, व विद्यार्थ्यांच्या पोटापाण्याची सोय शक्य तितकी कर-तात.[१] बनारस, कलकत्ता वगैरे ठिकाणीं इंग्रज सरकारने चालवले-ल्या संस्कृत कॉलेजामध्यें देखील जुनीच परंपरा चालू आहे; तेथे विद्या-र्थ्यांकडून फी घेण्यांत येत नाही, त्यांच्या चरितार्थाकरितां लहानशी शिष्यवृत्तीही देण्यांत येते. बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या प्राच्यविद्या-विभागामध्येंही हीच जुनी परंपरा चालू ठेवलेली आहे.

विद्यार्थी विद्येकरितां आल्यावर गुरूला शक्य तितक्या लवकर त्याचा अभ्यासक्रम सुरू करावा लागे. तो सद्वर्तनी आहे का नाही वगैरे गोष्टींची परीक्षा करण्यास त्यास फार तर सुमारें वर्षभर वाट पाहतां येई;[२] पण शिक्षण सुरू करण्यास जर त्याने याहीपेक्षा जास्त वेळ लावला, तर शिष्याचें सर्व पाप त्याचे माथीं लागेल असें वचन कूर्म पुराणामध्य सापडते.[३] स्मृतिकौस्तुभामध्यें (पृ. १७४) विद्यार्थ्यास तत्परतेने विद्या न शिकवल्यामुळें एक गुरु पुढे आम्रवृक्षाच्या जन्मास कसा गेला या-बद्दल एक मनोरंजक गोष्ट सांगितली आहे. समाजाच्या व संस्कृतीच्या हिताच्या दृष्टीने ज्ञानाचा व विद्येचा जितका जास्त प्रसार होईल तितकें चांगलें. ज्यांच्या जवळ एखाद्या विद्येचें ज्ञान आहे त्यांनी तें आपली

---

१. नाडिया गॅझेटीयर, पृ. १८२.

२. वैद्यक विद्यार्थ्यांचें शिक्षण सहा महिन्यांचे आंतच सुरू करावें लागे; अष्टांग-हृदय, सूत्रस्थान, अध्याय २ पहा.

३. संवत्सरोषिते शिष्ये गुरुर्ज्ञानमनिर्दिशन्। हरते दुष्कृतं तस्य शिष्यस्य वसतो गुरुः॥ वी. मि. सं. पृ.५१५. उपनिषदांमध्यें कांही ठिकाणीं ३२ वर्षांनंतर गुरु शिक्षणास सुरुवात करीत असलेले आढळतात (छां. उप. ८, ७, २–३); कांही तंत्रें ५ वर्षेपर्यंत विद्यार्थ्यास शिकवण्यास सुरवात करूं नये असें प्रतिपादितात; (तंत्रराजतंत्र, २. ३७–८) पण या सर्व ठिकाणीं शमदमादि साधनसंपन्न व पूर्ण विरक्त अशा ब्रह्मजिज्ञासू विद्यार्थ्यास परम गुह्य अशीं अध्यात्मतत्वें शिकवण्याचा प्रश्न आहे; त्यांची विरक्ति श्मशानवैराग्याच्या स्वरूपाची आहे, का खरोखरीची आहे हें पाह-ण्यास साहजिकच जास्त वेळ लागे. सामान्य विद्येच्या बाबतींत इतका वेळ शिष्यास वाट पाहण्यास लागत नसे.

खासगी मिळकत आहे असें मानूं नये; जरूर तर योग्य तरुणांना तें मोबदल्याशिवायही त्यांनी शिकवावें, असा हिंदु शास्त्रकारांचा कटाक्ष असे. सर्व दानांमध्यें विद्यादानच अधिक पुण्यप्रद आहे असें मतही अनेक ठिकाणीं नमूद केलेलें आढळतें.

मासिक किंवा वार्षिक ठरविक फी जे वेळेवर देतील त्यांनाच हल्ली शिक्षणसंस्थांमध्यें शिक्षण मिळूं शकतें. प्राचीन हिंदुस्थानांत असा प्रकार नव्हता. सत्पात्र विद्यार्थ्यास निरपेक्षपणें विद्यादान करणें हें एक गुरूचें कर्तव्यकर्म असे; फीचा जर तो करार करूं लागला, तर त्याची समाजांत नाचक्की होई. ' यस्यागमः केवलजीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजो वदंति ।' या कालिदासोक्तीवरूनही तेंच दिसून येईल. सौरपुराणांत ( १०, ४२ ) व अनेक स्मृतींमध्यें भृतकाध्यापकाची फार निंदा केली आहे. पण भृतकाध्यापक म्हणजे गुरुदक्षिणेवर किंवा फीवर निर्वाह करणारा शिक्षक असा मात्र अर्थ नव्हता, कारण सर्वच शिक्षक गुरुदक्षिणा स्वीकारीत. फीचा आगाऊ करार करून ती कराराप्रमाणें मिळाल्याशिवाय शिकवण्याचें जो नाकारी त्याच शिक्षकास भृतकाध्यापक म्हणत. अशी वागणूक ग्रीसमध्यें देखील इ. स. पू. सहाव्या शतकापर्यंत गर्ह्य मानली जाई. आर्थिक मोबदल्यावर गुरुशिष्यसंबंध अवलंबून असूं नये, असें तेथेंही लोकमत होतें. फी घेऊन शिकवण्याची पद्धत 'सॉफिस्टां'नी प्रथम सुरू केली; पहिल्या पहिल्याने लोकांनी त्याबद्दल त्यांची कुचेष्टा केली, पण इ. स. पू. ३०० च्या सुमारास ती पद्धत ग्रीसमध्यें सर्वत्र प्रसार पावली. हिंदुस्थानमध्यें मात्र फीशिवाय शिकवण्याची पद्धति अद्यापिही प्राचीन तऱ्हेच्या पाठशाळांमध्यें चालू आहे हें आपण वर पाहिलेंच आहे.

गुरुदक्षिणेबद्दल आगाऊ करार करूं नये, गरीब विद्यार्थ्यास फुकट शिकवावें असा जसा समाजाचा कटाक्ष असे, तसाच प्रत्येकाने आपल्या ऐपतीप्रमाणें भरपूर गुरुदक्षिणा द्यावी, गरीब विद्यार्थ्यांनी शिक्षण संपल्यावर भिक्षा मागून किंवा आपल्या हिंमतीवर पैसे मिळवून गुरूच्या उपकाराची फेड करावी असाही त्याचा आग्रह असे. 'एकमप्यक्षरं यस्तु गुरुः शिष्यें निवेदयेत् । पृथिव्यां नास्ति तद्द्रव्यं यद्दत्वाऽनृणी भवेत् ।' अशा तऱ्हेच्या लघुहारीतादिकांच्या[१] वचनावरून गुरूच्या उपकाराबद्दल पूर्ण

---

[१] पराशर माधव, भाग १, पुस्तक २ पृ. ५३. वर उद्धृत.

उतराई होण्याची जरूरी व जबाबदारी लोकांच्या मनावर कशी ठसविली जात असे हें दिसून येईल.

शिक्षण संपूर्ण झाल्याशिवाय गुरुदक्षिणा घेऊं नये असें स्मृतिकारांचें म्हणणें आहे. पुष्कळ निःस्पृह शिक्षक त्याप्रमाणें वागत असत; जनक राजानें अनेकवार दक्षिणा देऊं केली असतां, अझून शिकवावयाचें संपलें नाही या कारणास्तव याज्ञवल्क्य ऋषींनी ती घेण्याचें नाकारलें होतें.[१] गुरुदक्षिणा केव्हा तरी द्यावयाचीच असे, तेव्हा प्रथम दिलेली काय वाईट, या विचारानें श्रीमंत लोक पुष्कळदा ती प्रथमच देऊं करीत, व सामान्य शिक्षक तिचा स्वीकार करीत, असें कांही जातक कथांवरून दिसून येतें. भीष्मानें जेव्हा द्रोणास कौरव पांडवांना धनुर्विद्या शिकवण्यास बोलावलें,[२] तेव्हा त्यानें त्यास प्रथमच गुरुदक्षिणा देऊं केली होती. पण गुरुदक्षिणा शिक्षण संपल्यावर द्यावयाची, या नियमाचा फायदा घेण्याची प्रवृत्ति धनिक लोकांमध्यें फारशी नव्हती हें यावरून दिसून येईल. आपल्या ऐपतीप्रमाणें व शक्य तर आगाऊही ते दक्षिणा चुकती करीत. गुरुदक्षिणा दिली नाही असा लोकपवाद होणें फार कमीपणाचे मानलें जाई. मिलिंद उर्फ मिनँडर राजास जेव्हा बुद्ध भिक्षु नागसेनानें बौद्ध धर्माचीं निरनिराळीं गहन तत्त्वें चांगलीं समजाऊन दिलीं, तेव्हा राजानें त्यास गुरुदक्षिणा देऊ केली. नागसेन हा सर्वसंगपरित्यागी संन्यासी असल्यामुळें स्वाभाविकच त्यानें गुरुदक्षिणेचा स्वीकार करण्याचें नाकारलें. तेव्हा मिनँडरनें ‘विद्या शिकूनही गुरुदक्षिणा दिली नाही असा जनापवाद उत्पन्न होऊं नये म्हणून तरी दक्षिणेचा स्वीकार करा,’ अशी त्यास पुनः विनंती केली.[३] यावरून गुरुदक्षिणा देणें किती जरूरीचें मानलें जाई हें दिसून येईल. सामान्य लोकांस आगाऊ अगर शेवटीं सर्व गुरुदक्षिणा एकदम देणें हें सारखेंच गैरसोयीचें असे; पण हल्ली प्रमाणें हप्त्या हप्त्यानें गुरुदक्षिणा किंवा फी देण्याची पद्धत सुरू असल्याबद्दल अद्यापि तरी पुरावा मिळत नाही.

---

१. बृ० उप० ४.१.

२. आदि०, १४२. १.

३. मिलिन्द पण्ह, भाग १, पृ. १३४–५.

गरीब विद्यार्थी शिक्षण संपलें म्हणजे जरूर तर भिक्षा मागूनही गुरुदक्षिणेची रक्कम जमवण्याचा प्रयत्न करीत. अशा विद्यार्थ्यांस मदत न करणें हें फार निन्द्य मानलें जाई, हें 'गुर्वर्थमर्थी श्रुतपारदृश्वा रघोः सकाशादनवाप्य कामम् । गतो वदान्यान्तरमित्ययं मे मा भूत्परीवादनवावतारः ॥ ( रघुवंश ५, २४ ) या वचनावरून दिसून येईल. पोष्य नांवाच्या राजाने आपल्या बायकोची अमूल्य कुण्डलें गुरुदक्षिणेकरितां त्यांची याचना करणाऱ्या उत्तंक नांवाच्या स्नातकास दिलीं होतीं; [१] याही गोष्टीवरून गुरुदक्षिणेकरितां स्नातक जें मागेल तें दिलें पाहिजे, असें लोकमत प्रभावी होतें हें दिसून येईल.

असो, हल्लीसारखी फी दिली तरच शिकवावयाचें ही पद्धत प्राचीन हिंदुस्थानांत रूढ नव्हती. सत्पात्र विद्यार्थ्यास शिकविणें हें आपलें कर्तव्य समजून गुरुदक्षिणेबद्दल करार न करितां ब्राह्मण त्यांना शिकवीत. शक्य तितकी जास्त गुरुदक्षिणा देणें हें आपलें कर्तव्य समजून विद्यार्थी व पालक हे दोघेही गुरूचे उतराई होण्याचा प्रयत्न करीत. विद्यार्थिदशेंत जर विद्यार्थ्यांस दक्षिणेच्या रूपाने कांही मिळालें तर तेंही गुरूसच मिळे. [२]

गुरूला आध्यात्मिक पिता म्हणून मानीत हें आपण मागें पाहिलेंच आहे. गुरुशिष्यसंबंध हा त्यामुळें पितापुत्रसंबंधाप्रमाणें मानला जाई. शिष्याने गुरूस आईबापांप्रमाणें मान द्यावयाचा असे; [३] गुरूने शिष्यावर मुलाप्रमाणें प्रेम करावयाचें असे. [४] बौद्ध संघांमध्यें भिक्षु लोक शिष्यांची मुलाप्रमाणें सर्व व्यवस्था करीत. त्यांना कपडे, भिक्षापात्र, औषधें वगैरे मिळवन देत, व आजारी पडल्यास त्यांची आईप्रमाणें सर्व प्रकारची शुश्रूषा करीत. [५] शिकवलें म्हणजे आपलें काम संपलें अशा प्रकारची वृत्ति शिक्षकांमध्यें प्राचीन हिन्दुस्थानांत नव्हती. निद्रा किती

---

१. आदिपर्व, अध्याय ३.

२. आ. ध. सू. १. २. ७. १९; वा. गृ. सू. ७. निर्वाणीच्या प्रसंगीं शिष्यास जी मधुकरी मिळे, तिचा तिसरा हिस्सा गुरूस आपल्या निर्वाहास घेण्याची मुभा असे. शंख, वी. मि सं., पृ, ४८७.

३. निरुक्त २.४ पहा.

४. पुत्रमिवैनमनुकांक्षन् । आ. ध. सू. १.२.८.

५. दिग्घनिकाय ३, पृ. १८९; तककुसू, इत्सिंग पृ. १२०.

घ्यावी, स्नान कसें करावें, आरोग्याचें कसें रक्षण करावें, काय खावें, काय टाकावें, कोणाची संगति धरावी, कोणाची टाळावी, भिक्षेस कोठें जावें, कोठे जाऊं नये, वगैरे बाबतीत शिष्याला योग्य तो उपदेश देण्याची जबाबदारी गुरूवर असे हें मिलिन्दपण्ह भा. १ पृ. १४२ वरून वाचकास दिसून येईल.

आपणास जें कांही येत असेल तें सर्व विद्यार्थ्यांना गुरूस शिकवावें लागे. आपण जर त्याला सर्व शिकवलें तर आपलें श्रेष्ठत्व जाईल, या भीतीने जर गुरूने कांही शिकवावयाचें राखून ठेविलें तर तें फार निंद्य मानलें जाई. आयुर्वेदीय उपनयनांत, 'मला माहीत आहे तें सर्व तुला शिकवीन' अशी औपचारिक शपथही गुरु घेत असे.[१] आपणांस माहीत असलेलें विद्यार्थ्यास सर्व न शिकवणाऱ्या गुरूचा सत्यानाश होतो असें वचन प्रश्नोपनिषदांत आढळतें.[२] कांही थोडे शिक्षक 'आचार्यमुष्टि' मागे राखून ठेवणारे हिंदुस्थानामध्येंही असतीलच; पण प्राय: अध्यापक या बाबतींत किती उदार असत हें अरियपरियेसन सुत्तावरून दिसून येईल. सम्यग्ज्ञान होण्यापूर्वी बुद्ध हा आळारकळाम नांवाच्या गुरूकडे ब्रह्मचारी म्हणून राहिला होता. आपणास आपल्या गुरूने स्वत:स माहीत असलेलें सर्व शिकवून थेट त्याच्या योग्यतेचे कसें बनवलें याचें वर्णन करितांना बुद्ध म्हणतो, "माझें शिक्षण जेव्हा संपलें तेव्हा माझे गुरुजी आळारकळाम यांनी आनंदाने उद्‌गार काढले, 'काय आनंदाची गोष्ट ! मला तुजसारखा गुणग्राही शिष्य मिळाला ! मला जें कांही माहीत आहे त्या सर्वांत तूं पारंगत झाला आहेस; मला जें येतें तें सर्व तुला येतें, तुला जें येतें तें सर्व मला येतें. आम्हां दोघांमध्यें आता कांहीच फरक उरला नाही, म्हणून आपण दोघे मिळून या ५०० शिष्यांच्या अध्यापनाची व्यवस्था करूं या.' "[३] गुरु शिष्यांना किती आत्मीयतेने वागवीत हें वरील उताऱ्यावरून दिसून येईल.

गुरुगृहीं गुरूच्या संसारांतील पडेल तें काम शिष्याने करावयाचें

---

१. सुश्रुत, सूत्रस्थान, अध्याय २.

२. प्रश्न उप०, ६, १.

३. फर्दर डायलॉग्ज ऑफ बुद्ध, पृ. ११६.

असे. श्रीकृष्णांनी सांदीपनी गुरूच्या घरीं अत्यंत कष्टाचींही कामें केलीं होतीं हें सर्वश्रुतच आहे. गोपथ ब्राह्मणावरून (१, १, १-८) अतिप्राचीन कालापासून ही चाल चालत आलेली होती हें दिसून येईल. पण प्रत्यक्ष व्यवहारामध्यें गुरुदक्षिणा देण्यास जे असमर्थ असत अशा गरीब विद्यार्थ्यांसच सामान्यतः हें काम करावें लागे. आगाऊ गुरुदक्षिणा देणारे श्रीमंत शिष्य गुरुगृही गुरुपुत्राप्रमाणें रहात असत असें अनेक जातकांवरून दिसून येतें. गरीब विद्यार्थ्यांना दक्षिणा देण्याचें सामर्थ्य नसे म्हणून ते गुरूच्या घरचीं कामें करून त्यांचे उतराई होण्याचा प्रयत्न करीत. पण गरीब विद्यार्थ्यांना देखील काम सांगतांना त्यांच्या अभ्यासक्रमामध्यें व्यत्यय उत्पन्न न करण्याची जबाबदारी गुरूवर असे. दिवसा त्याचा कामांत बराच वेळ गेला तर त्यांच्याकरितां रात्रीं निराळे वर्ग अध्यापक लोक सुरू करीत.[१] गुरुकार्य करितांना जर एखादा विद्यार्थी मृत्यु पावला तर गुरूला मोठें कठीण प्रायश्चित्त घ्यावें लागे.[२] धौम्यासारखे कांही कठोर गुरु विद्यार्थ्यास जास्त काम सांगत असतील, नाही असें नाही;[३] पण ते बहुसंख्य होते असें दिसत नाही. धौम्याच्या गोष्टीमध्यें देखील त्याचें अलौकिक सामर्थ्य दाखविण्याकरितां वस्तुस्थितीचा बराच विपर्यास केलेला नसेलच असें खात्रीनें म्हणवत नाही.

गुरूनें शिष्यांना प्रेमानें वागवावें याबद्दल सर्व शास्त्रकारांचें एकमत आहे; पण नाठाळ विद्यार्थ्यांवर चौदाव्या रत्नाचा प्रयोग करावा की नाही या बाबतीत त्यांमध्यें मतभेद आहे. शिष्य ऐकेनासा झाला म्हणजे गुरूनें त्याला थंड पाण्याच्या स्नानाची, उपासाची, किंवा गुरुगृहत्यागाची शिक्षा द्यावी, पण शारीरिक दंड देऊं नये, असें आपस्तंब ऋषींचें मत आहे.[४] गौतम ऋषींचें मत थोडेंसें निराळें आहे. शक्य तोंवर छडीचा उपयोग करूं नये, पण नाइलाज झाला तर मात्र बारीक

---

१. धंमंतेवासिका आचरियस्स कम्मं कत्वा रत्तिं सिप्पं उग्गहंति, आचरियभागदायका गिहे जेट्ठपुत्ता विय हुत्वा सिप्पमेव उग्गहंति।—तिलमुट्ठिजातक.

२. बौ. ध. सू., २ १.२७.

३. आदिपर्व, अध्याय १-२.

४. आ. ध. सू., १.२.८.३०.

छडीने पाठीवरच थोडासा मार द्यावा असें त्यांचें म्हणणें आहे.[१] मनुस्मृतीचें मतही तसेंच आहे. सामान्यतः शिक्षक हे मनुगौतमांच्या मताचे अनुयायी असत असें दिसतें. बनारसच्या राजपुत्राची चोरी करण्याची संवय जेव्हा सामोपचाराने जाईना, तेव्हा त्याच्या गुरूने अखेर त्याच्या पाठीवर तडाखे देवविले असें तिलमुट्ठिजातकावरून दिसून येतें. विद्यार्थ्यांच्या हिताच्या दृष्टीने जरूर असेल तेव्हा प्राचीन हिंदुस्थानांत गुरु न्यायनिष्ठुर होत, जरूर तर राजपुत्रांनाही देहदंड देण्यास कचरत नसत हें यावरून दिसून येईल.

प्राचीन काळी पुष्कळ शिष्य गुरुगृहीच राहत व जेवत; त्यांचे परस्पर संबंधही प्रेमळपणाचे असत. त्यामुळें पुष्कळदा शिष्यांपैकी एखादा गुरूचा जावईही होई. गुरुकन्येशीं लग्न करूं नये असें शास्त्रकारांचें मत आहे. गुरुगृहींच पुष्कळ शिष्य राहत असल्यामुळे बखेडे माजूं नयेत, म्हणून हा नियम करण्यांत आला असावा हें उघड आहे. त्याच सबबीवर देवयानीशी लग्न करण्याचें कचाने नाकारलें होतें. पण अतिप्राचीन काळीं या बाबतींत फारसा निर्बंध नसे, असें दिसतें. बनारसच्या एका गुरूने आपली एक मुलगी विद्यार्थ्यांपैकी जो सर्वांत प्रामाणिक होता त्यास दिली होती असें सिलविमंस जातकावरून दिसून येतें. दुसऱ्या एका जातकावरून[२] असें दिसतें की तक्षशिलेला कित्येक आचार्य कुटुंबांमध्यें शिष्यांपैकीच एखाद्यास जावई करण्याची चाल इतकी बद्धमूल झाली होती, की शिष्यास मनांत नसलें तरीही लग्न करण्याशिवाय गत्यंतर नसे. शास्त्रविरोध असला तरी देखील गुरुकन्यांशीं शिष्यांचे विवाह मधून मधून घडत असावेत असें दिसतें.

गुरूंशीं शिष्याने कसें वागावें याबद्दलचे नियम काय होते ते आता पाहूं. देवाप्रमाणें, अग्नीप्रमाणें, किंवा पित्याप्रमाणें शिष्याने गुरूस मान द्यावयाचा असे.[३] गुरु येईल त्यावेळीं उत्थापन देऊन त्यास नमस्कार करावा, त्यास उच्चासन द्यावें, त्याच्यापेक्षा भपकेदार पोषाख करूं नये, वगैरे तऱ्हेची

---

१. गौ. ध. सू., १.२.४८-५०

२. नं. ५४६

३. मनु २, २००; चरक, विमानस्थान ८.४.

शिष्टाचारास योग्य अशी शिष्याची वर्तणूक असावी, असा शास्त्रकारांचा कटाक्ष आहे. गुरूची निंदा करणें किंवा त्याच्या चुगल्या करणें हें मोठें पाप मानलें जाई. याचा अर्थ असा मात्र नव्हता की गुरूच्या दोषाकडे शिष्याने कानाडोळा करावयाचा. एकांतामध्यें गुरूच्या दोषाकडे शिष्याने नम्रपणाने त्याचें लक्ष वेधावें असें आपस्तंबांचें मत आहे.[१] गुरु जर अनाचारी होऊन अधर्म्य आज्ञा करूं लागला तर त्या मुळीच पाळूं नयेत असें गौतम ऋषींनी स्वच्छ सांगितलें आहे.[२] गौतम बुद्धाचें मतही असेंच आहे.[३] कॅथोलिक लोक पोपच्या हातून चुका होणें शक्य नाही असें मानतात; पण गुरूला देवाप्रमाणें मान द्यावा असें सांगणारे आमचे शास्त्रकार गुरूच्या हातून कधींच चूक होणें शक्य नाही असें मुळीच म्हणत नव्हते हें वरील वचनावरून उघड दिसून येईल.

सार्वजनिक शिक्षणसंस्था पांचव्या शतकापर्यंत हिंदुस्थानांत उत्पन्न झाल्या होत्या असें दिसत नाही. त्यानंतरही शेकडा ७५ विद्यार्थी गुरूकडे खासगी रीतीनेच जाऊन त्याच्या हाताखालीं शिक्षण घेत. त्यामुळें प्राचीन हिंदुस्थानांत गुरुशिष्यांचा संबंध साक्षात् असे. हल्ली विद्यार्थ्यांचा व शिक्षणसंस्थांचा संबंध साक्षात् व विद्यार्थ्यांचा व गुरूंचा संबंध परंपरेचा अशी स्थिति आहे. पूर्वीं तशी स्थिति नव्हती. त्यामुळें गुरुशिष्यामध्यें वैयक्तिक व प्रेमाचे संबंध असत व ते अखेरपर्यंत टिकत. पुष्कळ विद्यार्थी शिक्षण संपल्यावर एखादी लहानशी देणगी घेऊन मधून मधून गुरूस भेटण्यास जात असत.[४] गुरूही शिष्यांना परत भेट देत, व त्यावेळी त्याची व अभ्यासाची पूर्ण फारकत झाली आहे की काय याबद्दल चौकशी करीत. अनभिरति जातकामध्यें याबद्दल एक मजेची गोष्ट आहे. स्नातक होऊन परत गेलेलेल्या एका विद्यार्थ्याच्या घरीं एकदा एक गुरु त्यास भेटण्यास गेले, व त्याच्या वेदाध्ययनाबद्दल त्यांनी चौकशी केली. लग्न होईपर्यंत माझा वेदपाठ चोख होता, पण पुढे शिकल्यापैकी बरेंच विसरलों अशी शिष्याने कबुली दिली, व उजळणी करून पुन्हा विसरलेलें पाठ करण्याचें वचन दिलें. गुरुशिष्यांचें दळणवळण परस्परास उपकारक कसें होत असे हें वरील गोष्टीवरून दिसून येईल.

---

१. प्रमादानाचार्यस्य बुद्धिपूर्वकं वा नियमातिक्रमं रहसि बोधयेत्। १.२.६.१३.

२. गो. ध. सू, ३. १. १५.

३. महावग्गण, १. २५. २.

४. आ. ध. सू., १.३. ८. २२, व कोभेय जातक हीं पहा.

# प्रकरण तिसरें

# विद्यार्थिदशा व तींतील जीवनक्रम

विद्यार्थ्यांच्या जीवनक्रमाविषयी थोडेंसें विवेचन मागील प्रकरणांत प्रसंगोपात्त आलेंच आहे; आता त्याबद्दल सांगोपांग विचार करूं. या प्रकरणामध्यें धर्मवाङमयादिकांचें उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांबद्दलच विचार करण्यांत येईल, प्राथमिक व धंदेशिक्षणांतील विद्यार्थ्यांसंबंधींची माहिती पांचव्या व सहाव्या प्रकरणामध्यें आढळेल.

## विद्यार्थ्यांची दिनचर्या

ब्राह्म मुहूर्तावर म्हणजे सकाळीं सुमारें ४॥ वाजतां विद्यार्थ्यांना उठावें लागे. शौच मुखमार्जन झाल्यावर विद्यार्थी प्रातःस्नान करीत, व मग अग्निपरिचर्येच्या कामास लागत. दहाव्या शतकापर्यंत पुरोहित व अध्यापक वृत्तीच्या ब्राह्मणांच्या घरांत अग्निहोत्रें रूढ असत; तेव्हा प्राचीन काळीं ब्राह्मण विद्यार्थी अग्निपरिचर्येमध्यें रोज सकाळ सायंकाळ कांही वेळ घालवीत असले पाहिजेत,हें उघड आहे. विशेषतः पुढे पुरोहितवृत्ति करण्याचा ज्यांचा बेत असे, ते अग्निपरिचर्येकडे बरेंच लक्ष देत असावेत; कारण त्यामुळें त्यांना आपल्या धंद्यांतील व्यावहारिक शिक्षण चांगलें मिळत असे. एन्नायिरम् सारखीं वैदिक शिक्षणाचीं जीं महाविद्यालयें होतीं[१] त्यांमध्यें विद्यार्थ्यांच्या वसतिगृहामध्यें संस्थेचीं अशीं सार्वजनिक अग्निहोत्रेंही बहुधा असावींत असें वाटतें. पण जे विद्यार्थी साहित्य, काव्य, न्याय, वेदान्त वगैरे विषय शिकत असत, ते अग्निचर्या करीत की काय याबद्दल शंका वाटते. ते अग्निचर्या करीत असले तरी बहुतेक ती नांवाचीच असावी असें वाटतें. मध्ययुगामध्यें जेव्हा अग्निहोत्र पुरोहितेतर ब्राह्मणवर्गांतून नाहीसें झालें, तेव्हा तर वेदेतर विषयांचे ब्राह्मण विद्यार्थी अग्निपरिचर्येकडे बिलकुल लक्ष देत नसावेत असें वाटतें.

---

१. या विद्यालयाची सविस्तर माहिती आठव्या प्रकरणांत सापडेल.

स्मृतिग्रन्थ किंवा जातकें या दोहोंमध्येंही वर्ग केव्हा भरत असत याबद्दल बिलकुल माहिती मिळत नाही. प्राय: मुखमार्जन, स्नान व संध्यादि धार्मिक कृत्यें संपली म्हणजे शिक्षणास सुरुवात होत असावी. बौद्ध विहारामध्येंही हीच पद्धत असे.[१] दोन प्रहरी भोजनाची वेळ होईपर्यंत अध्ययन अध्यापन चाले; मग भोजन, विश्रांति वगैरे करितां दोन तीन तास सुट्टी मिळे. सूर्याचा ऊष्मा जरा कमी झाला म्हणजे पुन्हा अध्ययन सुरू होई, व तें सायंकालपर्यंत चाले. यानंतर उपनिषत्कालाच्या अखेरपर्यंत तरी सर्व विद्यार्थी मिळून अरण्यामध्यें समिधा आणण्यास जात. त्या वेळीं विद्यार्थ्यांमध्यें बराच विनोद व थट्टामस्करी चाले, व व्यायाम होऊन त्यांचा वेळ आनंदांत जाई.[२] होमादिकांचा ऱ्हास इ. स. पू. ४०० च्या सुमारास होऊं लागल्यावर समिधाहरणार्थ दररोज जाणें बंद झालें असावें. त्यानंतर सायंकाळचा काळ विद्यार्थी इतर कोणत्या तरी व्यायामामध्यें घालवीत असावेत. अस्तमानाबरोबर संध्यावंदनास सुरुवात होई, व मग पुन्हा सायंकाळच्या होमामध्यें विद्यार्थ्यांचा कांही वेळ जाई. मग भोजन होई व नंतर कांही वेळाने विद्यार्थी झोपत असत. या दिनक्रमामध्यें घरच्या अभ्यासाचा निराळा वेळ दिसून येत नाही; पण त्याची फारशी जरूरीही नसे. शाळेमध्येंच गुरूच्या समोर पाठ करण्याचा वगैरे अभ्यास होई; हल्ली सारखीं पूर्वी प्रत्येक विद्यार्थ्याच्या जवळ स्वत:चीं पुस्तकें नसत; त्यामुळें त्यांना सर्व कांही वर्गामध्येंच शिकावें लागे. झालेल्या पाठाची आठवून उजळणी करणें तेवढें घरीं शक्य असे; संध्याकाळीं जेवणानंतर निजण्यापूर्वीचा वेळ प्रौढ विद्यार्थी याकरितां उपयोगांत आणीत असावेत.

## ब्रह्मचारी व भिक्षाचरण

ब्रह्मचाऱ्याने मधुकरी मागून निर्वाह करावा अशा आशयाचीं अनेक वचनें वेदकालापासून अनेक धर्मग्रंथांत आढळतात.[३] कांहींचें म्हणणें तर ब्रह्मचाऱ्याने दोन्ही वेळां मधुकरी मागावी असें आहे.[४] ' शाकभक्षा:

---

१. तककुम्, इत्सग, पृ. ११७.

२. संजीवक जातक, नं. १५०

३. अथर्ववेद ११. ५. ९; गो. गृ. सू., २. १०; मनु २. ६५; इत्यादि.

४. जै. गृ. सू., १. १८; आ. ध. सू. १. १. ३. २४–५.

पयोभक्षा ये चान्ये यावशाकिनः। सर्वे ते भैक्षभिक्षस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ॥' यासारख्या वचनावरून[1] भिक्षाचरणाचें महत्त्व व पावित्र्य किती मानलें जाई तें कळून येईल. प्राचीन हिंदुस्थानांत भिक्षाचरणाचा निःसंदिग्ध रीतीने अनेकदा सांगितलेला हा नियम विद्यार्थी कितपत पाळीत हें आपणास आता पाहावयाचें आहे.

ब्रह्मजिज्ञासु ब्रह्मचारी किंवा वानप्रस्थ प्रायः मधुकरीवरच निर्वाह करीत यांत शंका नाही. पण आपणास येथे त्या प्रकारच्या ब्रह्मचाऱ्यांचा विचार कर्तव्य नाही. वेद, व्याकरण, धर्मशास्त्र वगैरे विषयांचा जे विद्यार्थी अभ्यास करीत ते सर्व मधुकरीवर राहत की काय, या प्रश्नाचा आपणास येथे विचार करावयाचा आहे. धर्मग्रंथांतील कांही वचनांवरून मधुकरीचा नियम सर्वजण पाळीत नसत असें दिसतें. आठवड्यांतून जो एक दिवस सुद्धा मधुकरी मागत नाही त्या विद्यार्थ्यास गोपथ ब्राह्मण[2] व बौधायन धर्मसूत्र या ग्रंथांत[3] प्रायश्चित्त सांगितलें आहे. याचा ध्वनि असा निघतो की रोज मधुकरी मागितली नाही तरी चाले. 'अश्नीयादष्टवर्षस्तु ब्रह्मचारी प्रगे सदा। तदूर्ध्वमाद्वादशाब्दादश्नीयात्संगवे सदा। तदूर्ध्वं गृहिवद् भिक्षां भोजनं च समाचरेत् ॥' या सुमन्तुवचनावरून[4] बारा वर्षांपर्यंतचे ब्रह्मचारी मधुकरी मागत नसत हें उघड दिसतें. मधुकरी ११-१२ वाजेपर्यन्त मिळणें शक्य नसे व बालब्रह्मचाऱ्याने त्याच्या बरेंच आधी जेवावयाचें असे. प्रौढ ब्रह्मचारीही सर्वजण मधुकरीवर निर्वाह करीत नसत अशाबद्दल बराच पुरावा सापडतो. श्रीमंत आईबापांचे आगाऊ गुरुदक्षिणा देणारे विद्यार्थी गुरूच्याच घरीं जेऊन त्याच्या वडील मुलाप्रमाणें राहत हें आपण मागें पाहिलेंच आहे. मानव गृह्यसूत्रांतील 'भैक्षाचार्यवृत्तिः स्यात्।' (१.१.२) या वचनावरूनही आचार्यांच्या घरीं ब्रह्मचर्याश्रमांत भोजन करून राहणें हें धर्मशास्त्रकारांस संमत होतें असें दिसून येईल. मनूलाही हें मान्य होतें हें त्याच्या गुरूच्या व्याख्ये-

---

१. स्मृ. चं. सं., पृ. १११ वर अत्रि.

२. १.२.१–८.

३. १.२.५२.

४. वी. मि. सं., पृ. ४८६ वर उध्दृत.

वरून स्पष्ट दिसतें.[१] नालंदा, सालोट्गी, एन्नायिरम्, वगैरे ठिकाणच्या महाविद्यालयांमध्यें विद्यार्थ्यांच्या भोजनाची व्यवस्था संस्थेमार्फतच होई, व बनारसला विद्यार्थ्यांकरितां श्रीमंत लोकांनी चालवलेलीं अन्नछत्रें असत हें पुढे आठव्या प्रकरणामध्यें वाचकांस दिसून येईल. वरील सारख्या शिक्षणकेंद्रामध्यें शेंकडो विद्यार्थी राहत; त्यांनी जर मधुकरीचा नियम पाळण्याचें ठरवलें असतें, तर तेथील रहिवाशांवर मोटी आपत्तीच ओढवली असती. कारण ते कितीही उदार मनाचे असले तरी इतक्या विद्यार्थ्यांना मधुकरी घालणें त्यांना शक्य झालें नसतें. हिंदुस्थानांतील विद्यार्थी जे विद्येमध्यें इतके निष्णात होत, त्यास कारण म्हणजे विद्यार्थिदशेंत त्यांना अन्न, वस्त्र व औषधें याबद्दल फिकीर करावी लागत नसे हें होय, असें आपलें मत युआन् च्वांगने नमूद केलें आहे. सारांश, सर्व विद्यार्थी मधुकरी मागत नसत हें उघड आहे. अल्बेरुनीनें ब्रह्मचारी भिक्षेवर निर्वाह करीत असें म्हटलें आहे, हें खरें; पण त्याचें हें विधान स्मृतिनियमाचें भाषांतर आहे, अकराव्या शतकांतील परिस्थितीचें निदर्शक नाही.

शिक्षणक्रमामध्यें अत्यंत गरीब विद्यार्थ्यांनाही दारिद्र्यामुळें अडचण पडूं नये म्हणून मधुकरी मागणें हेंच ब्रह्मचाऱ्याला श्रेयस्कर असा नियम शिक्षणशास्त्रज्ञांनी घालून ठेवला आहे. मधुकरी मागणें हें कर्तव्य ठरल्यावर गरीब विद्यार्थ्यांना उदरनिर्वाहाकरितां भिक्षा मागण्यामध्यें कांहीच कमीपणा वाटणारा नव्हता. सर्व विद्यार्थ्यांनी निदान एक वेळ तरी आठवड्यांतून मधुकरी मागावी असा शास्त्रकारांचा कटाक्ष होता. हेतु हा कीं श्रीमंत विद्यार्थ्यांना देखील गरिबीची कल्पना यावी व आपणास मिळणारें शिक्षण हें आपण देणाऱ्या गुरुदक्षिणेपेक्षा फार जास्त किमतीचें आहे हें कळावें.

नवीन पिढी सुशिक्षित व कार्यक्षम होण्यावरच समाजाचें स्थैर्य व कल्याण अवलंबून असतें. गरीब विद्यार्थी अशिक्षित राहूं लागले तर पुष्कळ हुशार विद्यार्थ्यांचें जन्माचें नुकसान होतें. उचलून पैसा देणें कठीण जातें; जेवावयाच्या वेळीं घरीं तयार असलेल्या अन्नांतून एखादा

---

१. मनु, २.१४२

भाकरीचा तुकडा मधुकरी मागण्यास आलेल्या विद्यार्थ्यास देणें ही सर्वांना सहजसाध्य गोष्ट आहे. शिक्षण घेण्याने गरीब विद्यार्थी समाजोन्नतीस मदत करून समाजास उपकृत करतात; तेव्हा भिक्षाचरणाचें ध्येय विद्यार्थ्यांपुढे ठेवण्यांत समाजाचें आपल्या कर्तव्याकडे लक्ष वेधण्याचाही शास्त्रकारांचा हेतु होता. दुपारीं तयार असलेल्या अन्नांतून एखादा तुकडा देण्यांत पोटास चिमटा बसत नाही, म्हणून मधुकरी नाकारण्याने गृहस्थाचें सर्व पुण्य लयास जातें असें धर्मशास्त्रकार सर्वांना बजावतात.[१] जरूरीपेक्षा जास्त मधुकरी ब्रह्मचाऱ्यानेही मागावयाची नसे, तसें करण्याने चोरीच्या पापाचे तुम्ही वाटेकरी व्हाल असेंही ब्रह्मचाऱ्यास बजावण्यास शास्त्रकार विसरत नाहीत.[२] ब्रह्मचर्य संपलें की भिक्षेची मुभाही संपत असे. दारिद्र्यामुळें योग्य शिक्षण न मिळून तरुण विद्यार्थी खितपत पडूं नयेत म्हणून त्यांना मधुकरी घालणें हें जसें समाजाचें कर्तव्य असे, तसेंच विद्यार्जन झाल्यावर स्वतःच्या पायावर उभें राहणें हेंही विद्यार्थ्याचें कर्तव्य असे. म्हणूनच 'समावृत्तस्य भिक्षा अशुचिकरा' असें बौधायन ऋषि म्हणतात. (बौ. ध. सू., २.१.६३).

पांचव्या सहाव्या शतकापर्यन्त त्रैवर्णिकांमध्यें सहभोजनें होत असत; म्हणून बहुतेक सर्व धर्मसूत्रकार पतित लोकांखेरीज कोणाही त्रैवर्णिकाच्या घरीं मधुकरी मागण्यास ब्रह्मचाऱ्यास परवानगी देतात.[३] ब्राह्मणेतराच्या घरीं मधुकरी मागूं नये हा नियम सहाव्या सातव्या शतकाच्या पुढे घालण्यांत आला.

## ब्रह्मचर्य–नियम

ब्रह्मचाऱ्याने पाळावयाचे नियम सर्वश्रुतच आहेत.[४] गुरुजन, मातापितरें, वृद्धजन इत्यादिकांस त्याने देवाप्रमाणें मान द्यावयाचा असे.

---

१. स्त्रीणां प्रत्याचक्षाणां समाहितो ब्रह्मचारी इष्टं दत्तं हुतं प्रजां पशुन् ब्रह्मवर्चसमन्नाद्यं वृंक्ते। आ. ध. सू., १.१.३.२४.

२. आहारादधिकं वर्णी न क्वचिद्भैक्षमाचरेत्। युज्यते स्तेयदोषेण कामतोऽधिकमाहरन्॥ वी. मि. सं., पृ. ४८६ वर उध्दृत, मनु.

३. आ. ध. सू., १. १. ३. २४–२५ पहा.

४. मनु २. १७५ ते पुढे; याज्ञ. १. २८ ते पुढे; गौ. ध. सू. १. २; अ. गृ. सू., १.२२ व इतरेंमध्ये हे नियम आढळतात.

त्याने सद्वर्तनी असावें; खोटें बोलणें, चाहाडी करणें, वाईट संगत धरणें यांपासून अगदी अलिप्त असावें, याबद्दल शास्त्रकारांचा विशेष कटाक्ष आहे. साध्या राहणीचें महत्त्वही विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न स्मृतिकारांनी फार केला आहे. साधे कपडे वापरणें, काजळ, दागिने, वगैरे न घालणें, मध, मांस, साखर, मिठाई इत्यादिकांपासून परावृत्त होणें, वगैरेकडे विद्यार्थ्यांचें लक्ष स्मृतिकारांनी वेधिलें आहे. जोडा घालूं नये, छत्री वापरूं नये, वगैरे नियमही मोघमपणें मन्वादि स्मृतींत आढळतात; पण देशकालादिकांप्रमाणें असल्या नियमांत थोडा फार बदल करण्याची विद्यार्थ्यांना परवानगी असे. उदाहरणार्थ, द्राह्यायण ऋषीचें मत गांवाबाहेर, वाईट रस्त्यावर, किंवा उन्हामध्यें जोडा किंवा छत्री विद्यार्थ्यांनी वापरण्यास हरकत नाही, असें होतें.[१] राजगृह, पाटणा, वगैरे सारख्या लांब लांबच्या ठिकाणांहून कडक उन्हाने तापणाऱ्या उत्तर हिंदुस्थानांतील रस्त्याने तक्षशिलेला येणारे विद्यार्थी जोडा घालून व छत्री घेऊनच प्रवास करीत, हें जातकांवरून दिसून येतें.[२] त्याचप्रमाणें स्वच्छतेच्या दृष्टीने आवश्यक म्हणून मधून मधून तेल लावून स्नान करण्यासही विद्यार्थ्यांना परवानगी देत; अकराव्या शतकांतील एका कोरीव लेखावरून एका वसतिगृहाच्या जमाखर्चांत विद्यार्थ्यांच्या दर शनवारच्या अभ्यंग स्नानाबद्दल रक्कम खर्ची पडत असे असें दिसून येतें.[३] दलदलीच्या अगर सर्व थंड प्रदेशांत खाटा वापरूं नयेत हा सामान्य नियम बहुतेक अमलांत आणीत नसावेत असें वाटतें. सारांश सत्य बोलणें, ब्रह्मचर्य पाळणें, वगैरे नैतिक नियमांच्या बाबतींत गुरूची फार कदर असे; इतर गोष्टींमध्यें प्रत्यक्ष व्यवहारांत परिस्थितीप्रमाणें जरूर ते फेरफार करण्याची समयज्ञ गुरूंना परवानगी असे.[४] सारांश हिंदु विद्यार्थ्यांची विद्यार्थिदशा म्हणजे एक खडतर वनवास असे, बिचाऱ्यांस परक्याचें घरीं राहावें लागे, भिक्षेवर निर्वाह करावा लागे, सुख म्हणजे काय तें त्यांना माहीतही नव्हतें, अशा

---

१. द्रा. गृ. सू., २–५
२. उदाहरणार्थ, तिलमुट्ठिजातक नं.२५२ पहा.
३. सौ. इ. ए. रि.; १९१५ मधील १८२ वा कोरीव लेख.
४. बौ. ध. सू., २.१.२९.

आशयाचे प्रो. बोकील यांनी काढलेले उद्गार[१] फारसे सत्यास धरून नाहीत हें वरील विवेचनावरून वाचकांना दिसून येईल. साध्या राहणीच्या नियमांच्या बाबतींत देशकालानुरूप करावयाच्या फेरफारासंबंधीं सर्व स्मृतिकारानी विवेचन केलेलें नाही; नियमापेक्षा अपवादाकडेच त्यामुळें विद्यार्थ्यांचें लक्ष वेधेल असें त्यांना कदाचित् वाटलें असावें. पण एकंदरींत उपलब्ध असणाऱ्या सर्व पुराव्याचा विचार केला म्हणजे ब्रह्मचाऱ्यास चैनीने राहतां येत नसलें, तरी समाधानाने व आनंदाने ब्रह्मचर्याचा काल घालवतां येईल अशी परिस्थिति होती हें दिसून येईल. संन्याशाप्रमाणें त्यांनी शमदमादि साधनसंपत्ति कमवावी असें कोठे सांगितलेलें नाही. ब्रह्मचर्य म्हणजे शरीर कमावण्याचा काल असे. म्हणून हिंदु शिक्षण-शास्त्रज्ञांनी पचेल तितकें खाण्यास ब्रह्मचाऱ्यास पूर्ण मुभा दिलेली आहे.[२] त्यांनी ब्रह्मचर्य पाळावयाचें असे, पण पुढे लगेच संन्यास घेण्याची पात्रता यावी म्हणून नव्हे, तर गृहस्थाश्रम सुखाने करतां यावा म्हणून. त्यांनी चैनीचे पदार्थ वर्ज्य करावयाचे होते, पण ते वाईट म्हणून नव्हे, तर अभ्यासक्रम लौकर संपावा म्हणून. सर्व पुरावा विचारांत घेतला तर ब्रह्मचर्यनियमांमध्यें विक्षिप्त असें कांही फारसें आढळत नाही असेंच म्हणावें लागेल.

## आश्रम व गुरुकुल

प्राचीन हिंदुस्थानांत विद्यार्थी जनसंमर्दापासून दूर अशा आश्रमांमध्यें राहून विद्यार्जन करीत असा सामान्य समज आहे. हा समज अगदी चुकी-चाही नाही व सर्वस्वीं बरोबरही नाही. हिंदु संस्कृतीचा उगम अरण्यांतील आश्रमांतून झाला आहे असें कविवर्य रवीन्द्रनाथ टागोर यांचें मत आहे. धर्म, नीतिशास्त्र व तत्त्वज्ञान वगैरे बाबतींत हें मत सर्वस्वी खरेंही आहे. कण्व, सांदीपनि, वाल्मीकि यांसारखे वानप्रस्थ किंवा सन्यासी कुलपति आपापल्या आश्रमांत राहूनच विद्यादान करीत; त्यांच्या सर्व शिष्यांचें शिक्षण आश्रमांतच होई हें उघड आहे. मुमुक्षु साधकांनीच नव्हे, तर

---

१. हिस्टरी ऑफ एज्युकेशन इन इंडिया, भाग १, पृ. १५१.

२. अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः षोडशारण्यवासिनः । द्वात्रिंशतं गृहस्थानाममितं ब्रह्मचारिणाम् ॥ गृहस्थो ब्रह्मचारी च योऽनश्नंस्तु तपश्चरेत् । प्राणाग्निहोत्रलोपेन अवकीर्णी भवेत्तु सः ॥ —बौ. ध. सू., २. ७. ३. ३१–३३.

सामान्य विद्यार्थ्यांनीही शक्य तोंवर जनसंमर्दापासून दूर अशा रम्य अरण्यांत जाऊन अध्ययन करणें चांगलें, कारण तेथें एकाग्रतेमध्यें विघ्नें येत नाहीत; हें हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांनी ओळखलें होतें.[१] शक्य तेव्हा अरण्यांत आश्रम काढून तेथे अध्यापनकर्म गुरु करीत हें तित्तिरिजातकावरूनही दिसून येतें. अर्थशास्त्रामध्येंही ब्राह्मणांच्या आश्रमाकरितां राजाने जागा राखून ठेवावी असें विधान आढळतें.

पण आश्रमांत राहणें हें सर्व अध्यापकांना शक्य नसे, कारण ते प्राय: गृहस्थाश्रमी असत. तक्षशिलेंतील जगप्रसिद्ध शिक्षक शहरांतच रहात होते असें जातकांवरून दिसून येतें. गावामध्यें एखादा मनुष्य मृत्यु पावला, किंवा चोरांचा उपद्रव सुरू झाला म्हणजे शाळेला सुटी द्यावी अशा आशयाचे जे नियम स्मृतींत आढळतात,[२] त्यावरूनही प्राय: शिक्षण गावांतच होत असे हें दिसून येईल. मात्र जनसंमर्दापासून दूर जाऊन अध्ययन-अध्यापन केलेलें चांगलें हें तत्त्व ग्रामनिवासी शिक्षकांनाही मान्य होतें, म्हणून शक्य तेव्हा ते गावालगतच्या निवांत बागेमध्यें किंवा देवालयामध्यें जाऊन अध्यापन करीत. सतराव्या शतकापर्यंत बनारसमध्यें ही चाल चालत असे असें बर्नियरच्या प्रवासवृत्तावरून दिसून येतें.[३]

नालंदा, विक्रमशिला, वगैरे महाविद्यालयांची गोष्ट अगदी निराळी असे. काशी, ऑक्सफर्ड व केंब्रिज विश्वविद्यालये जशी स्वतंत्रपणें खास वसवलेल्या गांवांत हल्लीं आहेत, त्याप्रमाणेच ही प्राचीन विद्यालयें मुद्दाम बांधलेल्या स्वतंत्र विहारांमध्यें भरत असत. अरण्याचें शांत वातावरण व शहराच्या सुखसोयी या दोन्हीही तेथे उपलब्ध असत.

विद्यार्थ्यांनी गुरुगृहीच राहावें असा स्मृतिकारांचा फार कटाक्ष आहे. या बाबतींत त्यक्ष नियम तर आहेतच; पण गुरूच्या आधी विद्यार्थ्याने उठावें व मागून निजावें, मिळालेली मधुकरी त्यांस दाखवावी, वगैरे नियमांवरूनही प्राय: गुरुगृहींच विद्यार्थी राहत हें दिसून येईल. गुरुगृहीं राहून परठिकाणीं अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत मुदतीच्या काय-

---

१. गोपथ ब्रा., १. २. १–८; सामविधान ब्रा., १. १. ४. १.

२. मनु, ४. १०८, ११८.

३. पृ. ३३०.

यांतील मुदती वाढवाव्यात या कात्यायनाच्या वचनावरूनही तेंच दिसून येतें.[१] नाभानेदिष्ट हा गुरुगृही राहत असतांना त्याच्या वडिलार्जित मिळकतीची वाटणी झाली होती, व परत आल्यावर त्याने आपला हिस्सा भांडून मिळविला होता, याबद्दलची जी गोष्ट ऐतरेय ब्राह्मणांत आहे[२] तिजवरूनही पुष्कळ विद्यार्थी गुरुगृहीं खरोखरच राहत हें सर्वांस कबूल करावें लागेल.

विद्यार्थी घरीं न राहतां गुरुगृहीं किंवा छात्रालयांमध्यें विद्यार्जन करूं लागले म्हणजे ते जास्त स्वावलंबी, काटक व व्यवहारज्ञ बनतात म्हणून त्यांना गुरुगृहीं पाठवणें जास्त चांगलें असें हिंदुशास्त्रज्ञांचें मत होतें.[३] उपनयनानंतर गुरुगृहीं राहण्यास जावें असें स्मृतींचें मत आहे हें खरें; पण प्रौढ विद्यार्थीच तेवढे गुरुगृहीं जात असें जातकांतील अनेक गोष्टींवरून दिसून येतें. प्राथमिक शिक्षण लहान मुलें आपल्या घरीच राहून घेत असत. आपल्या गावामध्येंच उच्च शिक्षणाची सोय असली तर प्रौढ विद्यार्थी देखील घरीच राहत असावेत असें दिसतें. छात्रावासाचें किंवा गुरुगृहाचें वळण लागावें म्हणून श्रीमंत आईबापच आपल्या मुलांना गावामध्यें शिक्षणाची सोय असली तरीही बाहेर शिकण्यास पाठवत असावेत, असें वाटतें. गरीब विद्यार्थ्यांची गोष्ट निराळी होती; मधुकरी मागून स्वावलंबनाने त्यांना राहावें लागे, म्हणून ते लहान वयांतच बाहेर पडून, फुकट जेवण्याराहण्याची सोय असली तर छात्रालयामध्यें, नाहीतर गुरुगृहीं राहून काम करून किंवा मधुकरी मागून आपलें शिक्षण संपवीत. त्यांचें सर्व शिक्षण गुरुगृहीं किंवा आश्रमांतच होई.

अभ्यासाकरितां परगावीं राहणाऱ्या विद्यार्थ्यांची राहण्याची सोय काय असे हें आता आपण पाहूं. पुष्कळ शिक्षणकेंद्रांमध्यें विद्यार्थ्यांना राहण्याकरितां वसतिगृहें असत. सालोट्गी विद्यालयाचीं २७ वसतिगृहें होतीं,

---

१. ब्रह्मचारी चरेत् कश्चिद्व्रतं षट्त्रिंशदाब्दिकम्। समावृत्तो व्रती कुर्यात्स्वधनान्वेषणं तत॥ पंचाशदाब्दिको भोगस्तद्धनस्यापहारकः। —पराशर माधव, पुस्तक ३, भाग १ पृ. १४८ वर उद्धृत.

२. २२. ९.

३. पोराणिकराजानो अत्तनो पुत्ते 'एवमेते निहतमानदप्पा सीतण्हक्खमा लोकचरितञ्ञू भविस्संतीति' अत्तनो नगरे दीसापामोक्खे आचारिये विज्जमानेपि सिप्पुग्गहणत्थाय दूरे तिरोरठ्ठं पेसंति। —जातक नं. २५२.

मल्कापुरम्‌ला विद्यार्थ्यांकरितां वसतिगृह व रुग्णालय असे, एन्नायिरम्‌ला ३४० विद्यार्थ्यांची वसतिगृहामध्यें राहण्याची सोय केलेली होती, हें पुढे आठव्या प्रकरणांत दिसून येईल. सार्वजनिक शिक्षणसंस्था व मोफत वसतिगृहें सुमारें पांचव्या सहाव्या शतकामध्यें सुरू झालीं; पण त्यापूर्वी विद्यार्थ्यांची राहण्याची काय सोय होती, त्याचप्रमाणें अग्रहार गावामध्यें याबद्दल काय तजवीज केली जात असे, याबद्दल अद्याप विशेष माहिती मिळत नाही. एका जातकावरून श्रीमंत आईबापांचीं मुलें कधी कधी निराळ्या बंगल्यांत रहात असें दिसतें,[१] पण तिलमुट्ठी जातकावरून पुष्कळदा राजपुत्र देखील गुरूच्या घरांत राहून तेथेच जेऊन शिक्षण घेत असें दिसून येतें. उपनिषदांवरून उद्दालक आरुणि हा आपल्या गुरूच्या घरींच राहत असे असें दिसून येतें.[२] उपकोसल हा जेव्हा उपास करूं लागला तेव्हा त्याची गुरुपत्नी त्यास त्याच्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करूं लागली.[३] उपकोसल हा अर्थात् गुरूबरोबरच रोज जेवत असावा. सार्वजनिक शिक्षणसंस्था निघण्यापूर्वी प्राचीन हिंदुस्थानांत अध्यापक लोक आपापल्या घरीं १०–१५ विद्यार्थी ठेऊन घेत; सामान्यतः त्यांना विद्यार्थ्यांच्या पालकांकडून भोजनखर्चाबद्दल कांही तरी मिळे. पुष्कळ विद्वान् अध्यापकांना राजाकडून अग्रहारादि दानें मिळत, व त्यामुळें गरीब विद्यार्थ्यांना मोफत भोजन पुरवण्याची ऐपत शिक्षकांपैकी कांही जणांना असे. तशी परिस्थिति नसली तर अध्यापकाच्या घरीं विद्यार्थी राहत व मधुकरी मागून निर्वाह करीत.

विद्यार्थिदशेंत गुरुकुलांतच राहावें असा स्मृतिकारांचा आग्रह आहे हें आपण पाहिलेंच आहे. पण विद्यार्थिदशा संपली म्हणजे मात्र चार महिन्यांच्या आंत विद्यार्थ्यानें गुरुकुल अगर वसतिगृह सोडून, आपल्या स्वतःच्या पायांवर उभें राहून, आपल्या आयुष्यक्रमास सुरुवात केली पाहिजे असें ते विद्यार्थ्यास बजावण्यास विसरत नाहींत.[४] फुकट राहण्याखाण्याची

१. नं. ४५६.

२. बृ. उ., ३. ७. १.

३. छां. उ., ४. १०–३.

४. अथाशुचिकराणि।...... । समावृत्तस्य भैक्षचर्या तस्य च गुरुकुले वास ऊर्ध्वं आ चतुर्भ्यो मासेभ्यः। —बौ. ध. सू., २.१.६४.

सोय होते या कारणास्तव निष्कारण विद्यार्थिदशा वाढवण्याची प्रवृत्ति उत्पन्न होऊं नये म्हणून हा नियम केला आहे हें उघड आहे. प्राचीन शिक्षणशास्त्रज्ञ हे कसे धूर्त व मागामागविचारी असत हें यावरून दिसून येईल.

## वार्षिक अधिवेशन व सुट्टया

विद्यालयांच्या वार्षिक अधिवेशनासंबंधीं पाहिजे तितकी माहिती अद्याप उपलब्ध होत नाही. वार्षिक अधिवेशनाच्या प्रारंभी उपाकर्म व शेवटी उत्सर्जन हे विधि होत हें आपण मागें पाहिलेंच आहे. उपाकर्म सामान्यत: श्रावण महिन्यांत व उत्सर्जन माघ महिन्यांत होई; तेव्हा वार्षिक अधिवेशन सुमारें सहा महिन्यांचेंच असावें असें कोणासही सकृद्दर्शनीं वाटेल. फार प्राचीन काळीं, ज्या वेळीं ब्राह्मण, उपनिषदें, षडंगें, वगैरे वाङ्मय अस्तित्वांत यावयाचें होतें व फक्त वैदिक संहिताच विद्यार्थ्यांना पाठ करावयाची असे, त्या वेळीं उत्सर्जनाबरोबर खरोखरच वैदिक विद्यालयांचें वार्षिक अधिवेशन संपत असावें; नाही तर त्या विधीला उत्सर्जन हें नांव पडलेंच नसतें. पुढे जसें वैदिक वाङ्मय एकसारखें वाढूं लागलें, तसें सहा महिन्यांचें अधिवेशन अपुरें वाटूं लागलें व उत्सर्जनानंतरही अधिवेशन पुढे वाढवण्यांत येऊं लागलें. उत्सर्जनोत्तर कालांत विद्यार्थ्यांनी शुक्लपक्षामध्यें वेद व कृष्ण पक्षामध्यें वेदांगें यांचा अभ्यास करावा, अशी जीं स्मृतीमध्यें वचनें आढळतात,[१] त्यावरून हें दिसून येईल. वास्तविक अभ्यासक्रम जेव्हा वाढला तेव्हा उत्सर्जनाचा काल पुढे नेणें जास्त तर्कशुद्ध झालें असतें. पण एकदा पडलेली धार्मिक रूढि बदलणें कठीण म्हणून उत्सर्जनाचा काल तोच ठेऊन अधिवेशनाचीं मुदत पुढे वाढवण्यांत आली. गोभिल गृह्यसूत्रकारास उत्सर्जनानंतर अधिवेशन सुरू ठेवण्याचा विचित्रपणा कळून चुकला होता; वेदांगादिकांच्या अध्ययनाकरितां माघामध्यें दुसरें उपाकर्म करून श्रावणामध्यें त्याचें दुसरें उत्सर्जन करावें, असें त्याने सुचविलें होतें; [२] पण त्याची ही सूचना समाजास पटली नाही.

इसवी सनाच्या पूर्वी कांही शतकांपासूनच विद्यालयांचें वार्षिक अधि-

---

१ जै. गृ. सू., १. १५.; मनु, ४. ९८.

२ गो. गृ. सू., ३. ३. १६ व त्यावरील चंद्रकांताची टीका पहा.

वेशन माघ महिन्याच्या पुढेही चाले हें उघड आहे. पण तें पुढे किती महिने चाले हे निश्चित समजत नाही. कदाचित् हल्लीसारखी वार्षिक अधिवेशनाची कल्पनाच त्या वेळी नसावी. कारण वार्षिक अधिवेशन व त्यानतर वार्षिक सुट्टी अशा प्रकारची व्यवस्था पूर्वी होती असें दिसत नाही. महाविद्यालयांतील विद्यार्थी लांब लांबच्या अंतरावरून येत. पूर्वीच्या काळी हल्लीसारखीं दळणवळणाचीं सुलभ साधनें नव्हती, म्हणून लांबचे विद्यार्थी शिक्षण सपेपर्यंत घरीं परतच जात नसत. तक्षशिलेला पाठवलेले आपले मुलगे परत आले, म्हणजे 'दिट्ठा मे जीवमानेन सुतो दिट्ठो' 'काय आनंदाची गोष्ट ! आपला मुलगा आपल्या हयातींत शिक्षण संपवून परत आलेला आपण पाहिला' असे उद्गार बनारस, राजगृह वगैरे दूरच्या शहरांतील पालक काढीत असत. अर्थशास्त्रामध्यें शिक्षणाकरितां बाहेर गेलेल्या आपल्या पतीची वाट पत्नीने १०–१२ वर्षे पाहावी, व मग वाटल्यास नियोग किंवा पुनर्विवाह यांचा आश्रय करावा असा नियम आढळतो [१] आजकालसारख्या मोठ्या २–३ महिन्यांच्या वार्षिक सुट्ट्या असत्या, तर एकसारखे १०–१२ वर्षे विवाहित विद्यार्थी बाहेर राहिले नसते. विद्यार्थ्यांचें घर जवळ असलें, व त्याचें जर जरूरीचें काम घरीं निघालें, तर त्यांना थोडे दिवस सुट्टी मिळे, असें तित्तिरि जातकावरून दिसतें. प्रत्येक विद्यार्थ्यास सामान्यत: वैयक्तिक रीतीने शिक्षण देण्यांत येई, त्यामुळें मागे पुढे थोडी सुटी घेऊन कांही विद्यार्थी गेले तरी फारशी हरकत होत नसे. सर्व विद्यालयास हल्लीसारखी कांही आठवडे किंवा महिने सुट्टी असे, असें दिसत नाही.

विद्यालयास कांही नित्य व कांही नैमित्तिक सुट्ट्या असत. प्रतिपदा व अष्टमी या दिवशीं अध्यापन नेहमी बंद असे. महिन्यांतून हल्लीच्या रविवारसारख्या आठवड्याच्या अंतराच्या या चार सुट्ट्या असत. चोरांचा उपद्रव, श्रोत्रियाचा किंवा राजाचा मृत्यु, सन्मान्य अतिथीचें आगमन, वगैरे नैमित्तिक कारणांमुळेंही स्वाभाविकपणें अध्यापन बंद करावें लागे.

अतिप्राचीन काळीं ज्या वेळीं गुरुशिष्य हे साध्या गवताच्या खोपटामध्यें राहून, शेतावर स्वत: काम करून उदरनिर्वाह करीत, त्या वेळीं

१ अर्थशास्त्र, ३. ४.

रूढ असलेले कांही अनध्याय ऊर्फ सुट्ट्या स्मृतींतील अनध्यायांच्या यादींत आढळतात. अकालीं ढग येणें, किंवा विजेचा गडगडाट होणें, धुकें पडणें, धुळीचें वादळ होणें, वगैरेबद्दल जे अनध्याय दिले आहेत, ते वर सांगितलेल्या प्राचीन कालापासून चालत आले असावेत. गांवामध्यें किंवा शहरामध्यें पक्क्या घरामध्यें जेव्हा अध्ययनाध्यापनाचें काम पुढे कांही शतकांनी सुरू झालें, तेव्हा बहुतेक असल्या कारणांकरितां अनध्याय पाळीत नसावेत. कोल्हे, कुत्रे, गाढवें वगैरे ओरडूं लागलीं म्हणजे अध्यापन बंद करावें, हा नियमही पुष्कळ ठिकाणी आढळतो. यास कारण म्हणजे वरील प्राण्यांचें ओरडणें अशुभ मानलें जात होतें, व अशुभ वातावरणांत वेदाध्ययन करणें पाप मानलें जाई, हें होय.

अभ्यासक्रम जसजसा नव्या शास्त्रांच्या उदयामुळें व विकासामुळें अधिक अधिक वाढूं लागला, तसतसे वरील सारखे अनध्याय कमी करण्यांत येऊं लागले. अनध्यायाचे वेळी वेदाध्ययन तेवढें वर्ज्य करावें, वेदांगें, पुराणें, इतिहास, व्याकरण इत्यादिकांचा अभ्यास चालू ठेवण्यास हरकत नाही, असें कांही जण प्रतिपादूं लागले.[१] आपस्तंब[२] व बौधायन[३] तर त्याही पुढे जाऊन असें प्रतिपादूं लागले की अनध्यायाच्या वेळी मोठ्यानें तेवढें वेदाध्ययन करावयाचें नसतें, मनांत करण्यास कांही हरकत नाही. 'तत्र सर्वत्र प्राज्ञाप्राज्ञाध्येतृविषयेण गुरुलघुकालानां व्यवस्था ज्ञेया।' (वी. मि. सं., पृ. ५३६) असें जें मित्रमिश्रांचें मत आहे, तेंच सामान्यतः सर्वसमत झालें होतें असें दिसतें. परिस्थितीप्रमाणें कोणाला किती सुट्ट्या द्यावयाच्या, हें त्या त्या शिक्षणसंस्थेवर सोपवलें होतें. जे विद्यार्थी अभ्यासू असत, ते प्रायः महिन्यांतून प्रतिपदा अष्टमीच्याच चार सुट्ट्या घेत. स्वतः ते किंवा अध्ययन करण्याची त्यांची जागा जर अपवित्र झाली, तर तेवढें त्यांना इतर वेळीं अध्ययन थांबवावें लागे.[४] ब्रह्मचर्यास आशौच

१ उदा. मनु २. १०५; कूर्मपुराणामध्ये 'नानध्यायोऽस्ति चाङ्गेषु नेतिहासपुराणयोः। न धर्मशास्त्रेष्वन्येषु पर्वण्येतानि वर्जयेत्॥' असा श्लोक आढळतो. १.२.१४.८४

२ १. ११. ४०.

३ मनसा चानध्याये। १. ३. ११. २४.

४ मनु ४.१२७.

ासल्यामुळें असे प्रसंग क्वचितच येत. अनध्यायांची फार मोठी यादी ाचल्यावर आठवड्यांतून दोन दिवस तरी अभ्यास चाले की नाही अशी ी सकृद्दर्शनीं शंका येते, ती निराधार आहे हें वरील विवेचनावरून कोणासही कळून येईल.

## शिक्षणक्रमाचा अवधि

ब्रह्मचर्य बारा वर्षे पाळावें या मुद्द्यावर सर्व स्मृतिकारांचें एकमत आहे. श्वेतकेतूने ब्रह्मचर्याचें पालन बारा वर्षे केलें होतें.[१] उपकोसलाच्या गोष्टीवरूनही सामान्यतः बारा वर्षांनंतर विद्यार्थी घरीं परत जात, असेंच दिसून येते.[२] पति विद्यार्जनाकरितां बाहेर गेला असल्यास पुनर्विवाह करावयाचा असेल तर ब्राह्मण स्त्रीने बारा वर्षे वाट पाहावी, असें जें अर्थशास्त्रांत म्हटलें आहे, त्यावरूनही ब्रह्मचर्याचा अवधि बारा वर्षांचा असे हें सिद्ध होतें. हा अवधि वेदाध्ययनासंबंधीं होता. संहितापाठ, पद-पाठ, ब्राह्मण, उपनिषद्, व षडंगें इतक्याचें एखाद्या ऋग्वेदी विद्यार्थ्यास अध्ययन करावयाचें असेल, तर त्यास हल्ली ८ वर्षे लागतात. पूर्वीच्या काळी सुट्ट्या अधिक असत म्हणून, किंवा संस्कृत शिक्षणामध्यें उपनयना-नंतरचा कांही काल जात असावा म्हणून, वेदाध्ययनास बारा वर्षांचा काल सांगितला असावा. जर तें लवकर संपलें तर लवकर समावर्तन होई. ज्यांना यज्ञयागादिकांचे गुंतागुंतीचे विधि शिकावयाचे असत, त्यांना आणखी तीन चार वर्षे तरी घालवावीं लागत. ज्यांना दोन, तीन किंवा चार वेद शिकावयाचे असत, त्यांनी अनुक्रमें २४, ३६, किंवा ४८ वर्षे अध्ययन करावें, असा स्मृतीमध्यें नियम आहे. बरेचसे ऋग्वेदांतील मंत्र इतर वेदांत अंतर्भूत आहेत. सामवेद ऋग्वेदाच्या मानाने बराच लहान आहे, तेव्हा चारी वेदाचा अभ्यास करणाऱ्यांनाही पुरी ४८ वर्षे लागत नसावींत. अनेक वेदांचा पाठ करणारे विद्यार्थीही थोडे असत. सामान्य विद्यार्थ्यांनी दीर्घकालीन ब्रह्मचर्य पाळणें चांगलें नाही, असें शिक्षणशास्त्रज्ञांचें मत होतें. ३०, ४० वर्षे ब्रह्मचर्य पाळलें तर विवाहाच्या वेळीं निम्में अधिक

---

१ छां. उप, ६. १. २.

२ छां. उप., ४. १०.

आयुष्य संपून जाणार. 'कृष्णकेशो ह्यग्नीनादधीत' अशी श्रुति आहे, तेव्हा सामान्य विद्यार्थ्यांनी पंचविशीच्या पुढे ब्रह्मचर्यकाल वाढवू नये, असें बोधायनांचें मत आहे.[१] 'विना कुटुंबभरणात्तपो विद्यार्थिनः सदा। द्वीपे निवासितव्यास्ते बद्धा दुर्गोदरेऽथवा'॥ (४. १. १०५) या शुक्र-वचनावरून कौटुंबिक जबाबदारीकडे दुर्लक्ष करून ब्रह्मचर्याचा काळ निष्कारण बेमुदत वाढविणें हिंदु समाजशास्त्रज्ञांस पसंत नव्हतें हें दिसून येईल.

आपल्या स्वतःच्या वेदाचें संपूर्ण अध्ययन करणारे ब्राह्मण थोडेच असत. बहुसंख्य विद्यार्थी सहा, तीन किंवा त्याहीपेक्षा कमी वर्षे वेदा-ध्ययनामध्यें घालवीत हें स्मृतीवरूनच स्पष्ट दिसतें.[२] बौद्ध, जैन व औपनिषदिक तत्त्वज्ञानामुळें वैदिक यज्ञयाग जसे प्रचारांतून जाऊं लागले तसे वेदाध्ययनही मागें पडू लागलें. न्याय, व्याकरण, तत्त्वज्ञान, ज्योतिष, वगैरे नवीन शास्त्राचा विकास जोरानें होऊं लागला होता, व त्यांच्या अध्ययनाकडे स्वाभाविकपणें समाजाचें चित्त जास्त आकर्षण होऊं लागलें होते. त्यामुळें ज्यांचा मानस याज्ञिक वृत्तीवर उपजीविका करण्याचा असे, तेच तेवढे उपनिषदुत्तर कालामध्यें वेद पाठ करण्यामध्यें १०–१२ वर्षे घालवीत; बाकीचे ब्राह्मण विद्यार्थी पंच महायज्ञ व नेहमीचे संस्कार यांना लागणारे आवश्यक वेदमंत्र तेवढे पाठ करीत, व बाकीचा ब्रह्मचर्याचा काल ज्या शास्त्रांत त्याना पारंगत व्हावयाचें असेल त्या शास्त्राच्या व्यासंगांत घालवीत.

न्याय, व्याकरण, धर्मशास्त्र, वेदांत, वगैरे विषयांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना अभ्यासक्रम संपविण्यास किती वर्षे लागत, याबद्दल विश्वसनीय माहिती कोठेच मिळत नाही. स्मृतीमध्यें तर वेदव्यतिरिक्त विषयांच्या अभ्यासाचा विचारच केलेला नाही. तीन वेद व अठरा धंदे यांचा अभ्यास करणारे विद्यार्थी तक्षशिलेला सोळाव्या वर्षाच्या सुमारास जात, असें जातकावरून दिसून येतें, पण तेथे ते किती वर्षे राहत याबद्दल फारशी माहिती मिळत नाही. आयुर्वेदाचा अभ्यास करावयास गेलेल्या

---

१. बौ. ध. सू., १.२.३१.

२. मनु, ३.१.

जीवकास तक्षशिलेस सात वर्षें अध्ययन करावें लागलें होतें. पण वेदांत, धर्मशास्त्र, ज्योतिष वगैरे विषयांच्या विद्यार्थ्यांना आपापले अभ्यासक्रम संपविण्यास किती काल तक्षशिलेस राहावें लागे याबद्दल जातकांत कांहीं माहिती मिळत नाहीं. हल्लीसारखे विशिष्ट मुदतीचे व ठराविक साच्याचे अभ्यासक्रम पूर्वी नसत. ज्ञान हें अगाध आहे, कितीही काल खर्च केला तरी त्याचें पूर्ण आकलन होणें शक्य नाहीं,[१] असें शिक्षणशास्त्रज्ञांचें मत होतें, व तें योग्यही आहे. 'अनन्तपारं खलु शब्दशास्त्रम्' अशा तऱ्हेचीं वचनेंही संस्कृत वाङ्मयामध्यें पुष्कळ आहेत. तेव्हां अध्ययनामध्यें किती काल घालवावा, याबद्दल निश्चित असे नियम हिंदु शास्त्रज्ञानी घालून ठेवलेले नाहींत. ज्ञानजिज्ञासेवर ज्ञानार्जनाचा काल अवलंबून नाहीं. तक्षशिलेला ज्या वेळीं अलेक्झँडर आला होता, त्या वेळीं तेथे ३७ वर्षें अध्ययन केलेले कांहीं विद्यार्थी त्यास आढळले. एकोणिसाव्या शतकामध्यें ज्या वेळीं कालब्रुकने नडियाच्या पाठशाळेस भेट दिली होती त्या वेळीं तेथ कांहीं विद्यार्थी ३७ वर्षांचे होते. पण हें ध्यानात ठेवलें पाहिजे की ज्यांना निष्णात पंडित व्हावयाचें असे, तेच इतका काल अध्ययनांत घालवीत. सामान्य विद्यार्थी आठव्या वर्षी उपनयन झाल्यानंतर पांच सहा वर्षें व्याकरण व वाङ्मय याचा अभ्यास करण्यामध्ये, व त्यानंतर ८–१० वर्षें वेदान्त, धर्मशास्त्र न्याय वगैरे जो त्याचा विषय असेल त्याच्या अध्ययनांत घालवीत, व वयाच्या २२ ते २४व्या वर्षापर्यंत अभ्यासक्रम पुरा करीत.

शिक्षणक्रम संपून गृहस्थाश्रमात प्रवेश केला म्हणजे शिकलेले विसरूं नये याकरिता उपाकर्म व उत्सर्जन हे विधि सर्व समाजाला सक्तीचे कसे करण्यात आले, हे आपण मागें पाहिलेंच आहे. श्वेतकेतूंचें म्हणणे तर

---

१ तैत्तिरीय ब्राह्मण, ३.१०.११.३ मध्यें याबद्दल एक बोधप्रद गोष्ट आहे. भारद्वाज ऋषींनीं एकामागून एक तीन जन्म जेव्हां एकसारखें वेदाध्ययन करण्यांत घालवले, तेव्हां चौथा जन्म तुम्हांला मिळाला तर तुम्ही काय कराल असें त्याना इन्द्रांनीं विचारलें. " तोहि वेदाध्ययनातच मी घालवीन " असें त्यानी जेव्हा उत्तर दिलें, तेव्हा इन्द्रानी त्याना तीन मोठे ढीग दाखविले, व त्यांमधून तीन मुठी घेण्यास सांगितलें व ते म्हणाले " तीन जन्म जरी ज्ञानार्जनामध्यें घालवले तरी मिळणारें ज्ञान हें या तीन मुठींइतकेंच आहे, व मिळवावयाचें ज्ञान या तीन ढिगां इतकें प्रचंड आहे." ज्ञान कसें अगाध आहे हें या गोष्टीवरून दिसून येईल.

दरसाल विवाहानंतरही दोन महिने गुरुकुलांत ज्ञानवर्धन करण्याकरितां घालवावेत असें होतें; पण गृहस्थाश्रमाच्या कर्तव्यामध्यें त्यामुळें व्यत्यय येईल, जर कांही विसरलें असेल तर तेवढ्याकरितांच गुरुकुलीं जावें, असें आपस्तंबांचें मत पडलें,[१] व त्यामुळें ती सुधारणा लोकप्रिय झाली नाही. उपाकर्मानंतर ४–५ महिने गृहस्थांनीही आपल्या विद्येचा 'शिळेपणा' ('यातयामता') काढून टाकण्याकरितां विशेष अभ्यास करावा म्हणून जेव्हा श्रावणी सर्वांना सक्तीची करण्यांत आली, तेव्हा श्वेतकेतु व आपस्तंब यांच्या मतांचा सुंदर मेळ बसवण्यांत आला यांत शंका नाही.

## विद्यार्थी व विवाह

प्राचीन काळीं अध्ययन संपेपर्यंत म्हणजे वयाच्या २२–२४ वर्षांपर्यंत मुलांचे विवाह होत नसत. पण पुढं म्हणजे इ स. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारास मुलींची लग्नें जशी लवकर होऊं लागली तसा मुलांचा विवाहकालही बदलू लागला. कांही विद्यार्थ्यांचे विवाह शिक्षण संपण्यापूर्वीच होत हे अर्थशास्त्रादि ग्रंथामध्यें विद्याभ्यासाकरितां बाहेर गेलेल्या विद्यार्थ्यांच्या बायकांच्या संबधी जे निरनिराळे नियम आढळतात त्यावरून दिसून येईल. कांही जातकांमध्यें विद्यार्थिदशेंतच प्रेमपाशांत गुरफटलेले विद्यार्थी आढळतात,[२] तर कांहीमध्यें आपली अर्धांगी मनासारखी नाही हें उशीरां कळलेल्या विद्यार्थ्यांचें सांत्वन करणारे गुरु दृष्टीस पडतात.[३] मुलींचीं लग्नें रजोदर्शनाच्या पूर्वीं, म्हणजे १२–१३ व्या वर्षी, खिस्ती शकाच्या प्रारंभाच्या सुमारास जेव्हा होऊं लागलीं, तेव्हा स्वाभाविकपणें मुलांचे विवाहही विद्यार्थिदशा संपण्यापूर्वीच, म्हणजे १७–१८ व्या वर्षी करणें भाग पडूं लागलें. इसवीसनाच्या सुरवातीपासून निम्मे अधिक विद्यार्थी शिक्षणक्रम संपण्यापूर्वीच चतुर्भुज होत हें उघड आहे.

---

१ निवेशे वृत्ते संवत्सरे द्वौ द्वौ मासौ समाहित आचार्यकुले वसेद्भूयः श्रुतमिच्छन्निति श्वेतकेतुः। ...। तच्छास्त्रैर्विप्रतिषिद्धम्। निवेशे वृत्ते नैयामिकानि श्रूयते। १. ४. १३. १९–२१. यया विद्यया न विरोचेत पुनराचार्यमुपेत्य नियमेन तां साधयेत्। २. २. ५. १५.

२ जातक नं. ६४.

३ अनभिरति जातक, नं. १८५.

## नैष्ठिक ब्रह्मचारी

संसाराबद्दल पूर्ण विरक्ति ज्यांना वाटे असे कांही ब्रह्मचारी सर्व आयुष्यभर ब्रह्मचर्य पाळून, अध्ययन, अध्यापन, संशोधन व धार्मिक आचरण यांस आपणास वाहून घेत. निष्ठा म्हणजे मृत्यु, म्हणून आमरण ब्रह्मचर्य पाळणाऱ्या या ब्रह्मचाऱ्यास नैष्ठिक ब्रह्मचारी म्हणत. नैष्ठिक ब्रह्मचर्याचें ध्येय वैदिक कालामध्यें फारसें रूढ नव्हतें; 'वीरहा वैष भवति योऽग्निमुत्सादयति' यासारख्या श्रुतिवचनांवरून विवाह करून अग्निपरिचर्येंत आयुष्य घालविणें म्हणजेच मोठा पुरुषार्थ अशी त्या वेळीं समजूत होती असें दिसून येईल. अशा परिस्थितीत नैष्ठिक ब्रह्मचर्य किंवा संन्यास हीं ध्येयें समाजास पटणें शक्य नव्हतें.

इ. स. पू. सातव्या शतकाच्या सुमारास जेव्हा अनेक कुलीन घराण्यांतील तरुण ब्रह्मप्राप्तीच्या मार्गे लागून संसार सोडूं लागले, तेव्हा संन्यास व नैष्ठिक ब्रह्मचर्य हीं ध्येयें हळू हळू लोकप्रिय होऊं लागलीं. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचें ध्येय संन्याशाप्रमाणें मोक्षच असे; पण नैष्ठिक ब्रह्मचारी ध्यानधारणादिकांच्या साधनांऐवजीं वैदिक अध्ययन–अध्यापनानें मोक्ष मिळवण्याचा प्रयत्न करी. स्मृतींमध्यें नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यानें अखेर पर्यंत गुरूपाशीं राहावें, गुरु मरण पावला तर त्याच्या मुलापाशीं किंवा अग्नीपाशीं राहून त्याची सेवा करावी, असे नियम आहेत. व्यवहारांत हे नियम कितपत पाळीत याबद्दल शंका वाटते. विद्याव्यासंग हाच ज्याचा अष्टौप्रहर व्यवसाय तो नैष्ठिक ब्रह्मचारी लवकरच आपल्या विवाहित गुरूपेक्षाही प्रख्यात विद्वान् होऊन कण्ववाल्मीकीप्रमाणें स्वतंत्र विद्यापीठांचा प्रमुख होत असला पाहिजे. गुरुगृहींच तो आपलें उरलेलें आयुष्य घालवी याबद्दल ऐतिहासिक कसोटीला उतरणारा पुरावा मिळत नाही. युआन च्वांगच्या वर्णनावरून लोक नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यास किती मान देत तें चांगलेंच दिसून येतें. "समाज त्यांना अतिशय पूज्य मानी, पण ते फारसे समाजांत मिसळत नसत; स्तुति किंवा निंदा या दोहोंचीही त्यांना पर्वा नसे. शक्य तितकें ज्ञान मिळवावयाचें, हें एकच त्यांचें ध्येय असे. महत्त्वाची माहिती किंवा ज्ञान मिळवण्यास जरूर तर दोन दोनशे

मैलांचा प्रवासही ते आनंदाने पायींच करीत. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांपैकी पुष्कळ जण श्रीमंत कुळांतीलही असत. पण ते स्वखुषीने संपत्तीचा त्याग करून भिक्षावृत्ति स्वीकारीत. निष्कांचनत्व हें दूषण न मानतां तें भूषण मानीत; तत्त्वज्ञानापुढे त्यांस कशाचीच पर्वा नसे "[1] अशा प्रकारच्या नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांच्या परिश्रमाने हिंदूंची निरनिराळ्या ज्ञानविभागामध्यें व विशेषत: तत्त्वज्ञानामध्यें प्रचंड प्रगति होऊं शकली यांत संशय नाहीं. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांपैकी एकाचेंही चरित्र पूर्णपणें आपणांस पाहावयास नसावें ही दुर्दैवाची गोष्ट होय. अशीं जर कांही चरित्रें उपलब्ध असती तर शिक्षण-शास्त्राच्या इतिहासास फार मदत झाली असती.

कालेंकरून नैष्ठिक ब्रह्मचर्याचें उदात्त स्वरूप व प्रयोजन आपले शास्त्रकार अजीबात विसरून गेले, व मुके, आंधळे, नपुंसक वगैरे ज्या लोकांचे विवाह होणें शक्य नसे, त्यांनीच नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळावे असें ते म्हणूं लागले ![2] काय ही नैष्ठिक ब्रह्मचर्याची विडंबना ! केवढें हें आपल्या संस्कृतीचें अज्ञान ! !

---

## प्रकरण चवथें

## शिक्षणक्रम, शिक्षणपद्धति व परीक्षा

उच्च शिक्षणाच्या वेद, वाङ्मय, तत्वज्ञान इत्यादि शाखांमध्यें शिक्षणक्रम, शिक्षणपद्धति व परीक्षा वगैरे कशा प्रकारच्या असत, याचा या प्रकरणांत विचार करण्याचें योजिलें आहे. स्मृतिग्रंथांमध्य या बाबतीत मिळणारी माहिती फार असमाधानकारक व बरीचशी दिशाभूल करणारी आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीनही वर्णांतील तरुणांना १२ वर्षें पर्यन्त वेदाध्ययन करावें, असें स्मृतीचें म्हणणे आहे. क्षत्रिय व वैश्य यांचें

---

१ वॅटर्स, 'ऑन् युआन् च्वांग' भाग १. पृ. १६०-१.

२ पंग्वादीनामनंशत्वादसामर्थ्याच्च शास्त्रतः। नित्यं नैष्ठिकत्वं स्यात्तत्कर्मस्वनधिकारतः॥ संग्रहकार. कुब्जवामनजात्यंधक्लीबपंग्वार्तरोगिणाम्। व्रतचर्या भवेत्तेषां यावज्जीवमनंशतः॥ विष्णु. वा. मि. सं. पान ५५१ वरील वचनें उद्धृत केलीं आहेत.

वेदाध्ययन खरोखरीच कितपत होई, याचें विवेचन पुढील प्रकरणांत करूं; पण ब्राह्मणांमध्यें देखील फारच थोडे वेदाध्ययनार्थ बारा वर्षें खर्ची टाकीत हें लवकरच वाचकांस दिसून येईल. जसजशीं नवीन शास्त्रें उदयास येत, तसतसे अभ्यासक्रमही स्वाभाविकपणें बदलत; म्हणून निरनिराळ्या कालखंडांमध्यें अभ्यासक्रमाचें स्वरूप कसकसें असे, हें आपण आता पाहूं.

## वेदकालाचा पूर्वार्ध

### (सुमारें इ. स. पू. २००० पर्यंत)

या कालखंडामध्यें अभ्यासाचे विषय काय काय असत, हें आपण प्रथम पाहूं. ऋग्वेदामध्यें दुसऱ्या कोणत्याच वाङमयाचा किंवा ग्रंथांचा उल्लेख नाही. अथर्ववेदामध्येंच प्रथम चार वेदांशिवाय इतिहास, पुराण व नाराशंसी गाथा यांचा उल्लेख सापडतो हें खरें,[१] पण या ऐतिहासिक व दंतकथात्मक वाङमयाचा कांही भाग ऋग्वेदकालींही अस्तित्वांत असावा; त्यावरूनच ऋग्वेदामध्यें जी पूर्वकालासंबंधींची किंवा उत्तरध्रुवा-कडील परिस्थितिसंबंधींची थोडीशी माहिती मिळते ती मंत्रकार ऋषींनी घेतली असावी. ज्या आर्य वीरांनी मूलवसतिस्थानापासून हिंदुस्थानापर्यंन्त आपल्या बाहुबलाच्या जोरावर मार्ग आक्रमिला, त्यांच्या स्तुतीच्या नाराशंसी गाथा ऋग्वेदकालीं देखील असल्या पाहिजेत असें वाटतें.

या अतिप्राचीन कालखंडामध्यें वैदिक मंत्र, इतिहास, पुराण व नाराशंसी गाथा हे मुख्य अभ्यासाचे विषय असत. छंदःशास्त्र, याज्ञिक कर्म, (वेदि बांधण्यास जरूर तेवढी) भूमिती, व (यज्ञकाल समजण्याइतकें) ज्योतिष यांकडेही थोडेंबहुत लक्ष देण्यांत येई. व्याकरण व व्युत्पत्तिशास्त्र यांचा लकडा या कालांतील विद्यार्थ्यांच्या पाठीमागे नसे, कारण या शास्त्रांचा अद्याप उदय व्हावयाचा होता.

या कालाची वेदाध्ययनाची पद्धति हल्लीपेक्षा फार निराळी होती. तुकाराम, रामदास, तुळशीदास वगैरेंच्या कविता ज्याप्रमाणें आजकाल लोक पाठ करतात, त्याप्रमाणें या कालामध्यें वैदिक सूक्तें विद्यार्थी पाठ करीत. मूळ पाठामध्यें एका स्वराचा किंवा अक्षराचाहि फरक होतां कामा

---

१ अथर्ववेद संहिता १५. ६. १०.

ायें, ही कल्पना या वेळीं नव्हती. वेदऋचेसारखी ऋचा करणें म्हणजे लोक पुढे मोठें पाप मानूं लागले,[१] पण या कालामध्यें अशा प्रकारची कल्पना कोणाच्या स्वप्नींदेखील नव्हती. या कालखंडामध्यें वैदिक ऋचा लिहिल्या जात होत्या, त्यामुळें स्वाभाविकपणेंच गुरु, शिष्य व प्रौढ कवी हे जुन्या वैदिक मंत्रांप्रमाणें नवे मंत्र तयार करीत. पद्य वेच्यांमध्यें आपल्या कवितांचा समावेश व्हावा, असें ज्याप्रमाणें आधुनिक कवीना वाटतें, त्याप्रमाणें या कालामधील कवींना आपल्या नवीन मंत्रांचा समावेश 'संहिते'मध्यें व्हावा, अशी महत्वाकांक्षा वाटे. ते नवीन मंत्र करीत व पुष्कळांना आपले नवे मंत्र जुन्या मंत्रांपेक्षा सरसही वाटत.[२] अशा कांही नव्या मंत्रांचा समावेश ऋग्वेदसंहितेमध्यें झाला आहे, हें आपणास नव्या व जुन्या कवींचे किंवा पूर्वयुगीन, मध्ययुगीन व अर्वाचीन काव्यांचे जे उल्लेख ऋग्वेदांत आढळतात त्यावरून स्पष्ट दिसून येतें.[३] तसें पाहिलें तर ऋग्वेदापैकी ⅕ भाग पुनरुक्त्यात्मक आहे हें आता पृथक्करणावरून सिद्ध झालें आहे.[४] हल्लीची ऋग्वेदसंहिता म्हणजे या कालखंडांत झालेल्या मंत्रांतील निवडक वेचेच होत.

ज्या वेळीं वैदिक मंत्रांची रचना होत होती, त्यावेळीं अर्थातच वैदिक वाङ्मय हें रामदास,तुकाराम वगैरेंच्या धार्मिक कविता जशा आपण शिकतों, त्याचप्रमाणें लोक शिकत असले पाहिजेत. धंदेवाईक पुरोहितवर्ग सोडला तर इतर बहुसंख्य समाज कांही निवडक सूक्तेंच पाठ करी. हे वेचे पाठ करीत असतां अर्थाकडेच जास्त लक्ष देण्यांत येई; स्वर वगैरेवर विशेष भर देत नसत. पुष्कळदा अर्थ जास्त स्पष्ट व्हावा म्हणून जुन्या दुर्बोध शब्दांऐवजी नवे सोपे शब्दही बदलून घालीत. वैदिकमंत्रांमध्यें उल्लेखिलेल्या कथा किंवा दंतकथा यांचेंही विद्यार्थ्यांना स्पष्टीकरण करण्यांत येई. पुरोहितवर्गामध्यें ज्याला होत्याचा धंदा करावयाचा असे तो होत्यास जरूर तेवढे मंत्र पाठ करी; अध्वर्यु व छंदोगही आपणास जरूर तेवढाच मंत्रभाग शिकत. यामुळेंच पुढे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या संहिता अस्तित्वांत आल्या.

---

१ सचौ, अल्बेरुनि, भा. १. पृ. १२५.

२ आदित्या रुद्रा वसवो जुषन्त इदं ब्रह्म क्रियमाणं नवीयः। ऋ.७.३५.१४. नवं नु स्तोममग्नये दिवः श्येनाय जीजनम्। वस्वः कुविद्वनाति नः॥ ऋ. ५.१५.४.

३ यः स्तोमेभिर्वावृधे पूर्व्येभिर्यो मध्यमेभिरुत नूतनेभिः। ऋ. ३. ३२. १३.

४ ब्लूमफील्ड, ऋग्वेद रिपिटिशन्स, पृ. २० व ६४६ पहा.

## वेदकालाचा उत्तरार्ध व ब्राह्मणकाल
### (सुमारें इ. स. पू. २००० ते इ. स. पू. १०००)

या कालखंडामध्यें संहितांचे मंत्रभाग हे अपौरुषेय मानण्यांत येऊं लागले. लोकभाषाही वेदभाषेपेक्षा भिन्न होऊं लागली; गंगायमुनांच्या खोऱ्यामध्यें पोहोचल्यावर आर्यलोक अनार्य कन्यांशीं विवाह करूं लागले, व त्यामुळें लोकभाषाही जास्तच अपभ्रष्ट होऊं लागली. व्यवहारामध्यें अनार्य शब्द आर्यभाषेमध्ये थोडेसे आले तरी त्यामध्यें फारसें बिघडत नव्हतें, पण अपौरुषेय व प्राचीन मंत्रांमध्यें जर लोकभाषेस अनुरूप असे फरक होऊं लागले, तर मोठा अनर्थ होण्याचा संभव होता अशी त्या वेळीं समाजास भीति वाटत होती. नवीन शब्द घातल्यामुळें अपभ्रष्ट झालेले मंत्र देवांस आवडतील कशावरून ? त्यांना आवडले नाहीत व त्यांनी प्रार्थनेचा स्वीकार केला नाही तर मग सगळेंच मुसळ केरांत गेल्यासारखें नाही का होणार ? अपौरुषेय मंत्र जसेच्या तसे पाठ केले पाहिजेत, नाही तर अनर्थ कोसळेल ही कल्पना अशा तऱ्हेने या युगांत रूढ झाली."मंत्रो हीन: स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह। स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रु: स्वरतोऽपराधात् ।"या श्लोकावरून या कल्पनेचा लोकांच्या मनावर किती पगडा बसला होता हें दिसून येईल.

या कालखंडामध्ये संहितेचा मंत्रविभाग हा स्वर, अक्षर व शब्द यांचा बिलकुल फरक न होईल अशा तऱ्हेनें शाळांमध्यें शिकविण्यांत येऊं लागला. पदपाठ, घनपाठ, जटापाठ वगैरे अद्याप अस्तित्वांत यावयाचे होते. टीकांचें आपण जसें आज परिशीलन करितों, तसेंच या कालखंडामध्यें ब्राह्मणग्रंथांचें अध्ययन करीत; मंत्राइतकें काळजीपूर्वक रीतीने या वेळीं ब्राह्मणग्रंथ पाठ करीत नसत म्हणूनच कांहीं ब्राह्मणग्रंथ नष्ट झाले आहेत. लोकभाषाही या वेळी मंत्रभाषेहून भिन्न झाली होती, म्हणून मंत्रपाठाबरोबर विद्यार्थ्यांना मंत्रार्थही या वेळीं विद्यालयामध्यें समजाऊन देत असत. त्यांच्या सोयीकरितां वेदांतील अवघड शब्दांच्या याद्या या वेळीं तयार करण्यांत येऊं लागल्या. निघंटु, निरुक्त वगैरे ग्रंथ अशाच तऱ्हेने निर्माण झाले. वेदार्थ सांगतां न येणें हें फार कमीपणाचें मानलें

आहे, हें "स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं यो न विजानात्यर्थम्।
योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥" या सारख्या श्लोकांवरून दिसून येईल.

शतपथ ब्राह्मण,[१] तैत्तिरीय आरण्यक[२] वगैरे ग्रंथांवरून इतिहास, पुराण, नाराशंसी गाथा वगैरे वाङमयही या कालीं अस्तित्वांत होतें, असें दिसून येतें. यज्ञयागादिकांच्या सत्रांमध्यें मध्यंतरीं थोडीशी सुट्टी असे, त्या वेळीं जमलेल्या मंडळींच्या मनोरंजनार्थ इतिहास, नाराशंसी गाथा वगैरे पाठ म्हणत असत. अर्थातच विद्यालयांमध्ये या वाङमयाचाही अभ्यास आस्थापूर्वक करण्यांत येई. छन्दःशास्त्र, भूमिति, ज्योतिष यांचाही वैदिक अभ्यासक्रमांत अंतर्भाव होई. या कालविभागामध्यें लोकभाषा व वेदभाषा या दोन भिन्न बोली अभ्यासकांच्या पुढे आल्यामुळें त्यांचा तारतम्यानें अभ्यास होऊन व्याकरणशास्त्र उदयास आलें, व त्याचाही अभ्यास शाळांमध्यें सुरू झाला. यज्ञयागादिकांचें प्रस्थ या युगांत जितकें होतें तितकें मागे किंवा पुढे कधीच नव्हतें; त्यामुळें वैदिक विद्यालयामध्यें वेदपाठ व वेदार्थ यांचा अभ्यास संपल्यावर विद्यार्थ्यांना याज्ञिक प्रक्रिया शिकण्याकरितां चार पांच वर्षें तरी आणखी घालवावीं लागत.

## औपनिषद, बौद्ध व सौत्र काल

### (इ. स. पू. १००० ते इसवी सनाच्या आरंभापर्यंत)

उपनिषदें, बौद्धग्रंथ, जातकें, मिलिन्द पण्ह वगैरे ग्रंथांवरून या कालखंडांतील शिक्षणक्रमासंबंधीं बरीच माहिती मिळते. धर्मसूत्रग्रंथ या कालांतच झाले, पण त्यांवरून फारच थोडी माहिती उपलब्ध होते.

या कालामध्यें वाङमयात्मक शिक्षण व धंदेशिक्षण यांची फारकत झाली नव्हती. मी कवि आहें, माझे वडील वैदिकी करितात, व आईचे वडील पाथरवटाचा धंदा करितात[३] असें एक वैदिक ऋषि म्हणतात,

---

१ ११. ३. ८. ८.

२ २. ९.

३ कारुरहं भिषक्पिता उपलप्रक्षणी नना। नानाधियो वसूयवोऽनुगा इव तस्थिम ॥ ऋग्वेद, ९. ११४. ३.

त्यावरून वेदकालींही तशीच स्थिति होती हें दिसून येईल. ब्रह्मविद्या शिकण्यास आलेल्या नारदास जेव्हा सनत्कुमारांनी, तूं काय काय शिकला आहेस, असें विचारलें तेव्हा वेदाप्रमाणें ज्योतिष, लष्करी विद्या, गायनकला, जादूटोणे, हेही मला येतात असें त्यांनी सांगितलें.[१] मिलिन्दपण्हावरूनही[२] वेदविद्येबरोबर ब्राह्मणसुद्धा वरीलसारख्या विद्या शिकत असें दिसतें. जातक ग्रंथांवरून ब्राह्मण व क्षत्रिय हे दोघेही या वेळी तीन वेद व अठरा शिल्पे किंवा धंदे शिकत असें दिसून येतें. धनुर्वेद, आयुर्वेद, इन्द्रजाल, विषविद्या, ज्योतिष, कायदा, गणित, जमाखर्च, व्यापार, शेतकी पशुपालन, हस्तत्थ (?), राज्यशास्त्र, गायन, वादन, नर्तन, चित्रकला व वास्तुशास्त्र या १८ धंद्यांचा बहुतेक १८ शिल्पांमध्यें समावेश होत असावा.[३] एकाच विद्यार्थ्याला जातकांत म्हटल्याप्रमाणें तीन्ही वेद व अठरा शिल्पें यांत प्रावीण्य मिळवणें शक्य नव्हतें. पण तक्षशिलेंतील महाविद्यालयामध्यें वाङ्मयात्मक शिक्षणाबरोबर ब्राह्मणांना वरील धंद्यांपैकी कांही धंदे शिकवीत व क्षत्रियांना वरील धंद्यांबरोबर थोडेसें वैदिक शिक्षणही देत

१ छांदोग्य, ७. २. २.

२ भाग १, पृ. २४७.

३ महावग्ग ७. १. ६, अनभिरतिजातक, चोम्पेय जातक व परंतप जातक यांवरून वरील यादींतील २ ते ५ यांचा समावेश शिल्पांमध्यें होत होता असें दिसतें. ६–१३ यांना मुख्य शिल्पे मानीत असें मज्झिम निकाय भाग १, पृ. ८५ वरून दिसून येतें. १४–१८ यांचा अंतर्भाव आम्हीं तर्कानेच या यादींत केला आहे. पण त्यांस सांख्य ब्रा. २९.५ व मिलिंद पण्ह यांचा थोडासा आधार आहे. मिलिन्द पण्ह भाग १ पृ. ६ वर शिल्पांची संख्या १९ आहे असें सांगून त्यांची यादी दिलेली आहे पण ती विश्वसनीय नाही; कारण १९ शिल्पांमध्यें तेथे धर्मशास्त्र, न्याय, वैशेषिक, वेद, पुराण व इतिहास यांचाही अंतर्भाव केलेला आहे! विष्णुपुराण ३.६.२८ मध्यें ब्राह्मणांनी अभ्यासावयाच्या अठरा शास्त्रांची जी यादी दिली आहे तिजमध्येंही चार वेद, सहा वेदांगें, पुराण, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र हीं चार उपांगें व आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, व अर्थशास्त्र हे चार उपवेद इतक्यांचा अंतर्भाव केला आहे. मिलिन्दपण्हांतील यादी वरील सारख्या १८ शास्त्रांच्या यादीवरून घेतलेली दिसते. कलाकौशल्य किंवा उद्योगधंदा यांची कल्पना शिल्पामध्यें प्रधान आहे, तेव्हा आम्ही वर दिलेल्या यादीवरूनच १८ शिल्पांची सर्वांत चांगली कल्पना येते असें आढळून येईल.

यांत मुळींच संशय नाही. ब्राह्मणांनी धंदेशिक्षण घेऊं नये व ब्राह्मणेतरांनी वैदिक शिक्षणाच्या भानगडींत पडूं नये, अशी अनिष्ट प्रथा अद्याप समाजांत पडली नव्हती.

वाङमय, तत्त्वज्ञान, उद्योगधंदे व भौतिक कला यांचा विस्तार व प्रगति या कालखंडांत फारच झपाट्याने झाली. त्याचा परिणाम शिक्षणक्रमावर झाल्याशिवाय राहिला नाही. वाङमयशाखेमध्यें वेदावरच मागे भर दिला जाई, पण वैदिक कर्ममार्गावरील लोकांची श्रद्धा हळू हळू उडूं लागल्यामुळें, व व्याकरण, धर्मशास्त्र, न्याय, सांख्य, योग, वेदांत वगैरे नवीन शास्त्रें उदयास आल्यामुळें, या नवीन शास्त्रांचेंच परिशीलन या वेळी विद्यालयांमध्यें अधिक होऊं लागलें. निरुक्त, उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व अर्थशास्त्र यांमध्यें पूर्वकालीन अनेक ग्रंथकारांचीं नांवें आढळतात; त्यावरून या शास्त्रांवर हल्ली उपलब्ध असलेल्या ग्रंथांपेक्षा पुष्कळ ग्रंथ या कालखंडामध्यें लिहिले गेले होते, हें दिसून येईल. अर्थात् या विषयांचा व्यासंगही पुष्कळच लोक करीत असले पाहिजेत हें उघड आहे. ब्राह्मणांपैकी सुमारे शेकडा १५ जण या कालामध्यें वेदाभ्यास करून वैदिक बनत असत; बाकीचे ब्राह्मण जरूरीपुरते थोडे वेदमंत्र शिकून न्याय, व्याकरण, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रांचा व्यासंग करीत.

या कालामध्यें आर्यांचा विस्तार सर्व उत्तर हिंदुस्थानभर झाला होता, त्यामुळें वेदांच्या अनेक शाखा व चरण अस्तित्वांत आले होते. वेदपाठी ब्राह्मण प्रायः आपापल्या शाखांचेंच अध्ययन करीत. पदपाठ, जटापाठ, घनपाठ वगैरे या वेळी अस्तित्वांत आले होते, व तेही वैदिक विद्यार्थ्यांना पाठ करावे लागत. ब्राह्मण, उपनिषदें, आरण्यकें वगैरे ग्रंथ या कालखंडाच्या उत्तरार्धांत श्रौत मानण्यांत येऊं लागले होते, व त्यांचाही अंतर्भाव या वेळीं वेदाध्ययनांत होऊं लागला. वैदिक ब्राह्मणांपैकी कांहींना तरी अद्याप वेदमन्त्रांचा अर्थ समजत असे, हें 'अन्यो वेदपाठी । न तस्य स्थानम् ।' या मानवगृह्यसूत्रांतील वचनावरून दिसून येईल.[१] पण वेदांचा अर्थ न समजणारेच वैदिक या कालांत बहुसंख्य असत.

---

१ १. २. ३.

या कालामध्यें तत्वज्ञानाच्या उच्च अभ्यासक्रमामध्यें निरनिराळ्या मतांचें व धर्मांचें तौलनिक अध्ययन होत असे. सनातनी, बौद्ध व जैन लोकांमध्यें या वेळीं नेहमी वादविवाद चालत; त्यामुळें प्रत्येकाला इतर धर्मांच्या ग्रंथांचें परिशीलन करावें लागे. मिलिन्द पण्हांतील प्रसिद्ध बौद्ध भिक्षु नागसेन यानें वैदिक वाङ्मयाचा चांगलाच अभ्यास केला होता.[१] हिंदु व जैन धर्ममार्तंडही नागसेनाप्रमाणें आपल्या विरोधकांच्या मतांचें चांगलें परिशीलन करीत असले पाहिजेत हें उघड आहे. तत्वज्ञानाच्या उच्च श्रेणीच्या विद्यार्थ्यांकडूनही त्याचप्रकारें तत्वज्ञानाचा तौलनिक अभ्यास त्याचे गुरु करून घेत असावेत असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाही.

## स्मृतिपुराणकाल

### (सुमारें इ. स. प्रारंभापासून ते इ. स. १२०० पर्यंत)

या कालामध्यें वैदिक शाखांचा अभ्यासक्रम सामान्यतः मागील कालखंडाप्रमाणेंच होता; पण दिवसेंदिवस वैदिक मंत्राचा अर्थ समजून घेण्याची प्रवृत्ति कमी होत चालली होती. तिला आळा बसावा म्हणून वेदार्थाचें महत्त्व समाजाच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न शिक्षणशास्त्रज्ञ करीत होते;[२] पण त्याचा परिणाम फारसा झाला नाही. अल्बेरुनीच्या वृत्तांतावरून अकराव्या शतकाच्या सुमारास वैदिक मंत्रांचा अर्थ सामान्यतः वैदिक ब्राह्मणांना कळत नसे असें दिसून येतें. 'वेदार्थद' आडनांवाच्या कांही ब्राह्मणांचा उल्लेख क्वचित्प्रसंगीं बाराव्या शतकांतील शिलालेखांतही आढळतो;[३] पण असे ब्राह्मण फार थोडे असत. वेदांत, पूर्वमीमांसा, धर्मशास्त्र, काव्य, अलंकार, वगैरे विषयांतील ग्रंथांवर या कालामध्यें अनेक टीका लिहिण्यांत आल्या, पण वेदावर कांहीच लिहिण्यांत आल्या

---

१ भाग. १ पृ. ३४

२ योऽधीत्य विधिवद्वेदं वेदार्थं न विचारयेत्। स संमूढः शूद्रकल्पः पात्रतां न प्रपद्यते॥ पद्मपुराण, आदिखंड, ५१. ८६.

यथा पशुर्भारवाही न तस्य लभते फलम्। द्विजस्तथार्थानभिज्ञो न वेदफलमश्नुते॥ याज्ञवल्क्य १.५१ वर अपरार्कोद्धृत व्यास.

३ इं. अँ., १४. पृ. ६९.

नाहीत. यावरूनही वेदार्थसंशोधनाकडे या वेळीं वैदिक ब्राह्मणांचें फारसें लक्ष नसे, असाच निष्कर्ष काढावा लागतो.

सामान्यत: वैदिक ब्राह्मण आपापल्या शाखांचा व वेदांचा अभ्यास करीत. ताम्रपट्टांतील दानग्रहण करणाऱ्या ब्राह्मणांपैकी कांही ब्राह्मणांचीं आडनांवें चतुर्वेदी, त्रिवेदी, द्विवेदी अशा प्रकारचीं आढळतात, पण ते ब्राह्मण स्वत: या कालखंडामध्यें अनेक वेदांचें अध्ययन करीत असत का त्यांच्या पूर्वजांच्या अध्ययनावरून त्यांची हीं आडनावें पडलेलीं होतीं हें सांगणें कठीण आहे. महाविद्यालयामध्यें अध्यापन करणारे कांही वैदिक ब्राह्मण संहिता, पदपाठ, क्रमपाठ, अनुक्रमणिका, कल्प, उपनिषदें यांच्याशिवाय पुराण, इतिहास व धर्मशास्त्र यांचाही व्यासंग करणारे चतुरस्त्र विद्वान असत असें कोरीव लेखांवरून आढळून येतें.[१] 'बुद्धिमान-भ्यसेन्नित्यं बहुशास्त्राण्यतंद्रित:' या वचनाप्रमाणें वागणारे ब्राह्मण अध्यापक वर्गामध्यें असत असें यावरून दिसून येईल. वेदाध्ययन हें या कालखंडामध्यें मागल्यापेक्षा देखील कमी लोकप्रिय झालें होतें अशाबद्दल पुरावा सांपडतो .'न वेदमनधीत्यान्यां विद्यामधीयीत, अन्यत्र वेदांगस्मृतिभ्य: ।' या शंखवचनावरून[२] धर्मशास्त्राचें अध्ययन करणाऱ्यांना वेदाध्ययन करण्याची तत्त्वत: जरूर नाही, हें तत्त्व या वेळीं समाजांत मान्य होऊं लागलें होतें असें दिसतें. मागील कालखंडांमधील धर्मग्रंथांमध्यें अशा तऱ्हेचीं वचनें नाहीत व सापडणेंही शक्य नाही. या वेळचे शुक्रासारखे कांही शास्त्रकार तर वेदाध्ययन म्हणजे पोपटपंची आहे; त्यायोगानें बुद्धिमांद्य उत्पन्न होतें असें उघडपणें प्रतिपादीत होते.[३] वैदिक किंवा याज्ञिक ब्राह्मण सोडून दिले, तर इतर ब्राह्मण या वेळीं फारसें वेदाध्ययन करीत नव्हते हें उघड आहे. अकराव्या शतकापर्यंत क्षत्रिय लोक वेदाध्ययन करीत, पण वैश्यांचा त्याबद्दलचा अधिकार गेला होता, असें

---

१ सौ. इं. ए. रि., १९२७, पृ. ११५.

२ वी. मि. सं., पृ. १११ वर उद्धृत.

३ नानुवाकहता बुद्धिर्व्यवहारक्षमा भवेत् । अनुवाकहता या तु न सा सर्वत्रगामिनी ॥ ३.२८१

अल्बेरुनीच्या वृत्तांतावरून दिसून येतें. [१]

वाङ्मय, व्याकरण, धर्मशास्त्र वगैरे इतर विषयांचा अभ्यासक्रम या वेळीं कोणच्या प्रकारचा होता, याची माहिती इत्सिंगच्या वृत्तांतावरून चांगली समजून येते. [२] सहाव्या वर्षीं मुळाक्षरास प्रारंभ होई; सातव्या आठव्या वर्षीं थोडेसें गणित, वाचन, वगैरे शिकवीत, नवव्या वर्षीं पाणिनीची सूत्रें मुलें पाठ करीत; पुढील तीन वर्षें अष्टधातु, उणादि सूत्रें, वगैरेंच्या अध्यनास लागत, आणि मग दोन वर्षें कोष, काव्य, साहित्य यांच्या परिशीलनामध्यें जात. त्या काळचें माध्यमिक शिक्षण (Secondary Education) अशा प्रकारचें असे, व तें १४–१५ वर्षाच्या सुमारास संपे.

यानंतर उच्च शिक्षणास प्रारंभ होई. व्याकरण, तर्क, न्याय, वेदान्त, वैद्यक व ज्योतिष या पांच उच्च शिक्षणाच्या शाखा होत्या असें युआन च्वांगच्या वृत्तांतावरून दिसतें. [३] साहित्य, पुराणें, अलंकार, व धर्मशास्त्र यांचा त्यानें अनवधानामुळेंच उल्लेख केला नसावा. या सर्व शाखांमध्यें व्याकरणशास्त्र हें सर्वांत लोकप्रिय होतें; कारण पाठशाळांमध्यें वैयाकरणिकांची सर्वांत जास्त गरज असे. काशिकावृत्ति, पातंजल महाभाष्य, वगैरे सारखे ग्रंथ उच्च अभ्यासक्रमामध्यें अंतर्भूत करीत असत. [४] व्याकरणाचें सांगोपांग अध्ययन करण्यास सुमारें दहा वर्षें लागत, व तें सुमारें १८–१९व्या वर्षीं संपत असे. नाणावलेले विद्वान् म्हणून ज्यांना लौकिक मिळवावयाचा असे, ते व्याकरणाशिवाय न्याय, वेदांत, यांसारखें आणखी एखादें शास्त्र अभ्यासीत; त्याकरितां आणखी ६–७ वर्षें तरी वेचावीं लागत. वेदान्ताच्या उच्च अभ्यासक्रमामध्यें विरोधी पक्षाच्या ग्रंथांचेंही परिशीलन होई. बौद्ध दिवाकरसेनाच्या विंध्यपर्वतांतील आश्रमामध्यें आजीवक, जैन, बौद्ध, कापालिक, लोकायतिक, वगैरे सर्व मतांचे विद्यार्थी सातव्या शतकामध्यें अभ्यासाकरितां येत, व ते स्वपक्षमंडन आणि परपक्षखंडन हें करण्यांत गुंतलेले असत असें हर्षचरितावरून दिसून

---

१ भा. १. पा. १२५.

२ प्रकरण ३४

३ वॉटर्स, भाग १. पा. १५५.

४ इत्सिंग, प्रकरण ३४.

येतें.[१] सातव्या शतकामध्यें ज्या मोठ्या बौद्ध तत्त्वज्ञान्यांच्या हातांखाली युआन् च्वांगने अध्ययन केलें, त्यांपैकी बरेच जण बौद्ध व हिंदु या दोनही तत्त्वज्ञानांत पारंगत होते; यावरून तत्त्वज्ञानाचे अभ्यासक विद्यालया-मध्ये परमतांच्या ग्रंथांचा अभ्यास करीत हें उघड आहे. न्यायशास्त्र व वेदांत यांचा संबंध फार निकट होता, तेव्हा वेदांताच्या विद्यार्थ्यास न्यायाचाही थोडाबहुत अभ्यास करावा लागे. हें सर्व होऊन वेदान्तामध्यें प्रावीण्य प्राप्त होण्यास निदान दहा तरी वर्षें लागत. न्याय व तत्त्वज्ञान या विषयाचे विद्यार्थी सुमारें विसाव्या वर्षी वलभि विश्वविद्यालयांत येत, आणि तीन वर्षांत परत जात असें इत्सिग म्हणतो हें खरें,[२] पण त्यावरून दोन तीन वर्षांत न्यायवेदांतासारख्या विषयांचें अध्ययन संपे असें मानणें चुकीचें होईल. वलभीस तीन वर्षें राहून परतणारे विद्यार्थी इतरत्र आपल्या विषयाचें बरेंच अध्ययन करून अत्यश्रेणीच्या अभ्यासा-करितां तेवढे वलभीला जात असावेत असें दिसतें.

प्रस्तुत कालखंडाच्या उत्तरार्धांत धर्मशास्त्र, पुराण, काव्य व अलं-कार या विषयांवर पुष्कळच ग्रंथ लिहिण्यांत आले. पुराण व धर्मशास्त्र यां-मध्यें सांगितलेला धर्म या वेळीं वैदिकधर्मापेक्षा फार लोकप्रिय होता. तेव्हा या वेळी संस्कृत विद्यालयांमध्यें पुराण व धर्मशास्त्र हे विषय न्याय-वेदांतापेक्षाही जास्त लोकप्रिय असावेत असें वाटतें. साहित्यशास्त्रांतील उच्च अभ्यासक्रमामध्यें व्याकरण, छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, इतिहास, पुराणें, लोककथा वगैरे विषयांचा अंतर्भाव करीत असत.[३] हल्लीं लेखन-वाचनास जितकें महत्त्व देतात, तितकें पूर्वीं या अभ्यासक्रमांत कविता-रचनाशक्तीस देत असत.

बौद्ध शिक्षणसंस्थांतील अभ्यासक्रम कांहीसा निराळा असे. या वेळीं महायान मताचा हिंदुस्थानांत फार प्रसार झाला होता व त्याचे सर्व ग्रंथ संस्कृतामध्यें असत. म्हणून बौद्ध विद्यार्थ्यांनाही हिंदु विद्यार्थ्यांप्रमाणें संस्कृत व्याकरण, कोष व साहित्य हें शिकण्यांत ५–७ वर्षें घालवावीं

---

१ हर्षचरित, अष्टम उच्छ्वास.

२ पा. १७७.

३ काव्यमीमांसा, पा. ४९-५०.

लागत. याच वेळीं विनयादि ग्रंथांतील महत्त्वाचे उतारे त्यांच्याकडून पाठ करून घेत. सुमारें १६ व्या वर्षी त्यांच्याही उच्च शिक्षणास आरंभ होई। त्यामध्यें तर्क व तत्त्वज्ञान यांवरच जास्त भर देण्यांत येई. हेतुविद्या, अभिधर्मशास्त्र यांसारख्या विषयांचा विशेष अभ्यास करण्यांत येई. बौद्ध भिक्षूंचा अभ्यासक्रम बराच निराळा असे. वयांत आल्यावर म्हणजे सुमारें १८ व्या वर्षी त्यांना संघामध्यें प्रविष्ट करून घेत, व त्यानंतर दहा वर्षे त्यांना उपाध्यायाच्या हाताखाली विनय, सूत्रें, पातिमोक्ख व महायान शास्त्रें यांचा अभ्यास करावा लागे. दहा वर्षांनी त्यांच्या शिष्यत्वाचा काल संपला तरी अध्ययन संपत नसे, कारण नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याप्रमाणें त्यांना धर्म व तत्त्वज्ञान यांचाच व्यासंग आजन्म करावयाचा असे. सर्वच तसें करीत असें नाही; पण नालंदाला जे सुमारें १०,००० भिक्षु होते त्यांपैकी १००० भिक्षु २० शास्त्रग्रंथांमध्यें, ५०० तीस ग्रंथांमध्यें व १० पन्नास ग्रंथांमध्यें प्रवीण होते.[१] यावरून शेकडा १०–१५ भिक्षु तरी आजन्म विद्याव्यासंग करीत असें दिसून येईल. जालंदर, धेनुकाकट, दक्षिण कोसल यांसारख्या दुर्गम व एकीकडच्या विहारांमध्यें सुद्धा इतक्या चांगल्या विद्वत्तेचे भिक्षु होते, की युआन् च्वांगला तेथे कैक महिने अभ्यासाकरितां राहावें लागलें.[२] यावरूनही बौद्ध विहारांमधील भिक्षूंपैकी पुष्कळ विद्वान व बहुश्रुत असत हें दिसून येईल. हेतुविद्याशास्त्र, न्यायानुसारशास्त्र, षट्पदाभिधर्मशास्त्र, योगाचारभूमिशास्त्र, विभाषा, कोष वगैरे शास्त्रांचा ते व्यासंग करीत.[३] हिंदु धर्मग्रंथांचेंही परिशीलन त्यांना करावें लागे, कारण त्याशिवाय स्वमतमंडन हें चांगल्या तऱ्हेने करणें शक्य नसे. आपला जीव अनेकदा धोक्यांत घालून बौद्ध ग्रंथांच्या अध्ययनाकरितां जो युआन् च्वांग हिंदुस्थानांत येऊन राहिला होता, त्याचा हिंदुस्थानांतील २/५ वेळ हिंदु धर्मग्रंथांचें अध्ययन करण्यांत गेला,[४] यावरूनही परमतपरिशीलनास किती महत्त्व देण्यांत येई हें दिसून येईल.

---

१ बील, युआन्च्वांगचें चरित्र, पान ११२
२ „ „ „ १३६, १३७, १७७
३ „ „ „ ११२
४ „ „ „ १२५

या कालखंडामध्यें शेकडों ग्रंथ निरनिराळ्या विषयांवर व निरनिराळ्या प्रांतांत लिहिण्यांत आले. निरनिराळ्या विद्यालयांमध्यें कोणकोणत्या वेळीं कोणकोणते ग्रंथ अभ्यासीत, ही माहिती उपलब्ध असती तर ती बरीच मनोरंजक व बोधप्रद झाली असती यांत संशय नाही. आजकाल आपापलीं पुस्तकें शाळा कॉलेजांतून नेमून घेण्याकरितां ग्रंथकार बरीच धडपड करीत असतात, पण पूर्वी मुद्रणकला व ग्रंथकारांचे पुस्तकाबाबत हक्क (Copy right) हे दोनीही नसल्यामुळें ग्रंथकारांच आपले ग्रंथ अभ्यासक्रमांत नेमल्यामुळें आर्थिक फायदा होणें शक्य नव्हतें. कालिदासाचे ग्रंथ त्याच्या हयातींत भरतखंडाच्या कान्याकोपऱ्यांतील सर्व विद्यालयांत लावले असते, तरी त्याचा कीर्तीशिवाय दुसरा कांहीच फायदा झाला नसता. अशी कीर्ति मिळावी म्हणून मात्र कांही ग्रंथकार कधीकधी कशी धडपड करीत हें अल्बेरुनीने सांगितलेल्या एका गोष्टीवरून दिसून येतें.[१] अनंगपाल राजाचा (सुमारें १००० ते १०१०) उग्रभूति नांवाचा एक अध्यापक वैयाकरणिक होता; त्याने शिष्यहितावृत्ति नांवाचा एक ग्रंथ लिहिला होता. हा ग्रंथ काश्मीरमध्यें महाविद्यालयांत अध्यापकांनी विद्यार्थ्यांकरितां नेमावा म्हणून उग्रभूतीने बरीच खटपट केली; पण त्यास यश आलें नाही. खिन्न मनाने त्याने जेव्हा अनंगपालास ही गोष्ट सांगितली, तेव्हा त्याने १००,००० द्रम्म (६०,००० रुपये), जीं विद्यालयें शिष्यहितावृत्ति ग्रंथ लावतील त्यांमध्यें वाटण्यास, पाठवून दिले. ही बातमी कळतांच चोहींकडे तो ग्रंथ सुरू झाला. सर्व ग्रंथकार उग्रभूतीसारखे असत, किंवा अशा तऱ्हेच्या गोष्टी नेहमी घडत असत असें मानण्याचें कारण नाही, तथापि कधीकधी कशा हल्लीप्रमाणें मजेदार गोष्टी घडत हें त्यावरून दिसून येईल.

सुमारें तिसऱ्या शतकापासून या कालखंडामध्यें संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन झालें. त्यापूर्वी बहुतेक सर्व प्रांतांत प्राकृत ही राजभाषा होती, कारण त्या वेळचे राजाज्ञेने लिहिलेले कोरीव लेख प्रायः प्राकृत भाषेमध्येंच लिहिलेले आढळून येतात. दक्षिणेंतील सातवाहनासारख्या कांही राजांनी तर आपल्या दरबारांत प्राकृत भाषाच वापरली पाहिजे असा

१ अल्बेरुनि, भाग. १ पृ. १३५-६

नियम केला होता.[१] हिंदुधर्माबरोबर संस्कृत भाषेचेंही पुनरुज्जीवन चवथ्या शतकांत झालें, व तें इतकें प्रभावी ठरलें की बौद्ध व जैन धर्मीय लोकही आपल्या धर्मसंस्थापकांचा उपदेश झुगारून देऊन संस्कृतमध्येंच ग्रंथरचना करूं लागले. उज्जयिनीच्या साहसांक राजाने म्हणजे गुप्तघराण्यांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताने आपल्या अंतःपुरांत देखील संस्कृतच भाषा वापरली पाहिजे असा नियम केला होता. संस्कृतच्या पुनरुज्जीवनामुळें या कालखंडांत असंख्य ग्रंथ लिहिले गेले, पण त्यामुळें प्राकृत भाषा मागे पडल्या.[२] त्यांमधील ग्रंथोत्पत्ति जवळ जवळ थांबल्यासारखीच झाली. संस्कृतानभिज्ञ बहुजनसमाजाच्या बहुश्रुततेवर यामुळें कसा वाईट परिणाम झाला, हें पुढे शेवटल्या प्रकरणामध्यें दाखवण्यांत येईल.

## शिक्षणपद्धति

शिक्षण कसे द्यावें या विषयीं जितके भिन्न भिन्न विचार प्रकट केले जातात, तितके इतर फारच थोड्या विषयांसंबंधीं केले जात असतील. उच्च शिक्षणक्रमामध्यें देखील काळजीपूर्वक शिकवून विद्यार्थ्यांकडून अभ्यास करवून घ्यावेत असें कांहींचें मत आहे, तर अशा विद्यार्थ्यांना फक्त उपयुक्त पुस्तकांची यादी द्यावी असें दुसऱ्यांचें मत आहे. व्याख्यान पद्धति निरुपयोगी आहे असें कांहींना वाटतें, तर कुशल अध्यापक आपल्या रसाळ वाणीने विद्यार्थ्यांच्या मनावर जसे सिद्धांत बिंबवूं शकतो, तसें निर्जीव पुस्तकें करूं शकणार नाहीत, असें उलट बाजूचें अट्टाहासानें सांगणें आहे. प्राचीन हिंदुस्थानांत शिक्षणपद्धतीबद्दल अशा तऱ्हेचे वादविवाद नव्हते, कारण त्या वेळची परिस्थिति निराळी होती. लेखनकलेची मदत शिक्षणक्रमामध्यें बरीच वर्षें घेण्यांत येत नसे. जेव्हा ती घेण्यांत येऊं लागली, तेव्हाही पुस्तकें फार दुर्मिळ व महाग असल्यामुळें विद्यार्थ्यांच्या स्मरणशक्तीने करावयाचें काम त्यामुळें फारसें कमी झालें नाही. त्यामुळें पुस्तकें स्वतः वाचून आपला आपण ज्ञानविकास करून घ्यावा अशा प्रकारची विचारसरणी समाजास उपयुक्त किंवा ग्राह्य वाटणें शक्य नव्हतें. पुस्तकें

---

१ काव्यमीमांसा, पा. ५०.

२ अल्बेरुनि, भा. १, पा. १८.

जरी उपलब्ध झालीं तरीही त्यावर सर्वस्वीं विसंबून राहतां येत नसे. मुद्रणकला अस्तित्वांत नसल्यामुळें एखाद्या पुस्तकाची मिळालेली प्रत ही सर्वस्वीं विश्वसनीय असेलच अशी खात्री वाटत नसे. ग्रंथांच्या नकला करणारे कारकून पुष्कळदा अर्धशिक्षित असत, व त्यामुळें त्यांच्या हातून इतक्या चुका घडत, की एकामागून एक असा दोन तीनदा नक्कल केलेला ग्रंथ पुष्कळ ठिकाणीं सर्वस्वीं विपरीतार्थनिदर्शक होई. [१] त्यामुळे प्राचीन काळीं बहुतेक ज्ञान कंठगत असे. आपला ग्रंथ सर्व पुस्तकालयांत ठेवण्याजोगा संग्राह्य व्हावा, अशी आधुनिक काळीं ग्रंथकारांची महत्वाकांक्षा असते; पूर्वी आपला ग्रंथ विद्वानांनी पाठ केला जाऊन त्यांच्या कंठाभरणतेस प्राप्त व्हावा याबद्दल ग्रंथकारांचा प्रयत्न असे.

वरील सर्व कारणांमुळें वेदाध्ययनामध्यें वेदमंत्र कंठगत करण्यावर फार प्राचीन काळापासून भर देण्यांत येई, हें निराळें सांगण्याची जरूरी नाही. स्वर अगर उच्चार यांमध्यें अत्यंत थोडा जरी म्हणण्यांत बदल झाला, तर त्यामुळें अनर्थ ओढवतो असाही समज होता, त्यामुळें गुरुमुखांतूनच वेद शिकणें श्रेयस्कर होय असें मानण्यांत येऊं लागलें. 'वेदानां लेखकाश्चैव ते वै निरयगामिनः।'[२] या महाभारत वचनावरूनही वेद हे लिहिले जाऊं नयेत असा समाजाचा कटाक्ष होता असें दिसून येईल. नास्तिकांच्या हातीं वेद लागूं नयेत, हाही त्यांत एक हेतु असावा. वरील कारणसमुच्चयामुळें नवव्या शतकापर्यन्त वेदमंत्र हे मुळीं लिहिलेच गेले नव्हते. पण या सुमारास साहित्य, अलंकार, धर्मशास्त्र, वेदांत, न्याय, वगैरे शास्त्रांचेंच जास्त अध्ययन होऊं लागल्यामुळें वेदांकडे कसें दुर्लक्ष्य होऊं लागलें हें आपण मागे पाहिलेंच आहे. त्यामुळें वेदमंत्र व वेदार्थ हे दोनीही अजीबात लुप्त होतील की काय अशी सकारण भीति वाटूं लागली, व अखेर काश्मीरमधील वसुक्र नामक ब्राह्मणाने नवव्या शतकामध्यें वेदमंत्र व त्यावरील टीका लिहून काढण्याचें लोकोत्तर मनोधैर्य दाखविलें.[३] पण जरी या कालानंतर वेदांच्या लेखी प्रती अस्तित्वांत येऊ लागल्या, तरी

---

१ अल्बेरुनि, भा. १. पृ. १८.

२ आश्वमेधिकपर्व, १०६, ९२.

३ अल्बेरुनि, भा. १. पृ. ११२.

त्या दुर्मिळ व महाग असल्यामुळें विद्यालयांमध्यें वेदमंत्र हे पूर्वीप्रमाणें गुरुमुखापासूनच शिकण्याचा प्रघात पुढे चालू राहिला, व अद्यापिही जुन्या संस्कृत विद्यालयांमध्यें तीच पद्धत सुरू आहे. प्रातिशाख्य ग्रंथांवरून या शिक्षणपद्धतीचें यथार्थ स्वरूप कळून येतें.[१] प्रत्येक दिवशीं विद्यार्थ्यास दोन तीनच मंत्र शिकवीत. त्या मंत्रांतील दोन दोनच शब्द गुरु प्रथम म्हणून दाखवी व आपल्या स्वराप्रमाणें शिष्य ते उच्चारतो कां नाही हें लक्षपूर्वक पाही. तो जर स्वर अगर उच्चार यांमध्यें चुकी करीत असेल तर ती तो लगेच दुरुस्त करी. अशा तऱ्हेने एक मंत्र म्हणजे श्लोक बिनचूक म्हणतां येऊं लागला म्हणजे त्या विद्यार्थ्यास तो पाठ करण्यास सांगून गुरु दुसऱ्या विद्यार्थ्यास त्याचप्रमाणें शिकवूं लागे. प्रत्येक विद्यार्थ्याच्या शिक्षणाकडे या पद्धतीमुळें गुरूला वैयक्तिक लक्ष द्यावें लागे.

बुद्धाच्या मृत्यूनंतर कैक शतकें त्रिपीटकादि बौद्ध ग्रंथही वेदांप्रमाणेंच पाठ करीत असत. ते शिकण्याकरितां पुस्तकाऐवजीं गुरूचाच आश्रय करावा लागे.[२] त्रिपीटकांच्या लेखी प्रती अस्तित्वांत आल्यावरही त्या महाग व दुर्मिळ असत, म्हणून विद्यार्थ्यांना त्या कंठगतच कराव्या लागत हें इत्सिगच्या वृत्तांतावरून दिसून येतें.[३]

प्राचीन काळी वेदत्रिपीटकादि बरेचसे ग्रंथ (पुस्तकें दुर्मिळ असल्यामुळें) विद्यार्थ्यांना कंठगत करावे लागत. प्राचीन शिक्षणपद्धति म्हणजे निवळ पोपटपंची असे, असें पुष्कळ लोक विधान करितात, पण तें चुकीचें आहे. वेदशाखेमध्येंसुद्धा इसवी सन सुरू होईपर्यंत अध्यापक विवरण व स्पष्टीकरण यांकडे बरेंच लक्ष देत असत. निरुक्तादि ग्रंथांच्या साहाय्याने कठीण शब्दांचे अर्थ ठरवून मंत्रार्थ विवरण करणें, मंत्रांमध्यें उल्लेखिलेल्या ऐतिहासिक किंवा दंतकथात्मक गोष्टींची माहिती सांगणें, संहितापाठाचा पदपाठ बनवितांना कोणते फरक का करावयाचे वगैरे गोष्टींसंबंधीं विवरण करणें वगैरे बाबीकडे वेदशालांमध्यें बिलकुल दुर्लक्ष होत नसे. ब्राह्मणग्रथांतील बराचसा भाग वेदमंत्रांवरील टीके-

१ ऋक् प्रातिशाख्य, पटल १५.

२ मिलिन्द पण्ह भा १. पा. २१ पहा.

३ पा. १२०.

सारखाच आहे; तित्तिरि जातकामध्यें गिरिशिखरावरून जलप्रवाह जसा अस्खलित रीतीने खाली वाहत जातो, त्याप्रमाणें वेदार्थ विवरण करतांना वेदाध्यापक भाषण करीत असें विधान आढळतें. यावरूनही वेदशाखे-मध्यें देखील बरीच शतकें केवळ पोपटपंचीच चालत नसे असें दिसून येईल. पुढे पुढे पाठ करावयाचे श्रुतिग्रंथ जेव्हा पुष्कळच झाले, तेव्हा वेद-शाखेमध्यें वैदिकांना ग्रथ पाठ करण्याकडेच आपलें शक्तिसर्वस्व नाइलाजानें खर्च करावें लागलें; तसें केलें नसते तर बरेचसे श्रुतिग्रंथ नष्ट झाले असते.

व्याकरण, पूर्व व उत्तर मीमांसा, न्याय, सांख्य वगैरे विषयांवरील सूत्रग्रंथ केवळ पोपटपंची करून अभ्यासण्याजोगे नाहीत हें कोणीही कबूल करील. सदरहू ग्रथ शिकवितांना अध्यापकांना विस्तृत व सांगोपांग विवरण करावें लागे; त्या विवरणापैकी कांही भाग भाष्यग्रंथांमध्यें पुढे अंतर्भूत झाला आहे. "वेदांत, न्याय, मीमांसा वगैरे विषय शिकवतांना वादविषयक सिद्धांतांचें पृथक्करण व स्पष्टीकरण करण्यांत येई, निर-निराळ्या मतांतील फरक दाखविण्यांत येई व आपलें मतच कां ग्राह्य व दुसरीं मतें कां त्याज्य हें समजाऊन देण्यांत येई."[१] दिवाकरसेनाच्या आश्रमामध्यें जे निरनिराळ्या श्रौत व श्रुतिबाह्य सिद्धांतांचे प्रौढ विद्यार्थी असत ते प्रथम आपापल्या सिद्धांताचें विवरण ऐकत, मग त्याचा विचार करून तें नीट समजाऊन घेत, शंका कुशंका येतील त्या गुरूंना विचारीत, आणि नंतर प्रतिपक्षीयांशी वादविवाद करीत, हें हर्ष-चरितावरून दिसून येतें.[२] तिबेट, चीन, कोरिया वगैरे लांबच्या देशांतून जे सातव्या शतकामध्यें हिंदुस्थानांत विद्यार्थी येत, ते केवळ हिंदुस्थानांत कंठगत करून जतन केलेल्या धर्मग्रंथांच्या प्रती मिळवण्याकरितांच नव्हे, हें युआन् च्वांग व इत्सिंग यांच्या वृत्तांतावरून दिसून येतें. गहन विषय विशद करून सांगण्याची व दुर्बोध विषयावर उद्बोधक विवेचन करण्याची भारतीय गुरूंची हातोटी अवर्णनीय आहे असें युआन् च्वांग म्हणतो.[३]

१ मिलिन्द पण्ह, भाग १, पृ. ४६.

२ उच्छ्वास ८.

३ बील, युआन् च्वांग चरित्र, पृ. ७६, १५४, १६०.

"सुदैवाने बौद्ध सिद्धान्त शिकण्याकरितां मी हिंदुस्थानांत आलों; नसें झालें नसतें तर अनेक विषय मला समजलेच नसते" असें इत्सिंग कबूल करितो.[१] प्राचीन काळीं पोपटपंचीवरच भर दिला जाई, हें म्हणणें किती निराधार आहे हें वरील विवेचनावरून दिसून येईल.

पुष्कळ जातककथांमध्यें तक्षशिलेंतील जगद्विख्यात गुरूंच्या हाताखाली पांच पांचशें विद्यार्थी शिकत असत असें जें विधान आढळतें तें फारसें विश्वसनीय दिसत नाही. निरनिराळ्या शतकांतील विश्वसनीय पुराव्यावरून सामान्यतः एकेका गुरूपाशीं १५–२० पेक्षा जास्त विद्यार्थी शिकत नसत असें दिसून येतें. पांचव्या शतकांत नालन्दाला ९००० विद्यार्थ्यांकरितां १००० शिक्षक होते.[२] एन्नायिरम् महाविद्यालयामध्यें अठराव्या शतकांत प्रत्येक शिक्षकाचे हाताखाली परासरीने वीस विद्यार्थी शिकत असत.[३] सतराव्या शतकामध्यें बनारसला प्रत्येक शिक्षकापाशी ४ ते १५ च विद्यार्थी शिकत, असें बर्नियरच्या प्रवासवृत्तांतावरून दिसून येतें.[४] एकोणिसाव्या शतकामध्यें नडियाच्या संस्कृत पाठशालांमध्यें सुमारें २०–२४ विद्यार्थी एकेका गुरूपाशीं अध्ययन करीत.[५] त्रिपीटकामध्यें भगवान् बुद्धाचे बरोबर नेहमीं ५०० शिष्य असत असें विधान सर्वत्र आढळतें, त्यावरूनच जातककथालेखकांनी तक्षशिलेच्या जगप्रसिद्ध अध्यापकांच्या संबंधीं तसेंच विधान केलें असावें असें दिसतें. तें वस्तुस्थितीचें निदर्शक नाही हें वरील पुराव्यावरून दिसून येईल.

प्रत्येक गुरूपाशी १५–२० विद्यार्थी शिकत असल्यामुळें गुरूला प्रत्येकाकडे वैयक्तिक लक्ष देतां येई. हल्लीसारखे शेदोनशें मुलांचे अवाढव्य वर्ग पूर्वीं नसत. एवढ्या मोठ्या वर्गामध्यें कांही मुलें फार हुषार, कांही घडु, तर कांही मध्यम प्रतीचीं असतात, त्यामुळें अध्यापक शिकवतो तें कांहींना निरुपयोगी तर कांहींना दुर्बोध व थोड्यां-

---

१ पृ. १८५.

२ बील, युआन् च्वांग चरित्र, पान ११२.

३ सौ. इं. ए. रि., १९१८, पान १४५.

४ पान ३३४.

५ नडिया गॅझेटियर, पान १८२.

नाच उपयोगी असें असतें. प्राचीन काळीं १५–२० विद्यार्थीच प्रत्येक गुरूपाशीं असत, त्यामुळें त्याला प्रत्येकाच्या अडचणी समजून घेऊन प्रत्येकास निराळें शिकवतां येई. तें त्यास समजलें की नाही व तें तो शिकला की नाही, याची रोज चांचणी घेण्यांत येई, व नंतर गुरु प्रत्येक विद्यार्थ्यास पुढील पाठ देई. त्यामुळें हुषार विद्यार्थ्यांची प्रगति जलद होई, व धड्ड विद्यार्थ्यांकरितां त्यांना थांबावें लागत नसे. वार्षिक परीक्षेच्यानंतर पुढील वर्गांत जावयाचें अशी पद्धत त्या वेळीं नव्हती. धड्ड किंवा आळशी मुलांना जसें हल्ली चैनीनें कॉलेजांत आयुष्य घालवतां येतें, तसें पूर्वी येत नसे, कारण त्यांच्या अभ्यासाची रोज परीक्षा होई, व तो झाला नाही तर गुरूकडून प्रथम कानउघाडणी व मग हकालपट्टी होई. हुषार विद्यार्थ्यांचा आळशीपणा किंवा कामचुकारपणा घालविण्यामध्यें भारतीय गुरूंचा हातखंडा असे, असें युआन् च्वांगनेंही नमूद करून ठेवलें आहे.[१]

शिष्यांच्या मनावर सिद्धांत बिंबवण्याकरितां पुष्कळदा उपमा, दृष्टांत वगैरेंचा उपयोग गुरु अध्यापनामध्यें करीत असत. बनारसच्या एका अध्यापकाच्या हाताखालीं एक अत्यंत मंदमतीचा विद्यार्थी होता. त्यास सिद्धान्त कसे समजाऊन द्यावे, याबद्दल गुरूस कोडेंच पडलें होतें. अखेर समिधा घेऊन तो संध्याकाळीं परत आला, म्हणजे त्यानें रानांत पाहिलेल्या वस्तू कशासारख्या होत्या व कशासारख्या नव्हत्या, याबद्दल त्याला खोदखोदून प्रश्न विचारावे म्हणजे एका वस्तूची दुसऱ्या वस्तूशीं कशी तुलना करावी, तिचें इतर गोष्टींशीं साधर्म्य व वैधर्म्य कसें ओळखावें, वगैरे त्यास समजूं लागेल, व अशा तऱ्हेनें त्याचा बुद्धि-विकास हळूहळू होईल व मग त्यास शिकवणें सोपें होईल, असा विचार करून गुरूनें वरील प्रकारें शिष्याचा मतिविकास घडवून आणण्यास सुरवात केली.[२] या गुरूला या शिष्याच्या बाबतींत वरील पद्धतीनेंही शिक्षण देण्यांत यश आलें नाही, कारण हा शिष्य फारच मठ्ठ होता; पण या गोष्टीवरून व हितोपदेशांतील कथानकांवरून शिक्षणपद्धति मनोरंजक व उद्बोधक व्हावी म्हणून गोष्टी, दृष्टांत वगैरेंचा कसा

---

१ वॅटर्स, भा. १ पान १६०.

२ मंगलीश जातक.

भरपूर उपयोग कुशल अध्यापक करीत असत हें कळून येईल. बुद्धासारखे कांही कुशल शिक्षक सॉक्रेटीसप्रमाणें शिष्यांचीं मतेंच प्रथम गृहीत धरून, त्यांबरोबर त्याबाबतींत संभाषण करून, त्यांच्या तोंडूनच त्या मतापासून विपरीत सिद्धांत कसे निघूं लागतात हें काढून घेऊन मग आपले स्वतःचे सिद्धांत त्यांस पटवून देत हें त्रिपीटक ग्रंथावरून दिसून येतें. उपनिषदांमध्येंही मधून मधून या पद्धतीचा अवलंब केलेला आढळतो.

विद्यार्थ्यांकडे वैयक्तिक लक्ष देणें सुलभ व्हावें, म्हणून प्रौढ विद्यार्थ्यांकडे प्राथमिक वर्गांतील मुलें शिकविण्याचें काम सांगण्यांत येई. तक्षशिलेमध्यें राजपुत्र सुतसोम हा आपल्या उद्योगानें व बुद्धिप्रभावामुळें जेव्हा इतर विद्यार्थ्यांच्या पुढे गेला तेव्हा त्याला इतरांना शिकवण्याचें काम देण्यांत आले होतें.[१] गुरूंना जेव्हा कांही कामाकरितां परगांवीं जावें लागे, तेव्हा शाळेचें काम वर्गांतील अत्यंत हुषार विद्यार्थ्यांकडे तक्षशिलेमध्यें देण्यांत येत असे.[२] वलभि विश्वविद्यालयांत वीस वर्षांच्या वरचे जे हुषार प्रौढ विद्यार्थी असत, त्यांच्याकडे सातव्या शतकामध्ये अध्यापनाचेंही काम सोपविण्यांत येई.[३] तेव्हा सदरहू पद्धति ही चोहोकडे प्रचलित होती असें मानण्यास हरकत नाही. या पद्धतीमुळें ट्रेनिंग कॉलेजचेंही काम होई, कारण प्रौढ विद्यार्थ्यांना शिकत असतांच शिकवण्याचाही अनुभव मिळे. सामान्यतः हुषार विद्यार्थ्यांना हा मान मिळत असल्यामुळें प्रत्येकास कसून अभ्यास करून प्रावीण्य मिळवण्यासही प्रोत्साहन मिळे. प्रौढ विद्यार्थ्यांकडून अध्यापनाचें काम प्रायः निर्वेतनच होत असल्यामुळें विद्यालयें चालवण्याचा खर्चही त्यामुळें कमी होई.

शिक्षणपद्धतीसबंधी वरील विवेचनावरून दिसून येईल की हिंदुस्थानांत जरी गुरूला पुष्कळ महत्त्व देण्यांत येत असलें, तरी पोत्यांत जसें आपण भराभर सामान भरतों, तसें गुरूला विद्यार्थ्यांच्या मनांत ज्ञान भरतां येईल अशी हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांची मुळीच कल्पना नव्हती.

---

१ महासुतसोमजातक.

२ सुखविहारजातक.

विद्यासंपन्नता ही केवळ गुरुप्रयत्नप्राप्य नाही, शिष्याच्या बुद्धीवर व प्रयत्नावरही ती बरीच अवलंबून आहे हें शिक्षणशास्त्रज्ञांस मान्य होतें हें

वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे
न च खलु तयोर्ज्ञाने शक्ति करोत्यपहन्ति वा ।
भवति च पुनर्भूयान्भेदः फलं प्रति तद्यथा
प्रभवति शुचिर्बिम्बोद्ग्राहे मणिर्न मृदाञ्चयः ॥

(उत्तररामचरित, अंक २)

या भवभूतीच्या श्लोकावरूनही दिसून येतें. तर्क, तत्त्वज्ञान, यांसारख्या विषयांत तर विद्यार्थ्यांनी स्वतः निरनिराळ्या मतांचें परिशीलन व पृथक्करण करणें जरूर आहे, असें शिक्षणशास्त्रज्ञांचें ठाम मत होतें. स्वतःच्या अवलोकनानें व इतरांशीं वादविवाद करून ज्ञान कसें अधिक परिणत होतें, हेंही विद्यार्थ्यांच्या मनाला पटवून देण्यांत येई. देशाटन केल्यानें पंडितमैत्री व सभासंचार यांचा लाभ होतो, व त्यामुळें स्वतःचें पांडित्य परिणत होऊं लागतें असें शुक्राचार्यांचें मत होतें,[१] व वरील लाभ मिळावा म्हणून पुष्कळ विद्यार्थी शिक्षणक्रम संपल्यावर कांहीं काल देशाटन करण्यांत घालवीत, असें जातकांवरून दिसून येतें. स्वतःचें परिशीलन, इतरांशीं वादविवाद, देशपर्यटन यांनी ज्ञान उत्तरोत्तर वाढत जातें; तथापि पूर्ण विकास व्हावयास कांहीं कालही जावा लागतो, असें हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांचें मत होतें. 'आचार्यात्पादमादत्ते पादं शिष्यः स्वमेधया । पादं सब्रह्मचारिभ्यः पादं कालक्रमेण तु ॥' या सुभाषितावरून ज्ञानसंपन्नता कोणकोणत्या गोष्टीवर किती अवलंबून असते याबद्दलचें हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांचें मत कळून येईल.

## परीक्षापद्धति

हल्लीसारख्या षाण्मासिक, वार्षिक किंवा द्विवार्षिक परीक्षा प्राचीन हिंदुस्थानांत नव्हत्या. दिलेला पाठ विद्यार्थ्याला समजला, व त्यानें तो कंठगत केला, अशी गुरूची खात्री झाली, म्हणजेच मग पुढें दुसरा पाठ देण्यांत येई. त्यामुळें विद्यार्थ्याची रोजच परीक्षा होत असे. शिक्षणक्रमाच्या शेवटीं हल्ली जशी एक मोठी व कठीण परीक्षा होते, तशी पूर्वी

१ शुक्रनीति, ३. १३१–१३७.

होत नसे. शेवटच्या पाठाची परीक्षा झाली म्हणजे संपलें अशी पद्धत होती, असें मिलिन्द पण्ह् भाग १ पृ. १८ वरून दिसून येतें. तर्क, वेदांत, वगैरे सारख्या विषयांत कदाचित् शलाकापरीक्षा[१] होत असावी, पण तिचा प्रत्यक्ष उल्लेख प्राचीन ग्रंथांत आढळत नाही.

शिक्षण संपलें म्हणजे गुरु विद्यार्थ्यास विद्वज्जनपरिषदेंत नेई व स्नातक म्हणून त्याची इतरांशीं ओळख करून देई. या वेळीं त्यास कधी कधी एखादा प्रश्न विचारीत,[२] पण तो परीक्षेच्या स्वरूपाचा नसे. या प्रश्नाचें योग्य उत्तर देण्यावर त्याचें स्नातकत्व अवलंबून नसे, कारण समावर्तन समारंभ विद्वज्जनपरिषदेंत जाण्यापूर्वीच होत असे.[३] विद्यार्थ्याचा शिक्षणक्रम योग्य तऱ्हेनें संपला कां नाही हें त्याच्या स्वतःच्या गुरूनेंच ठरवावयाचें असे.

काव्यमीमांसा व चरकसंहिता यांमध्यें कसून घेतल्या जाणाऱ्या परीक्षांचा उल्लेख आढळतो, पण त्या परीक्षा विद्यार्थ्यांस किमानपक्षीं विशिष्ट मर्यादेपर्यंत तरी ज्ञान आहे कीं नाही, याकरितां हल्ली घेण्यांत येणाऱ्या परीक्षांसारख्या नव्हत्या, तर देशांतील प्रसिद्ध विद्वद्रत्नांमध्यें सर्वश्रेष्ठ कोण, राजकवि, राजवैद्य, तर्कालंकार, तर्कचक्रवर्ति, म्हणून कोणास दरबारांत व समाजांत मान द्यावा याकरितां घेतल्या जात असत.[३] हल्लीच्या बी. ए., एम्. ए. वगैरे परीक्षांहून त्या सर्वस्वीं निराळ्या स्वरूपाच्या होत्या. हल्लीसारखें परीक्षांच्या चरकांतून जरी विद्यार्थ्यांस पूर्वी जावें लागत नसलें तरी पूर्वी शिक्षणक्रम एकंदरींत सोपा होता असें मात्र यावरून मानणें चुकीचें होईल. एकदा पदवी हातांत पडली, म्हणजे पदवीधराला शिकलेलें सर्व विसरून जाण्याची हल्ली पूर्ण मुभा असते. बी.ए. माणसाला कांही येत नाही, असें अनुभवाने कळून आलें तरीही त्याला तुम्ही बी. ए. नाही, असें कांही आपणास म्हणतां येत नाही. प्राचीन काळीं

---

१ पुस्तक यदृच्छेने उघडून येईल त्या पानांत असेल त्या विषयांची परीक्षा घेणें म्हणजे शलाका—परीक्षा होय.

२ बृ. उप., ६. २. १ व २.

३ शेवटच्या दोन पदव्या मध्ययुगामध्यें बंगाल्यांत गदाधर, जगदीश वगैरे सारख्या नाणावलेल्या तर्कपंडितांना देण्यांत येत असत.

अशी स्थिति नव्हती. प्रत्येक स्नातकास आपलें ज्ञान कंठगत ठेवावें लागे; शास्त्रार्थ किंवा वाग्युद्ध करून त्यास आपली श्रेष्ठता समाजास वारंवार पटवून द्यावी लागे. हल्लीसारखें त्याला आपल्या पदवीकडे बोट दाखवितां येत नसे, कारण पूर्वीं सामान्य विद्यार्थ्यास प्राप्य अशा पदव्याच अस्तित्वांत नव्हत्या. नालंदाच्या विद्यार्थ्यास फार मान मिळे, म्हणून काही स्वार्थ-साधु 'आपण नालंदामध्यें विद्या शिकलों आहोंत' असें खोटेंच सांगत, असें युआन् च्वांगच्या वृत्तांतावरून दिसून येतें.[१] नालंदा विश्वविद्यालयामध्यें हल्लीसारखी पदवीदानाची पद्धत असती, तर हें शक्य झालें नसतें. तक्षशिला, वलभि वगैरे ठिकाणीही तशीच परिस्थिति होती. विक्रमशिला विश्वविद्यालयामध्यें शिक्षणक्रमामध्यें पारंगत झालेल्या स्नातकांना नवव्या दहाव्या शतकामध्यें वंगाधिपाच्या हस्तें प्रशस्तिपत्रें मिळत असें तारानाथा-च्या इतिहासावरून दिसतें, पण सदरहू पद्धत या वेळी नवीन सुरू झाली असावी असें दिसतें. पुढें तिचा प्रसारही फारसा झालेला आढळून येत नाही.

---

# प्रकरण पांचवें

# धंदेशिक्षण

वाङ्मयात्मक अभ्यासक्रमाविषयी गेल्या प्रकरणांत विचार झाला; आता या प्रकरणामध्यें व्यापार, विणकाम, सुतारकी, लोहारकी यांसारखे हस्तव्यवसाय, वैद्यक, युद्धकला, वगैरेसारखे उच्च व्यवसाय, गायन, वादन चित्रकला, शिल्पकाम, वगैरे सारख्या कला यांचें शिक्षण कसें देण्यांत येई याचें आपण विवेचन करूं. स्मृत्यादि ग्रंथांमध्यें याबद्दल फारच थोडी माहिती मिळते, कारण ते ग्रंथ ब्राह्मणांनी ब्राह्मणांच्या दृष्टिकोनाने लिहिले आहेत. क्षत्रियाने किंवा वैद्याने एखादा स्मृतिग्रंथ लिहिला असता तर हल्लीच्या स्मृतींमध्यें जशी वेदाध्ययनाबद्दल सविस्तर माहिती सापडते, तशी त्यामध्यें लष्करी किंवा वैद्यक शिक्षणाबद्दल माहिती मिळाली असती यांत संशय नाही. दुर्दैवाने असा एखादा ग्रंथ आज उपलब्ध नाही. युआन् च्वांगसारख्या विदेशी प्रवाशाकडूनही प्रायः वाङ्मयात्मक शिक्षणासंबंधींच माहिती मिळते;

वैद्यक किंवा विणकाम याबद्दल जिज्ञासा असलेला एखादा आरबी किंवा चिनी वैद्य किंवा व्यापारी जर हिंदुस्थानांत आला असता, तर त्याच्या वृत्तांताचा आपणास या कामीं बराच उपयोग झाला असता. धंदेशिक्षणाची माहिती देणारा एखादा कोरीव लेखही अद्याप उपलब्ध नाही. वरील कारणांमुळें धंदेशिक्षणाबद्दल सविस्तर माहिती देणें इतिहासकारास बरेंच कठीण जातें. अनेक भिन्न भिन्न साधनांवरून मिळणारी माहिती गोळा करून हें प्रकरण तयार केलें आहे.

## जातिभेद व धंदे

हस्तव्यवसाय व धंदेशिक्षण यांचें शिक्षण प्रायः ब्राह्मणेतर विद्यार्थीच प्राचीन काळीं घेत असावेत असें आज आपणास स्वभाविकपणें वाटेल, पण वस्तुस्थिति तशी नव्हती. वेदकाली ऋषिकुलोत्पन्न तरुणांपैकी कांही वैद्यकीचा तर कांही गवंड्याचा धंदा करीत;[१] यावरून लोक आपल्या जातीप्रमाणें नव्हे तर आवडीनिवडीप्रमाणें धंदे करीत असें दिसून येईल. पुढे जातिभेदाचा लवचीकपणा नाहीसा झाला, व ब्राह्मणानी पैशाच्या पाठीमागे न लागतां वेद वेदांत यांसारख्याच विषयांचें अध्ययन करावें अशी समाज अपेक्षा करूं लागला. कांही ब्राह्मण याप्रमाणें वागत ही होते, पण इतका स्वार्थत्याग करणें शक्य न झाल्यामुळें म्हणा,[२] किंवा आपल्या अध्यापनाच्या कर्तव्यांत धंदे शिकवण्याचाही अंतर्भाव होतो असें वाटल्यामुळें म्हणा, बरेचसे ब्राह्मण धंदेशिक्षणही घेत व देत. बुद्धिमंद ब्राह्मण मुलांच्या हातून अध्यापकाचा धंदा होणें शक्य नसे; तेव्हा त्यांनी क्षात्र किंवा वैश्य वृत्ति स्वीकारणें उत्तम असें गौतमधर्मसूत्रांत सांगितलें आहे.[३] समाजांतही प्रत्यक्ष प्रकार तसाच असे, हें जातक व स्मृतिग्रंथांवरूनही दिसून येत. शेतकी, व्यापार व जादुगिरी यांसारखे धंदे अनेक ब्राह्मण शिकत, शिकवत व करीत असें जातकांवरून दिसून येतें.

---

१ ऋग्वेद, ९. ११२. ३.

२ तक्षशिलेमध्यें धनुर्वेदाचे पुष्कळ शिक्षक ब्राह्मणच होते; पांडवांचे लष्करी शिक्षक द्रोणाचार्य हेही ब्राह्मणच होते. धनुर्वेदसंहिता १४ मध्यें धनुर्विद्येचें शिक्षण ब्राह्मण अगर क्षत्रिय यांनीच द्यावें असें विधान आढळतें.

३ राजन्यवैश्यकर्मा विद्याहीनः (ब्राह्मणः) ।१६.१६

शरभंगजातकामध्यें तर प्रत्यक्ष काशीतील ब्राह्मण पुरोहिताचा मुलगा तक्ष-शिलेला धनुर्वेद शिकण्यास जात असलेला आढळतो! श्राद्धास निमंत्रण देण्यास नालायक ब्राह्मणांची लांबलचक यादी अनेक स्मृतिग्रंथांत सापडते, त्यावरूनही व्यापार, वैद्यक, नौकानयन, अश्वशिक्षा, हस्तिशिक्षा वगैरे सारखे अनेक धंदे ब्राह्मण लोक करीत असें दिसून येतें.

लष्करी शिक्षणही पुष्कळ क्षत्रियेतर लोक घेत असत. ब्राह्मण तें घेत असत हें आपण वर पाहिलेंच आहे. सैन्यामध्यें हुद्दयाच्या व जबाबदारीच्या जागा क्षत्रिय व ब्राह्मण यांकडे असत, सामान्य सैनिकांची भरती सर्व जातींतून होत असे. सातव्या शतकामध्यें उज्जयिनी, महेश्वर व आसाम येथील राजे ब्राह्मण होते, पारियात्र व कनोज येथील वैश्य होते व सिंध व मतिपुर येथील शूद्र होते; यावरूनही क्षात्रवृत्ति सर्वांना मोकळी होती हें दिसून येईल.

असो; निरनिराळे धंदे शिकण्यास विशिष्ट जातीचेच विद्यार्थी येत असा समज किती चुकीचा होईल हें वरील विवेचनावरून दिसून येईल. सुमारें इ. स. ५०० पर्यंत अंतर्जातीय विवाहही घडत असत, अर्थात् धंद्याबद्दलही पुष्कळच मोकळीक नवीन पिढीच्या विद्यार्थ्यांना असे. वैद्यकीसारखा उपयुक्त धंदा वाटेल त्या जातीचा मनुष्य करीत असे.[१]

## वैश्य-क्षत्रियांचें वेदाध्ययन

धर्मशास्त्राप्रमाणें क्षत्रियवैश्यांना वेदाधिकार आहे; किंबहुना क्षत्रिय व वैश्य बटूंनीही बारा वर्षे नसलें तरी कांही वर्षे तरी उपनयनानंतर वेदाध्ययन करावें असा स्मृतींचा आग्रह आहे. वस्तुस्थिति काय होती हें आता आपणास पाहावयाचें आहे.

वेद व उपनिषद् यांच्या कालामध्यें वेदाध्ययनास सर्व त्रैवर्णिकांस मुभा असे. मंत्रद्रष्टयांपैकी विश्वामित्र, वैन्य, यांसारखे कांही क्षत्रियच होते; अध्यात्मविद्येचीं कांही गूढ तत्त्वें जनक, अजातशत्रु, प्रवाहण जेवलि, अश्वपति केकय, वगैरेसारख्या क्षत्रियांनाच प्रथम अवगत झालीं होतीं, व त्यांच्यापासून पुढे तीं ब्राह्मण शिकले, हें ब्राह्मणांनीच जतन करून

---

१ चरक, सूत्रस्थान, ३०. २६.

ठेवलेल्या उपनिषदांवरून दिसून येतें.[१] क्षत्रियांप्रमाणें वैश्य हेही वेदवेदाङ्गाच्या अध्ययनामध्यें उत्साहानें भाग घेत असल्याबद्दल विश्वसनीय पुरावा अद्याप उपलब्ध नाही; 'योऽब्राह्मणो विद्यामनूच्य नैव रोचेत'[२] या वचनावरून कांही वैश्यही कांही क्षत्रियांप्रमाणें वेदांच्या अध्ययनअध्यापनामध्यें भाग घेत असावेत, असा तर्क करणें शक्य आहे. पण एकंदरींत वेदाध्ययन करणाऱ्या वैश्यांची संख्या वैदिक कालामध्येंही फारच थोडी असावी, असें उपलब्ध पुराव्याची छाननी करतांना वाटूं लागतें.

इ. स. पू. ८००च्या सुमारास सर्व त्रैवर्णिकांनी उपनयन केलेंच पाहिजे हें मत समाजांत रूढ झालें, व त्यानंतर कांही शतकें क्षत्रिय व वैश्य यांचीही उपनयनें ब्राह्मणासारखीं नियमानें होऊं लागलीं. कांही विद्वानांना असें होत नसावें असें वाटतें. पण नामकरण, चूडाकरण, वगैरे संस्कार जसे क्षत्रिय वैश्यांत रूढ झाले तसें उपनयनही कां झालें नसावें या प्रश्नास फारसें समाधानकारक उत्तर मिळत नाही. उपनयन हा शरीरसंस्कार आहे, तो केला नाही तर व्रात्यत्व प्राप्त होतें अशा कल्पना या वेळी समाजांत रूढ होत्या; त्यामुळें हल्ली ब्राह्मण जसें उपनयन करण्यास चुकत नाहीत तसे उच्च कुलांतील क्षत्रिय व वैश्य हेही या वेळीं चुकत नसावेत असें वाटतें. क्षत्रिय व वैश्य यांचें यज्ञोपवीत कोणत्या निरनिराळ्या सूत्रांचें असावें, मेखला कोणत्या निरनिराळ्या गवताची असावी वगैरेसंबंधी जे काटेकोरपणानें केलेले नियम अनेक स्मृतींत आढळतात, त्यांवरूनही ब्राह्मणेतर त्रैवर्णिकांत उपनयन रूढ असावें हेंच अनुमान निघतें. क्षत्रियवैश्यांचीं उपनयनें प्रत्यक्ष झाल्याबद्दल ऐतिहासिक पुरावा फारसा मिळत नाही,[३] पण अकराव्या शतकापर्यंत उच्चकुलांतील क्षत्रि-

---

१ बृ. उ., ३. १. १४; ४. १. १; छां. उ., ४. ४. १.

२ काठकसंहिता, ९, १६.

३ होयसळवंशी तिसऱ्या नारसिंह राजाचें उपनयन २५-२-१२५५ रोजीं त्याच्या वयाच्या पंधराव्या वर्षीं झाल्याचा पुरावा कोरीव लेखावरून मिळतो, पण असले दाखले शिलालेखांत फारसे सापडत नाहीत.

यांचें उपनयन होत असे, असें अल्बेरुनीवरून दिसून येतें.[१] वैश्यांचें उपनयन फार लवकर थांबलें; इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारासच वैश्य हे शूद्राइतकेच कमी दर्जाचे मानण्यांत येऊं लागले;[२] इ. स.च्या ११व्या शतकांत तर वैश्याने वेदश्रवण केलें तर त्यास घोर शिक्षा द्यावी, अशा मताचा समाजांत पुरस्कार होऊं लागला. इ. स.च्या प्रारंभापासूनच वैश्यांचें उपनयन सामान्यत: बंद होत गेलें असावें. पुढे कांही शतकें फार थोडे उच्चकुलीन वैश्य उपनयन व वेदाध्ययन करीत असावेत; पण अशांची संख्या अल्बेरुनीच्या काळीं पूज्यापर्यंत उतरली होती हें उघड दिसतें.

उपनिषत्कालानंतर क्षत्रियांचा जेव्हा वेदाध्यापनाचा अधिकार गेला, तेव्हा अर्थातच ते पूर्वी इतके वेदाध्ययनाकडे लक्ष देईनासे झाले असावेत. तथापि, त्यानंतर कैक शतकें क्षत्रिय म्हणवून घेण्याची ज्यांना आकांक्षा असे, ते थोडे बहुत वेदमंत्र पाठ करीत असत. जातकामध्यें क्षत्रियकुमार तीन वेद व अठरा शिल्पें यांचें अध्ययन करीत असे अनेक उल्लेख आढळतात; तीन्ही वेद व अठरा शिल्पें यांमध्यें कोणाही मानवी व्यक्तीस प्रावीण्य मिळवणें शक्य नाही, हें उघड आहे. तथापि वरील प्रकारच्या विधानावरून क्षत्रिय तरुणांना तक्षशिलेंत थोडा बहुत वेदसंस्कार घडत असे असें उघड दिसतें. रामायण व महाभारत या दोनही ग्रंथांमधील क्षत्रिय नायकांचें थोडें बहुत वेदाध्यन झालेलें होतें, व ते स्नानसंध्याही करीत असत.[३] राजपुत्राने ज्या तीनचार विद्या अभ्यासावयाच्या

---

१ भाग १. पान १२५. अल्बेरुनीला धर्मशास्त्राप्रमाणें वैश्यांस वेदाध्ययनाचा अधिकार आहे, हें माहीत होतें, तरीही वैश्यास वेदाध्ययन करून देत नसत असें त्याने विधान केलें आहे. तेव्हा त्या विधानास विशेष महत्त्व देणें जरूर आहे.

२ मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ गीता ९.३२. महाभारत १. १८६. १६ हि याबद्दल पहा. तेथें कोणा अज्ञात तरुणाने द्रौपदीस पणांत जिंकलें आहे असे कळतांच 'तो वैश्य किंवा शूद्र तर नाहीना ?' अशा अर्थाचे द्रुपदाचे उद्गार आढळून येतात.

३ बालकाण्ड, अध्याय १८; आदिपर्व अध्याय ११८, १३३. आदिपर्वांत पांडवांनी वेदविद्येंत पारंगतता मिळवली होती असे विधान आहे, पण तें शब्दशः खरें मानणें चुकीचें होईल. सर्व विद्या पांडवांना येत होत्या हें दाखविण्याचा ग्रंथकाराचा येथें हेतु आहे हें वरील अध्यायावरून दिसून येईल.

असत, त्यांमध्यें आन्वीक्षिकी ऊर्फ वेद-वेदांत याचा अंतर्भाव अर्थ-शास्त्र व मनुस्मृति हे दोनही ग्रंथ करितात. इ. स. च्या प्रारंभाच्या सुमारास राजपुत्राने फक्त दंडनीतिशास्त्रच शिकावें असें मत पुढे येऊं लागलें; त्यावरून या वेळीं क्षत्रियांचें वेदाध्ययन मागे पडत चाललें असावें असें वाटतें. खऱ्या लष्करी शिक्षणास १४–१५ या वर्षांपूर्वी प्रारंभ करणें शक्य नसे; त्यापूर्वीच्या काळांत ज्यांना आपल्या क्षत्रियत्वाचा अभिमान असे ते आपल्या मुलांना थोडें बहुत वेदशिक्षण देत असत. अकराव्या शतकापर्यंत अशीं कांही क्षत्रिय कुलें होतीं हें अल्बेरुनीवरून दिसून येतें. 'कलावाद्यंतयोः स्थितिः' हें मत पुढे बळावलें व थोडेंबहुत वेदाध्ययन करणारीं क्षत्रियकुलें अजीबात नाहींशीं झालीं.

## अंतेवासी पद्धतीचें शिक्षण

### ( Apprenticeship method )

कला, उद्योगधंदे, व्यापार, वगैरे विषयांचें शिक्षणअंतेवासी पद्धतीनें (Apprenticeship) दिलें जात असे. एखाद्या कुशल कारागिराकडे नवशिके विद्यार्थी धंदा शिकण्याकरितां जात; शिक्षण संपलें तरीही अमुक कालपर्यंत आपण तुमच्याकडे कामधंदा करीत राहूं, असा ते (अगर त्यांच्यातर्फे त्यांचे पालक) करार करीत व मग गुरु त्यांना जेवण्यास घालून आपल्या दुकानांत काम शिकवीत असे. अशा तऱ्हेने विद्यार्थ्यांस उद्योगधद्याचें प्रत्यक्ष शिक्षण मिळे. या पद्धतीस संस्कृतमध्यें अंतेवासी पद्धत व इंग्लिशमध्ये (Apprenticeship Method) म्हणतात.

ब्रह्मचर्याप्रमाणें अंतेवासी पद्धतही प्राचीन आहे, पण वैदिक कालामध्यें ती अस्तित्वांत असल्याबद्दल अजून पुरावा सापडत नाही. धर्मसूत्रग्रंथामध्येंही तिचा उल्लेख आढळत नाही; पण त्याचें कारण म्हणजे त्या ग्रथांचे कर्ते ब्राह्मण होते हें होय. मौर्यकालीं ही पद्धत रूढ होती हें मथुरेमध्यें सापडलेल्या एका मौर्यकालीन यक्षिणीच्या पुतळ्यावरून दिसून येतें. 'कुनिकांतेवासिना [नाके]न कता (यखिनी)' असा लेख त्या पुतळ्यावर खोदलेला आहे, त्यावरून खोदकाम अंतेवासी पद्धतीनेच ( apprenticeship ) शिकवलें जात असे असें आढळून येईल. इतर धंद्यांतही तीच चाल असावी असें 'विज्ञानमुच्यते शिल्पं हेमकुप्यादि-

संस्थितिः। नृत्यादिकं च तच्छिक्षन्कुर्यात्कर्म गुरोर्गृहे ॥' या बृहस्पतिवचना-वरून [1] व 'कंकणकटकादिनिर्माणविषयं नृत्यगीतादिकरणविषयं चकारात्स्तं-भकुंभादिरचनाविषयं च विज्ञानं शिल्पमुच्यते'। या देवणभट्टाच्या त्यावरील टीकेवरून दिसून येईल.

अंतेवासी पद्धतीची कल्पना नारद स्मृतींत सापडणाऱ्या पुढील श्लोकांवरून चांगली येईल.

स्वशिल्पमिच्छन्नाहर्तुं बान्धवानामनुज्ञया।
आचार्यस्य वसेदन्ते कृत्वा कालं सुनिश्चितम् ॥ १६ ॥
आचार्यः शिक्षयेदेनं स्वगृहे दत्तभोजनम्।
न चान्यत्कारयेत्कर्म पुत्रवच्चैनमाचरेत् ॥१७॥
शिक्षयन्तमदुष्टं य आचार्यं संपरित्यजेत्।
बलाद्वासयितव्यः स्याद्वधबंधौ च सोऽर्हति ॥१८॥
शिक्षितोऽपि कृतं कालमंतेवासी समाप्नुयात्।
तत्र कर्म च यत्कुर्यादाचार्यस्यैव तत्फलम् ॥१९॥
गृहीतशिल्पः समये कृत्वाचार्यप्रदक्षिणाम्।
शक्तितश्चानुमान्यैनमन्तेवासी निवर्तते ॥२०॥
वेतनं वा यदि कृतं ज्ञात्वा शिष्यस्य कौशलम्।
अंतेवासी समादद्यान्न चान्यस्य गृहे वसेत् ॥२१॥

शुश्रूषाभ्युपगमप्रकरणम्।

कात्यायन व बृहस्पति यांचींही २–३ वचनें या प्रकारचींच आढळतात, पण त्यांवरून विशेष कांही जास्त माहिती मिळत नाही.

धंदेशिक्षणामध्यें अंतेवासीकडून त्याच्या पालकाच्या संमतीने अमुक वर्षेपर्यंत अध्यापकाच्या कारखान्यांत काम करीन असा करार प्रथम करून घेण्यांत येई. ब्रह्मचाऱ्याकडून असा करार करून घेत नसत; पण धंदे-शिक्षणाचा मोबदला म्हणून अंतेवासीकडून होत असलेल्या कामाची मजुरी मिळावयाची असे; शिक्षण घेण्यास जितका वेळ लागेल त्याहून कराराची मुदत प्रायः बरीच जास्त असे; कारण शिकून तरबेज बन-लेल्या विद्यार्थ्यांनी गुरुदक्षिणा म्हणून अध्यापकाकडे कांहीं दिवस तरी

१ विवादरत्नाकर, पान १४१ वर उध्दृत

काम करावें, अशी समाजाची अपेक्षा होती. कराराच्या मुदतीनंतरही शक्य तोंवर, गुरु योग्य मजुरी देण्यास तयार असेल, तर अंतेवासीनें त्याच्याच कारखान्यांत अगर दुकानांत राहावयाचें असे. करार संपण्या-पूर्वी अंतेवासी जर योग्य कारणाशिवाय पळून गेला, तर त्यास पकडून आणून पुन्हा कामास लावतां येई. अंतेवासीने अध्यापकाचे घरींच जेवाव-याचें असे. एकाच गांवांत अध्यापक व अंतेवासी रहात असले, तरीही अंतेवासी गुरुगृहीच रहात असे की काय, याबद्दल विश्वसनीय माहिती मिळत नाही. जर धंदा शिकण्यास लागणाऱ्या वेळापेक्षा दीर्घकाल काम करण्याचा करार असेल, तर प्राय: अंतेवासी करारप्रमाणें गुरुगृहींच रहात व जेवत असावा, हें उघड आहे. कारखान्यांत चोवीस तास राह-ण्याने जास्त सुलभ रीतीने कौशल्य प्राप्त होईल म्हणून अशा अंतेवासींचे पालकही त्यास ठरल्याप्रमाणें गुरुगृहांतच राहण्यास सांगत असावेत. वेदादिकांचें अध्ययन करणाऱ्या गरीब विद्यार्थ्यास गुरुगृहीं सर्व प्रकारचीं कामें करावीं लागत; अंतेवासीकडून मात्र धंद्याशिवाय दुसरें काम गुरूस करून घेतां येत नसे. तसें त्याने केलें तर अंतेवासीला गुरूस सोडून जातां येई, व गुरुही राजदंडास पात्र होई.[१]

अंतेवासी पद्धतीने मिळणारें शिक्षण बरेंच उच्च प्रकारचें असे; प्रत्यक्ष कारखान्यांत तें मिळत असल्यामुळें विद्यार्थी प्राय: कार्यक्षम बनत. प्राचीन हिंदुस्थानांत विणकाम, खाणकाम, धातुशास्त्र (metallurgy), वैद्यक, चित्रकला वगैरे अनेक धंद्यांमध्यें जी प्रशंसनीय प्रगति झाली होती, तिचें बरेंचसें श्रेय या पद्धतीसच दिलें पाहिजे. अंतेवासी पद्धतीने शिक्षण घेतलेले विद्यार्थी प्राय: कूपमंडूक वृत्तीचे व आपल्या धंद्यापलीकडे कांही अधिक न पहाणारे असे असतात, असा सामान्य अनुभव आहे; पण प्राचीन हिंदुस्थानांत पांचव्या शतकापर्यंत तरी हस्तव्यवसायावर उपजी-विका करणारे कारागीर बरेचसे बहुश्रुत असत हें मंदसोर येथें सापडलेल्या एका कोरीव लेखावरून दिसून येतें.[२] या कोरीव लेखांत मंदसोर मध्यें

१ यस्तु न ग्राहयेच्छिल्पं कर्माण्यन्यानि कारयेत् । प्राप्नुयात्साहसं पूर्वं तस्माच्छिष्यो निवर्तते ॥ याज्ञवल्क्य, २.८४ वरील अपरार्क टीकेंत कात्यायन.

२ फ्लीट, गुप्त इन्स्क्रिपशन्स, नं. १८.

वास्तव्य करणाऱ्या एका विणकऱ्यांच्या श्रेणीचें ऊर्फ जमातीचें (guild) वर्णन आहे; त्यावरून या विणकर संघामधील कांही विणकरी धनुर्वेदामध्यें निष्णात होते, कांही ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करीत असत, तर कांही लोककथांचा व्यासंग करीत असें दिसून येते. मन्दसोरांतील विणकरी जसे थोडयाबहुत प्रमाणानें बहुश्रुत होते, तसे इतर धंद्यांतील लोकही असत की नाही, याबद्दल प्रत्यक्ष पुरावा मिळत नाही. पण पांचव्या शतकापर्यंत साक्षरता बऱ्याच विस्तृत प्रमाणावर समाजांत पसरलेली होती,[१] म्हणून मन्दसोरच्या विणकर संघाची परिस्थिति अपवादात्मक मानणें हें योग्य होणार नाही. पुढे तीन चार शतकांनी जेव्हा कारागीर वर्गातील साक्षरता लय पावूं लागली, तेव्हा मात्र अंतेवासी पद्धतीचे विद्यार्थी कूपमंडूकवृत्तीचे व स्वतःच्या धंद्याच्या पलीकडे फारसें न पाहणारे असे होऊं लागले.

मध्ययुगीन युरोपांत कामकरी संघाच्या (guilds) विद्यमानें मिळणाऱ्या शिक्षणक्रमांत व अंतेवासी पद्धतींत बरेंच साम्य आहे. युरोपमध्येंही अमुक वर्षेपर्यंत काम करण्याचा धंदेशिक्षणेच्छूस करार करावा लागे. प्रथम कांही वर्षें त्यास मुळींच मजुरी मिळत नसे; काम येऊं लागलें, म्हणजें त्यास थोडी मजुरी मिळे, पण ती त्यास आपल्या अध्यापकास द्यावी लागे. कराराची मुदत संपण्यापूर्वी त्यास काम सोडून जातां येत नसे. फ्रान्समध्यें प्रत्येक कारागिरास एका वेळीं एकच नवशिक्या काम शिकवण्यास घेतां येत असे.[२] हिंदुस्थानांत अशा तऱ्हेचें नियंत्रण होतें की नाही, याबद्दल पुरावा मिळत नाही. वाङमय शिक्षणक्रमांत प्रायः एकेका अध्यापकापाशीं १०–१५ विद्यार्थीच शिकत हें आपण मागें पाहिलेंच आहे. धंदेशिक्षणांत एका गुरूच्या हाताखाली शिकणाऱ्या अंतेवासींची संख्या याहीपेक्षा कमी असली पाहिजे. गुरूच्या कारखान्याच्या किंवा धंद्याच्या विस्तृततेवर अंतेवासींची संख्या पुष्कळ अंशीं अवलंबून रहात असली पाहिजे.

---

१ पुढील सहावें प्रकरण पहा.

२ ग्रेव्हूज्, ए हिस्टरी ऑफ एज्युकेशन, भाग २, पान ९७.

पांचव्या सहाव्या शतकापासून जाती व धंदे बहुवंशीं आनुवंशिक बनूं लागले; त्यामुळे आपल्या जन्मजात धंद्याचें शिक्षण प्राय: मुलांना घरीच आपल्या बाप, चुलता, वगैरेंसारख्या वडीलधाऱ्या माणसांकडून मिळूं लागलें. अगदी लहानपणापासून आपल्या आनुवंशिक धंद्याच्या वातावरणांत वाढल्यामुळें, व बापच शिक्षक असल्यामुळें धंद्यांतील गुह्य कसबांचेंही ज्ञान सहज मिळत असल्यामुळें कारागीर प्राय: कर्तबगार व कुशल बनत. बाप किंवा चुलता यासारखीं वडील माणसें शिकवण्यास नसली, म्हणजे मुलाला अंतेवासी म्हणून दुसऱ्याकडे धंदा शिकावयास जावें लागे.

## वेद-ब्राह्मण काल

### (सुमारें इ. स. पूर्वी ८०० पर्यंत)

निरनिराळ्या कालखंडांमध्यें धंदेशिक्षणाची कशी कशी परिस्थिति होती हें आता आपण पाहू. वैदिक कालासंबंधीं फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. सुतारकी, गवंडीकाम वगैरे सारखे हस्तव्यवसाय हे या वेळीं हीन दर्जाचे मानले जात नव्हते. एका वैदिक ऋषीचे आजोबा गवंडी होते. रथकार उर्फ सुतार याच्या धंद्यास तर इतका मान असे, की रथकारसंघाचा मुख्य श्रेष्ठी जो असे, त्यास दरबारांत फार उच्च स्थान असे, व त्याचा प्रधानमंडळांत (रत्नीमध्ये) अंतर्भाव केला जात असे. राज्याभिषेकाच्या वेळीं राजास स्वत: रथकाराच्या घरीं जाऊन यज्ञ करावा लागे. तिघे ऋभुबंधु हे प्रथम मानवच होते, त्यांच्या कारागिरीच्या कौशल्यावर लुब्ध होऊन देवांनी त्यांस अमरत्व दिलें, अशी जी ऋभूबद्दल दंतकथा आहे, त्यावरूनही हस्तव्यवसायप्रावीण्यास या काळीं किती महत्त्व देत, हें दिसून येईल. अश्विदेवही प्रथम मानव राजपुत्र होते, त्यांच्या वैद्यकांतील प्रावीण्यावरूनच त्यांस पुढे देवत्व प्राप्त झालें.

धनुर्विद्या, अश्वसारथ्य, लोहारकी, सुतारकी, वैद्यविद्या, खनिविद्या (metallurgy & mining) या विद्या या काळीं आर्यांना अवगत

१ ऋग्वेद, ९. ११२. ३.

२ मै. संहिता, २.६.५;४.३.८; शत ब्रा. ५ ३.१.१.

होत्या; अनार्यांवरील आर्यांचें प्रभुत्व वरील विद्यांमधील नैपुण्यावरच अवलंबून होतें ही गोष्ट ध्यानांत धरली म्हणजे आर्य लोकांपैकी पुष्कळच लोक हे धंदे करीत असावेत याबद्दल संशय उरत नाही.[१] या धंद्यांमध्यें नवीन पिढी निष्णात व्हावी याबद्दल स्वाभाविकपणेंच आर्य लोक काळजी घेत असले पाहिजेत, पण या धंद्यांच्या शिक्षणाची व्यवस्था त्यांनी काय केली होती, याची कांहीच माहिती अद्याप उपलब्ध होत नाही. यांपैकी कांही धंदे कांही कुळांमध्यें अनुवंशिक असावेत; त्या धंद्यांचें ज्ञान घरांतच त्या कुळांतील मुलांना मिळत असलें पाहिजे. सुदासासारख्या विजिगीषु राजांच्या राजधानीत सैन्यास लागणाऱ्या रथांचा, बाणांचा व धनुष्यांचा पुरवठा करण्याकरितां मोठमोठे सुतारकी व लोहारकीचे कारखाने असले पाहिजेत; या कारखान्यांमध्यें कदाचित् नवशिक्या विद्यार्थ्यांना शिकविण्याचीही सोय करण्यांत येत असावी. पण प्रत्यक्ष काय परिस्थिति होती याबद्दल अजून गाढ अज्ञानच आहे.

### इ. स. पू. सुमारें ८०० ते इ. स. पू. सुमारें २५० पर्यंतचा काल.

उपनिषदें, गृह्यसूत्रें, धर्मसूत्रें, वगैरेसारख्या ग्रंथांवरून या कालखंडांतील धंदेशिक्षणाबद्दल जवळ जवळ काहीच माहिती उपलब्ध होत नाही; जी थोडी मिळते ती अर्थशास्त्र, पाली वाङ्मय व ग्रीक इतिहासकार यांपासून मिळते. या कालखंडामध्यें शिल्पकला (Sculpture) व वास्तुशास्त्र ( Architecture ) यांचें ज्ञान फारसें वाढलें नव्हतें हें खरें, तथापि वैद्यक, विणकाम, नौकाबंधन व खनिशास्त्र ( mining & metallurgy ) या धंद्यांमध्यें हिंदुस्थानानें बरीच प्रगति केली होती हें दिसून येतें.

### वैद्यकशिक्षण

या कालखंडामध्यें हिंदूंची वैद्यकामध्यें बरीच प्रगति झाली होती. गाढ विद्याव्यासंग करण्याची हिंदूंना सवयच नाही अशी तक्रार जो स्ट्रॅबो करितो तोच स्ट्रॅबो वैद्यकामध्यें हिंदूंची वाखाणण्याजोगी प्रगति

---

१ वेदाध्ययनाचें प्रस्थ अद्याप फार माजलें नव्हतें हें आपण वर पाहिलेंच आहे; पान ५७ पहा.

झालेली होती हें नमूद करितो.[१] हिंदूंना सर्पदंशासंबंधीं जीं अनेक गुणकारी औषधें माहीत होतीं, त्यांनी अलेक्झँडरबरोबर आलेले ग्रीक लोक थक्क होऊन गेले होते. गोपथ ब्राह्मण[२] व छांदोग्य उपनिषद्[३] यांमध्यें ज्या सर्पविद्या व गरुडविद्या यांचा उल्लेख आढळतो, त्यांचा व्यासंग करणारे लोक सर्पविषप्रतिकाराबद्दलच विशेष परिश्रम करीत असावेत. जातकावरून तक्षशिलेंतील विद्यालयांमध्यें विषविद्येचें शिक्षण मिळत असे हें दिसून येतें. जिच्या आधारावर चरकसंहिता पुढे रचण्यांत आली, ती अग्निवेशसंहिता याच कालखंडांत लिहिली गेली होती; पण ती उपलब्ध नसल्यामुळें वैद्यकाची प्रगति या कालखंडांत किती झाली होती हें समजण्यास मार्ग नाही.

महावग्गावरून मात्र या वेळच्या वैद्यकीय शिक्षणक्रमाची बरीचशी कल्पना येते.[४] शिक्षणक्रम बऱ्याच वर्षांचा होता; सात वर्षें झालीं तरीही तो संपण्याचें चिन्ह जेव्हा दिसेना, तेव्हा घरीं जाण्यास आतुर झालेल्या जीवकानें आपल्या तक्षशिलेंतील गुरुजीस 'आपलें अध्ययन केव्हा संपणार' हा प्रश्न विचारला. 'वैद्यकशास्त्राचें सांगोपांग अध्ययन करावयाचें म्हणजे आणखी बराच वेळ त्यांत घालविला पाहिजे; सात वर्षांत तुला वैद्यकाचें धंदा करण्याजोगें सामान्य ज्ञान झालें आहे, तेंव्हा तूं आता पाटलीपुत्रास घरीं जाऊं इच्छितोस तर जा.' असें त्याच्या गुरूने सांगितलें. यावरून वैद्यकीचा सामान्य शिक्षणक्रम सात आठ वर्षांचा तरी होता हें दिसून येईल. शस्त्रक्रिया व औषधिप्रक्रिया यांचें ज्ञान तक्षशिलेंत विद्यार्थ्यास चांगलेंच देण्यांत येई. पाटलीपुत्रास जात असतां वाटेमध्यें जीवकाने शस्त्रक्रियेने डोक्यांत खोल गेलेलें करट कापून बरें केलें, व पोटांत स्थानभ्रष्ट झालेली आतडी पूर्ववत् केलीं, असें महावग्गावरून दिसून येतें. यावरून शवच्छेदनास शिक्षणक्रमामध्यें प्रमुख स्थान दिलें जाई, व शस्त्रक्रियेचें प्रत्यक्ष अनुभविक शिक्षणही सात वर्षांमध्यें विद्यार्थ्यास मिळे

१ स्ट्रॅबो, १५. ७०६; नीआर्कस्, त्रुटित लेख १५.

२ १. १०

३ ८. १ व त.

४ . १

हें दिसून येईल. याबद्दलची सविस्तर माहिती आपणास मिळूं नये ही दुर्दैवाची गोष्ट होय.

## खनिशास्त्र (Mining & Metallurgy)

खनिशास्त्राचें हिंदूंना फारसें ज्ञान नव्हतें व सोनें, रुपें वगैरे धातु खाणींतून काढण्याची त्यांची पद्धत फार सदोष होती, असें विधान स्ट्रेबोनें केलेलें आहे.[1] ग्रीक लोकांनी हिंदूंच्या खाणी प्रत्यक्ष पाहिल्या होत्या की नाही, याची वानवाच आहे; अर्थशास्त्रामध्यें सोनें, रुपें, तांबें, लोखंड वगैरे धातु खाणींमध्यें अशुद्ध स्वरूपांत असतात तेव्हा ते कोणत्या रंगाचे असतात, याबद्दल जी सामान्यतः बरोबर असणारी माहिती मिळते, त्यावरून हिंदूंचें खनिशास्त्राचें ज्ञान अगदीच बाल्यावस्थेंत होतें असें वाटत नाही. अंतेवासी पद्धतीनेंच बहुतकरून खनिशास्त्राचें शिक्षण दिलें जात असावें.

## नौकाबंधन, विणकाम, व इतर कला

नौकाबंधन व विणकाम या कलांमध्यें या वेळीं हिंदूंची बरीच प्रगति झालेली होती. अर्थशास्त्र व जातकें यांवरून या वेळीं हिंदुस्थानांत नद्यांमधून, किनाऱ्या किनाऱ्यानें, व परदेशाशीं बराच व्यापार चालत असे, असें दिसतें. त्यामुळें नौकाबंधनामध्यें या वेळीं इतकी प्रगति झालेली होती, की अलेक्झँडरचें सर्व सैन्य नदींतून वाहून नेण्यास जितक्या नावांची गरज होती तितक्या नावा झेलम नदीवर चार महिन्यांत बांधतां आल्या. उपनयनामध्यें बटूस द्यावयाचें उपरणें हें त्याच दिवशीं घरीं सूत काढून विणलेलें असावें असें कांही गृह्यसूत्रांत विधान आढळतें, हें आपण मागें पाहिलेंच आहे. त्यावरून विणकामाची कला सर्रास सर्व लोकांस माहीत होती, हें दिसून येईल. सूत कातण्याचें व विणण्याचें शिक्षण घरींच वडील माणसांकडून सर्वांना मिळत होतें. नौकाबंधनाची कला सुतार लोकांमध्यें वंशपरंपरेनें चालत आलेली होती. घरीं शिक्षण मिळणें शक्य नसल्यास अंतेवासी पद्धतीनें तें देण्यांत येई.

या कालखंडामध्यें साम्राज्यें स्थापन करण्यास हिंदुस्थानांत सुरवात झाली. विजिगीषु चक्रवर्तींना मोठें चतुरंग सैन्य लागे, व त्या सैन्यास

---

१ स्ट्रेबो, १५. ७०६.

असंख्य रथ, धनुष्यें, बाण, भाले, बरच्या वगैरे पदार्थ लागत. त्यामुळें सुतारकी व लोहारकी यांचे मोठे कारखाने सैन्याच्या बराकीजवळ उभारावे लागत, व लोखंडादिक धातूंच्या खाणी शोधून काढून त्यांतील धातु काढून ते शुद्ध करून घेण्याची तजवीज राज्यकर्त्यांना करावी लागे, यामुळें खनिशास्त्रासही जोराची चालना मिळाली. खाणीचा कारभार व लष्करोपयोगी कारखाने सरकारीच असत; ते योग्य रीतीने चालावेत म्हणून निष्णात कारागिरांना नवशिक्यांस शिकवण्याबद्दल सरकारी हुकूम असावेत असें वाटतें.

## कारागिरींतील कौशल्य

हस्तव्यवसाय हीन मानण्याची प्रवृत्ति अद्याप समाजांत नव्हती; कुशाग्र बुद्धीचे व उच्च कुलांतील लोक सुद्धा कलाकौशल्याचे व हस्तव्यवसायाचे धंदे उपजीविकेकरितां करीत; त्यामुळें हिंदु लोकांचें उद्योगधंद्यांतील कौशल्य व कल्पकता या वेळी किती वाखाणण्याजोगी होती याबद्दल ग्रीक इतिहासकाराकडून मिळणारें एक उदाहरण येथे घेऊं. अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळी प्रथमच हिंदु लोकांनी ग्रीक लोकांच्याजवळ स्पंज पाहिले. ग्रीक सैन्यामध्यें या पदार्थाचा खप फार आहे हें जेव्हा हिंदु व्यापाऱ्यांनी व कारागिरांनी पाहिलें, तेव्हा त्यांनी लोकर व सुताचे बारीक तंतू यांपासून हिन्दुस्थानांत स्पंज बनवण्यास लगेच सुरुवात केली. ग्रीक स्पंजांसारखे ते दिसावेत म्हणून त्यांना ते रंग देत असत.[१] हस्तव्यवसाय हीन मानण्यांत येऊं लागल्यावर ही कल्पकता लोप पावूं लागली.

## लष्करी शिक्षण

या कालामध्यें समाजाला लष्करी शिक्षण बऱ्याच विस्तृत प्रमाणावर मिळत असे. प्रत्येक खेडेगांव स्वसंरक्षणक्षम असावें असें सामान्यतः राजधोरण असे.[२] ठराविक प्रमाणावर कवाईत शिकलेले शिपाई पुरवण्याच्या अटीवर 'सेनाभक्त' गांवाना कराची माफी मिळे.[३] या गावां-

१ नी आर्कंग्ट, फ्रॅग्मेंट ७

२ कौटिल्य अर्थशास्त्र, २. १ पहा.

३ कौटिल्य अर्थशास्त्र. २. ३४.

मध्यें अर्थातच ग्रामपंचायतीच्या विद्यमानें सर्व सुदृढ तरुणांना लष्करी शिक्षण मिळण्याची व्यवस्था करण्यांत येत असली पाहिजे. कठ, मालव, वगैरे सारखे जे प्रजासत्ताक गण होते, ते बहुतेक सर्व 'आयुधजीवि' या नांवाने ओळखले जात; त्यांमध्येंही सर्व युवकांना लष्करी शिक्षण मिळत असे. पण ग्रामपंचायतीच्या विद्यमानें जें लष्करी शिक्षण मिळत असे, तें कशा प्रकारें देत असत याबद्दल माहिती मिळत नाही. बहुतकरून लष्करांत नोकरी संपवून परत आलेल्या सनिकांकडे तिरंदाजी, बरचीफेक, तलवारीचे हात, वगैरे शिकवण्याची कामगिरी सोपवण्यांत येत असावी असें वाटतें.

मोठमोठ्या गांवांमध्यें उच्च लष्करी शिक्षण देण्याऱ्या लष्करी शाळाही होऱ्या. तक्षशिलेस अशीं अनेक विद्यालयें होतीं, व त्यांपैकी एकामध्यें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतून आलेले १०३ राजपुत्र धनुर्वेदाध्ययन करीत होते.[१] असल्या महाविद्यालयामध्यें बहुतकरून सँढर्स्ट कॉलेजप्रमाणें उच्च दर्जाचे सेनानी तयार करण्याचें शिक्षण देत असावेत. हें शिक्षण किती वर्षें घ्यावें लागे, असलीं विद्यालयें सरकारी असत की खासगी असत, शिक्षणक्रमामध्यें कोणकोणच्या विषयाचा अंतर्भाव करीत, वगैरे गोष्टींबद्दल कांहीच माहिती मिळत नाही.

खेडोखेडीं प्राथमिक लष्करी शिक्षण मिळत असल्यामुळें सैन्यांत दाखल करण्यांत येणारे शिपाई भरतीच्या वेळींच शिपाईगिरींत बरेच निष्णात असत. लष्कराच्या रोज कवायती होत, त्यायोगें त्यांचें शिक्षण लवकरच पूर्ण होत असे.

## (इ. स. पू. सुमारें २५० ते इ. स. सुमारें ८०० पर्यंतचा काल)

वैद्यक, शिल्पकला, स्थापत्य, चित्रकला, नौकाबंधन, खनिशास्त्र वगैरे उपयुक्त व कौशल्याच्या कलामधील हिंदू लोकांचें प्राबीण्य या कालखंडांत अत्यंत उच्च कोटीस पोचलें होतें; अर्थात् त्या शिकवण्याची पद्धतही फार कार्यक्षम असली पाहिजे यांत शंका नाही.

### वैद्यकशिक्षण

चरक व सुश्रुत या ग्रंथांवरून वैद्यविद्येचें शिक्षण कसें देत याची चांगली कल्पना येते. शिक्षणाच्या प्रारंभीं विद्यार्थ्यांचें आयुर्वेदीय उपनयन

---

१ सुतसोम जातक.

करण्याची पद्धत होती हें आपण मागें पाहिलेंच आहे. संस्कृतामधूनच सर्व शिक्षण देण्यांत येत असल्यामुळें संस्कृताचें चांगलें ज्ञान नसलेल्यांना वैद्यकीय शाळांत प्रवेश मिळत नसे. निरनिराळ्या शाखेंतील निष्णात वैद्यांजवळ ते ते विषय विद्यार्थी शिकत.[१] गुरूजवळ शिकलेल्या गोष्टींची आपसांत चर्चा विद्यार्थ्यांनी करावी, असा सुश्रुताचा कटाक्ष आहे.[२] औषधिविज्ञान, शवच्छेदन व शस्त्रक्रिया यांचें प्रत्यक्ष शिक्षण देण्यांत येई.

मिलिन्द पण्हावरून वैद्यशिक्षण कसें देत याची बरीच स्पष्ट कल्पना येते. गुरुदक्षिणेच्या अटीवर किंवा मागें वर्णन केलेल्या अंतेवासी पद्धतीने वैद्य लोक कांही शिष्य शिकवण्यास घेत. शस्त्रक्रियेच्या विद्यार्थ्यांना शस्त्र कसे धरावें, त्याने जखमेंत अगर रुग्ण भागांत छिद्र कसें करावें, मग ते कसे कापावेत, शरीरात घुसलेली बाणाचीं टोकें कशीं बाहेर काढावींत, जखमा कशा धुवाव्यात, बऱ्या होण्याकरितां त्यांत कोणतीं क्षार द्रव्यें घालावीत, त्या वाळून येण्यास काय करावें, त्यांना केव्हा केव्हा कोणकोणत्या प्रकारचीं मलमें लावावींत, मलशुद्धि व्हावी म्हणून बस्ति (एनिमे) केव्हा द्यावेत, वगैरेबद्दल सांगोपांग शिक्षण देण्यांत येई.[३] शवच्छेदनाबद्दल सुश्रुताचा विशेष कटाक्ष आहे. पुस्तकें वाचून शरीरांतील अंतरिंद्रियांची योग्य कल्पना येणें कठीण म्हणून विद्यार्थ्यांनी शवच्छेदन करून प्रत्यक्ष ज्ञान मिळवलें पाहिजे असें त्याचें म्हणणें आहे.[४] शवच्छेदनास लागणारीं शरीरें पाण्यामध्ये कुजवीत, आणि मग त्यांचा छेद करून कातडी, स्नायू, रक्तवाहिन्या, हाडें, अंतरिंद्रियें, वगैरेंचें प्रत्यक्ष ज्ञान विद्यार्थ्यांना करून देण्यांत येई.[५] अशा रीतीने जें विद्यार्थ्यांना अंतःशरीराचें ज्ञान देण्यांत येई तितक्या उच्च प्रकारचें ज्ञान इतरत्र जगामध्यें त्या काळीं कोठेच देण्यांत येत नसे. दुर्दैवाने पांचव्या सहाव्या शतकाच्या नंतर शवच्छेदनाची प्रथा मोडून गेली, आणि त्यामुळें वैद्यक शास्त्राच्या प्रगतीला बराच खो बसला.

---

१ सुश्रुत, सूत्रस्थान, ४.४. ४—८.

२ ,, विमानस्थान, ८.४.

३ भाग २, पृ. २५४–५.

४ सुश्रुत, शारीरस्थान, ५.४९.

५ सुश्रुत, शारीरस्थान, ५.४९

रोग्यावर प्रत्यक्ष शस्त्रक्रिया करण्याच्या पूर्वी विद्यार्थ्यांना शस्त्र चालविण्याचा सराव व्हावा म्हणून काय योजना करीत, याची कल्पना सुश्रुतावरून फार चांगली येते. सूक्ष्म छिद्रें कशीं पाडावीत, हें मृत जनावरांच्या शिरांमध्यें छिद्रें करण्यास लावून शिकवीत; पुवादिकांनी डबडबलेली जखम कशी फोडावी हें पखालीला छेद करावयास लावून दाखवीत; जखम कशी शिवावी हें नाजूक रेशमी कपड्याच्या साहाय्याने शिकवीत; चिंध्यांनी भरलेल्या मनुष्याकृतीच्या साहाय्यानें निरनिराळ्या ठिकाणच्या जखमा कशा बांधाव्यात याचें प्रत्यक्ष शिक्षण देत. अशा अनेक युक्त्या नवशिक्या विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याकरितां योजीत असत असें वरील सुश्रुतांतील सूत्रस्थानांतील नवव्या अध्यायावरून दिसून येते. यामध्यें चांगली प्रगति झाल्यावर मग रुग्णालयामध्यें शस्त्रक्रियेचें प्रत्यक्ष शिक्षणही मिळे. प्राचीन हिंदुस्थानांत पुष्कळ मोठमोठी रुग्णालयें होतीं. पांचव्या शतकांत पाटलीपुत्रामध्यें एक मोठें मोफत रुग्णालय होतें असें फा-हिएनच्या प्रवासवृत्तावरून दिसून येतें. रुग्णालयें कशीं चालवावींत, याचें इतक्या उच्च प्रतीचें ज्ञान हिंदु वैद्यांना आठव्या शतकांत होतें की अबास घराण्याच्या बगदादच्या खलिफांना जेव्हा बगदादला नवीं रुग्णालयें कशीं चालवावींत, याची विवंचना पडली, तेव्हा त्यांनी हिंदुस्थानांतून निष्णात तज्ज्ञ वैद्य त्या कामाकरितां मागविले. दुर्दैवाने प्राचीन हिंदुस्थानांतील रुग्णालयें कशीं चालवीत, त्यांचा खर्च कसा निघे, त्यांना जोडून वैद्यकविद्यालयें होतीं कीं नाही याबद्दल कांहीच माहिती अजून मिळत नाही. पण रुग्णालयें जवळ असलीं तर त्यांमध्यें, किंवा स्वतःचें रुग्णालय असेल तर त्यामध्यें, अध्यापक लोक प्रकृतिनिदानाचें व शस्त्रक्रियेचें प्रत्यक्ष शिक्षण देत असले पाहिजेत असें दिसतें. शस्त्रक्रियेचा ऱ्हास होण्यापूर्वी हिंदु वैद्य मोतिंबिंदु, अंडवृद्धि, करटें, गर्भविमोचन, वगैरेंकरितां शस्त्रक्रिया करीत, असें सुश्रुतावरून दिसून येतें. शस्त्रक्रियेच्या वेळीं वेदना कमी व्हाव्या म्हणून रोग्याला थोडीशी दारू पिण्यास देत. भोजप्रबंधामध्यें अशा वेळीं मोहिनीचूर्ण देत असें विधान आहे, पण हें मोहिनीचूर्ण म्हणजे काय चीज होती, याचा नीट उलगडा अद्याप झालेला नाही. संज्ञाहारक औषधें (anaesthetic) शोधून काढतां न आल्यामुळें

शस्त्रक्रियेमध्यें फारशी प्रगति होऊं शकली नाही. यूरोपमध्यें झालेली शस्त्रक्रियेमधील प्रगति अगदी अलीकडील आहे हें आपणास येथे विसरतां कामा नये.

या कालखंडांतील प्रथमार्धामध्यें तक्षशिलेसारख्या ठिकाणीं नामांकित वैद्य लोक खासगी रीतीनेही अध्यापनाचे काम करीत. पांचव्या शतकांत वाङ्मयात्मक शिक्षणाकरितां आधुनिक पद्धतीची सार्वजनिक विद्यालयें निघालीं, पण त्या वेळीं वैद्यकीच्या शिक्षणाकरितांही अशा शाळा निघाल्या की काय याची माहिती उपलब्ध होत नाही. चरक[१] व सुश्रुत[२] या दोनही ग्रंथांमध्यें देशामध्यें वैदूलोक वैद्यकीचा धंदा करीत असतील, तर तो राजाचा दोष होय, असें विधान आढळतें. त्यावरून वैद्यांची योग्यता ठरवण्याचें काम कांही अंशीं राजसत्तेकडे असे, असें दिसून येतें. राजवैद्यासारख्या नामांकित वैद्यांच्या हाताखाली जे शिकले असतील, रुग्णालयांमध्ये ज्यांना रोगचिकित्सेचें व शस्त्रक्रियेचें प्रत्यक्ष ज्ञान असेल, त्यांनाच बहुतेक राजमान्यता मिळत असावी असें मानण्यास हरकत दिसत नाही; पण याबद्दल प्रत्यक्ष पुरावा कांहीच नाही! हेंही येथें नमूद करणें जरूर आहे.

वैद्यकीचा शिक्षणक्रम मागील कालखंडांत ७–८ वर्षांचा होता; या वेळींही बहुतेक तो तितकाच दीर्घकालीन असावा असें वाटतें. शिक्षण संपवून घरीं जातांना शिष्यास देण्यांत येणारा उपदेश खरोखरच फार चांगला व समयानुरूप होता. "सर्व मानव जातीच्या हिताकरितां झटलें पाहिजे, रोगार्तांचा रोगपरिहार करण्यास सर्वकाल प्रयत्न केला पाहिजे, स्वतःच्या जिवाला जरी धोका असला, तरीही रोग्याची चिकित्सा मध्यंतरी थांबवतां कामा नये, यावज्जीव अध्ययन व संशोधन चालू ठेवलें पाहिजे." अशा अर्थाचा तो उपदेश असे. या उपदेशाप्रमाणें बरेच वैद्य वागत हें वैद्यकविद्यानैपुण्याबद्दल जी हिंदुस्थानची या वेळीं ख्याती होती त्यावरून कबूल करावें लागेल. आठव्या शतकाच्या उत्तरार्धात हिंदुस्थानांतून वीस प्रख्यात वैद्यांना बगदादच्या हरून खलिफाने अरब लोकांना

१ सूत्रस्थान, २९. ८.

२ सूत्रस्थान, ३. ५२.

वैद्यविद्या शिकविण्यास व तेथील रुग्णालयें चालविण्यास बहुमानपूर्वक बोलावलें होतें. या वैद्यांमध्यें माणिक्य उर्फ मणका हा फार प्रसिद्ध होता. अरब वैद्यांनी असाध्य ठरवलेल्या रोगापासून त्याने खलिफास बरें केलें; खलिफानें त्यास राजवैद्य केलें व त्याच्याकडून सुश्रुताचें आरबींत भाषांतर करवलें. [१]

या कालखंडाच्या शेवटीं शेवटीं वैद्यकीचा धंदा हीन मानण्यांत येऊं लागला. वैद्यांची गणना स्मृतींकडून पंक्तिदूषकांमध्यें होऊं लागली. वैद्यकीचा धंदा ब्राह्मण व वैश्य यापासून उत्पन्न झालेल्या संकर जातीसच योग्य होय असें स्मृतिकार म्हणूं लागले. [२] गालव ऋषीना अम्बा नांवाच्या मोलकरणीपासून जी संतति झाली, तिला हा धंदा सांगण्यांत आला, असें पुराणें म्हणूं लागली. या विचित्र कल्पना समाजांत कितपत मान्य होत होत्या, हें सांगणें कठीण आहे. कधी कधी कोरीव लेखामध्यें दिलेल्या गांवांच्या हिश्शांपैकी एखादा हिस्सा ब्राह्मणाबरोबर वैद्यासही दिलेला आढळतो. पण सातव्या आटव्या शतकाच्या सुमारास अहिंसेचा अतिरेक झाला, शिवाशिवीच्या कल्पनाही फार जिकिरीच्या झाल्या; त्यामुळें शवच्छेदन करणारा, मुमूर्षु रोग्यांना व सूतिका स्त्रियांना शिवणारा, अमंगळ रोगावर औषध देणारा वैद्यही स्वतः अमंगळ व पंक्तिदूषक मानण्यांत येऊं लागला, वैद्यकीस हीन लेखण्याने त्या शास्त्राच्या प्रगतीस धक्का बसल्याशिवाय राहिला नाही.

पशुवैद्यकही हिंदुस्थानांत बरेंच जुनें आहे. अशोकाने मनुष्याप्रमाणें पशूंच्याही औषधाची योजना केली होती. [३] नकुल व सहदेव हे दोघेही पशुवैद्यकामध्यें दर्दी होते. [४] सैन्यामध्यें हत्ती व घोडे यांच्याकरितां पशुवैद्य नेमावेत असें अर्थशास्त्राचें सांगणें आहे. [५] जयदत्ताचें 'अश्ववैद्यक', नकुलाची 'अश्वचिकित्सा', पालक्काचा 'हस्त्यायुर्वेद' वगैरे ग्रंथ याच कालखंडांत

१ धन्वंतरी उर्फ दहन व मालेह बिन् बहला हे दोन हिंदु वैद्यहि बगदादला प्रसिद्ध होते. (नडवी, 'आरब और भारत के संबंध, हिंदी भाषांतर', पृ.१०३–१२३.)

२ बौ. ध. सू. १. ८. ९.

३ तिसरा शिलालेख.

४ विराट पर्व, अध्याय, ९, २१.

५ २. ३० व ३२.

लिहिण्यांत आले;[१] यावरून यावेळीं पशुवैद्यकाचें बरेंच अध्ययन-अध्यापन होत असावें असें दिसतें. पण हें शिक्षण कसें देत असत याबद्दल कांहीच माहिती मिळत नाही. पशुवैद्यांचें शिक्षण अंतेवासी पद्धतीने होत असावें असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाही.

## शिल्पादि कला

हिंदुस्थानांत प्राचीन कालचे जे शिल्पकलेचे अत्युत्कृष्ट नमुने उपलब्ध आहेत ते बहुतेक सर्व याच कालखंडांत निर्माण झालेले आहेत. या कालखंडाच्या आरंभी शिलेवर खोदकाम करण्याची कला फारशी अवगत नव्हती; अशोकाने जेव्हा दगडी इमारती व स्तूप बांधण्याचा सपाटा सुरू केला, तेव्हा दगडावरील खोदकामाची आवश्यकता उत्पन्न झाली. लाकूड, हस्तिदंत वगैरेवर काम करणारे कारागीर आता दगडावर काम करूं लागले, सांचीच्या एका तोरणाचें काम हस्तिदंतावर काम करणाऱ्या कारागिरांनी केलेलें आहे.[२] प्रथम प्रथम शिल्पकला बाल्यावस्थेंत होती, पण स्वतःच्या कल्पकतेने, व ग्रीक लोकांचें गांधार, पंजाब वगैरेकडील शिल्पकाम पाहून लवकरच हिंदु लोकांनी शिल्पकलेमध्यें बरेंच प्रावीण्य मिळविलें. पेशावर, मथुरा, सांची, भारहूत, सारनाथ, नालंदा, पाटलीपुत्र, कार्ली, एलोरा, अजंटा, अमरावती वगैरे ठिकाणें शिल्पकलेचीं केंद्रें होतीं. अंतेवासी पद्धतीने या कलेचें शिक्षण पूर्वीच्या कालखंडांत मथुरेला दिलें जात असे; तीच पद्धत याही कालखंडांत प्रचारांत होती. शिल्पकलाकोविदांना मूर्तिशास्त्राचें (Iconography) चांगले ज्ञान असावें लागे, व त्याकरितां पुराणें, साधन ग्रन्थ, वगैरे ज्या संस्कृत ग्रंथांत मूर्तींच्या आकारादिकांचीं चर्चा केलेली आहे, त्यांचें चांगलेंच अध्ययन करावें लागे. निरक्षर लोकांचे हातून हें होणें शक्य नसे; म्हणून, शिल्पकलेंत जे कुशल असत, ते या वेळीं सामान्यतः संस्कृत समजण्याइतके तरी सुविद्य असत.

गांधार देशांतील सुंदर स्तूप, कार्ली, अजंटा वगैरे ठिकाणच्या आश्चर्यजनक गुहा, व दक्षिण हिंदुस्थानांतील भव्य देवालयें पाहिलीं,

---

१ विंटरनिट्झ, संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, भाग ३ पान ५३२–३३ (जर्मन पुस्तक)

२ वेदिमकेहि दंतकारेहि रूपकंमं कतम् । ए. इं., २. पान २७८.

म्हणजे स्थापत्यशास्त्र प्राचीन हिंदुस्थानांत परिणतावस्थेस पोचलें होतें याबद्दल शंका राहात नाही. स्थापत्यशास्त्राच्या विद्यार्थ्यांना गणित, चित्रकला, वास्तुशास्त्र व पुराणें इतक्यांचा अभ्यास करावा लागे.[१] तज्ञांचे हाताखाली घरें वगैरे बांधण्याचें प्रत्यक्ष शिक्षणही विद्यार्थ्यांस घ्यावें लागे. शिक्षणक्रम किती वर्षांचा होता, याबद्दल मात्र कांही माहिती मिळत नाही.

चित्रकला, नृत्यकला, गायनकला, वगैरे ललितकलांचें शिक्षण प्रायः राजघराण्यांतील किंवा संपन्न घराण्यांतील स्त्रीपुरुषच घेत असत. सामान्य लोकांच्या शिक्षणक्रमामध्यें देखील या ललितकलांचा थोडा बहुत समावेश करणें इष्ट आहे, याची फारशी जाणीव हिंदु शिक्षणशास्त्रज्ञांना होती असें दिसत नाही. प्राचीन ग्रीक लोकांनी मात्र संगीतासारख्या ललितकलांचा सामान्य शिक्षणक्रमामध्येंही अंतर्भाव केला होता;[२] त्यामुळें प्राचीन ग्रीसमध्यें ललितकलांचा फारच विकास झाला.

राजे व श्रीमंत लोक संगीत, चित्रकला, वगैरे आपल्या मुलांमुलींना शिकविण्याकरितां खाजगी शिक्षक नेमीत असें संस्कृत नाटकांवरून दिसून येतें. गायक शिक्षक अंतेवासी पद्धतीने आपली कला आपल्या गुरूपासून शिकत; ते एखाद्या विशिष्ट जातीचे होते असें दिसत नाही. नाटकें बसविण्याची कामेंही त्यांनाच करावीं लागत.

## व्यापारी शिक्षण

मनुस्मृतीमध्यें वैश्यांच्या कर्तव्याविषयीं[३] व अर्थशास्त्रामध्यें व्यापाराध्यक्षासंबंधी जी माहिती मिळते, तिजवरून व्यापारी शिक्षणाच्या सामान्य स्वरूपाची आपणास कल्पना करितां येते. कोणता माल कोणत्या देशांत होतो, व तो कोणत्या मार्गाने आपल्या देशांत येतो, याचें ज्ञान व्यापाऱ्याला जरूर असे, म्हणून व्यापारी-भूगोलास शिक्षणक्रमांत प्राधान्य दिलें जाई. ज्या वस्तूंचा व्यापार करावयाचा, त्यांच्या निरनिराळ्या जातींचीही चांगली माहिती देण्यांत येई. निरनिराळ्या देशां-

---

१ वास्तुविद्या. ( त्रिवेंद्रम् संस्कृत सिरीज़ ) १. १२ व पुढें.

२ मनरो, ए टेक्स्ट बुक ऑफ दि हिस्टरी ऑफ एज्युकेशन, पृ. ८९.

३ मनुस्मृति, ९, ३३१–२; अर्थशास्त्र, २. १६.

तील लोकांच्या निरनिराळ्या काळीं काय काय गरजा असतात, निरनिराळ्या ठिकाणीं जत्रा केव्हा केव्हा भरतात, निरनिराळ्या वस्तूंचे निरनिराळ्या देशांत काय भाव असतात, निरनिराळ्या प्रांतांतील व देशांतील जीं नाणीं असतात त्यांचे भाव काय असतात, हुंड्यांचा व्यापार कसा करावा वगैरे बद्दल सांगोपांग ज्ञान व्यापारी विद्यार्थ्यांस देण्यांत येई. परदेशाशीं व्यापार करूं इच्छिणाऱ्यांना जरूर त्या विदेशी भाषाही कामापुरत्या शिकवीत असत.

व्यापारी वर्गापैकी शेकडा किती लोक इतकें सांगोपांग व उच्च शिक्षण संपादीत, याबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. मोठमोठ्या व्यापारामध्यें जीं घराणीं वंशपरंपरा पडलेलीं असत, त्यांमधील व्यापाऱ्यांना वरील प्रकारची बहुतेक सर्व माहिती अवगत असावी. ज्यांचा व्यापार जुजबी असे, त्यांना इतक्या ज्ञानाची गरज नसे; व त्यांना तें नसावें असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाही. घरचा धंदा लहानपणापासून पाहण्यानेच त्यांना यापैकी बरेंच ज्ञान अवगत होत असावें. घरीं शिक्षणाची अशी सोय नसली, तर एखाद्या पेढीवर अंतेवासी पद्धतीने राहून महत्त्वाकांक्षी तरुण व्यापाराचें सांगोपांग ज्ञान मिळवीत.[१] व्यापारी विद्यालय अस्तित्वांत असल्याचा पुरावा अजून तरी मिळत नाही.

## लष्करी शिक्षण

सामान्यत: मागील कालखंडाप्रमाणेंच याही कालखंडांत लष्करी शिक्षणाची स्थिति होती. भाला कसा पेलावा, तरवार कशी वापरावी, बाणाने अचूक नेम कसे घ्यावेत, याची माहिती सामान्यत: सर्व हिंदू तरुणांना या वेळीं होती. बहुतेक सर्व गांवांमध्यें या वेळीं हौशी तरुणांची संरक्षक सैन्यपथकें (militia) असत, व त्यांचें आधिपत्य पाटलाकडे असे.[२] महाराष्ट्र व कर्नाटक यांमध्यें खेडेगांवाच्या आपापसांतील लढायांमध्यें मृत्यु पावलेल्या ग्रामवीरांची स्मृति कायम राखण्याकरितां खोदलेले अनेक शिलालेख सापडले आहेत. खेडेगांवांमध्यें हौशी लोकांच्या सेना (militia) नसत्या, तर या यादव्या व खासगी लढाया शक्य झाल्या नसत्या. हिंदुस्थानांत या वेळीं मौर्य, गुप्त, वर्धन, चालुक्य,

---

१ सतराव्या शतकामध्येंही हीच पद्धत सुरू होती; टॅव्हर्नियर, पा. ३८७.

२ अळतेकर, ए हिस्टरी ऑफ व्हिलेज कम्युनिटीज्, पान ५४ ते पुढे.

राष्ट्रकूट, पाल, गुर्जर-प्रतिहार, वगैरे मोठीं साम्राज्यें होतीं, व त्यांचीं सैन्यें सामान्यतः पांच लाखापेक्षा कमी नसत. त्यांच्या हाताखाली अनेक मांडलिक असत, व त्यांच्या पदरींही बरीच सेना असे. या सैन्यापैकी बरेंचसें सैन्य मौलिक म्हणजे अनुवंशिक असे, व त्याचें शिक्षण सैनिकांच्या खेडेगांवांमध्यें घरींच बरेंचसें होई. ग्रामपंचायतीच्या विद्यमानें सामान्य लष्करी शिक्षण बहुतेक सर्व तरुणांना मिळे; ज्यांना सैनिकाचा धंदा पतकरावयाचा असे, त्यांच्याकरितां कांही सेनानी खास शाळा काढीत. मातीच्या किंवा पाचोळे भरून केलेल्या मनुष्याकृतीवर नेम मारण्यास व भाला, तलवार, वगैरे शस्त्रांचे कुशलतेनें उपयोग करण्यास या शाळांमध्यें शिकवत. शिक्षण संपलें म्हणजे हे सेनानी अध्यापक आपण तयार केलेले सैनिक राजाच्या सैन्यामध्यें दाखल करण्यास नेत, व त्यांना त्यांनी दिलेल्या शिक्षणाचा मोबदला म्हणून राजाकडून रोख रक्कम, जमिनी किंवा हत्ती घोडे वगैरे मिळत.[१] नवव्या शतकामधील एका कोरीव लेखांत एका सेनानीचा "घोड्यांना शिक्षण देण्यांत दर्दी' म्हणून उल्लेख केलेला आढळतो.[२] हा सेनानी बहुतेक घोडदळाचा शिक्षक असावा; त्याने खासगी वर्ग काढला होता, की तो राष्ट्रकूटांच्या सरकारी लष्करी शाळेंत शिकवीत असे, याची माहिती वरील शिलालेखावरून मिळत नाही. बहुतेक सर्व तरुणांना या वेळी ग्रामपंचायतीमार्फत स्वतःचा बचाव करण्यापुरतें थोडें बहुत लष्करी शिक्षण मिळे. कांही गांवांमध्यें सेवानिवृत्त किंवा महत्त्वाकांक्षी लष्करी हुद्देदार असत. ते लष्करी शिक्षणाचे खास वर्ग काढीत व त्यांना या कामाबद्दल देणगीच्या रूपाने सरकारी प्रोत्साहन मिळे. याव्यतिरिक्त लष्करी शिक्षणाच्या शाळा होत्या असें दिसत नाही. लष्करामध्यें जे लोक घेत असत, त्यांचें अशा तऱ्हेने प्रथमच बरेंच लष्करी शिक्षण झालेलें असे. लष्करांत दाखल झाल्यावर ज्या कवायती प्रत्यहीं होत त्यांनी तें शिक्षण पूर्णत्वास जाई.

---

१ मिलिन्द पण्ह २. १५३–४. या पद्धतीचें वर्णन वाचून बहुतेक सर्व वाचकांस हिंदुस्थान सरकारकडून विलायत सरकार जो capitation charge वसूल करून घेतें त्याची आठवण होईल.

२ ए. इं., भाग १३, पान १८७.

## धंदेशिक्षणाचीं विद्यालयें

या कालखंडामध्यें इ. स. ५०० च्या सुमारास वाङमयात्मक शिक्षणाकरितां सार्वजनिक विद्यालयें सुरू झालीं; कला व उद्योगधंदे यांच्या शिक्षणाकरितां मात्र सार्वजनिक विद्यालयें निघालीं होतीं असें दिसत नाही. वाङमय किंवा कोरीव लेख यांमध्यें कोठेंच असल्या विद्यालयांचा उल्लेख सापडत नाही. विदेशी यात्रेकरू किंवा प्रवासी यांपैकी एकालाही या विद्यालयांची थोडीशीही माहिती असल्याचें दिसत नाही. व्यापारी, तेली, विणकर, तांबट, कुंभार, वगैरे सर्व धंदेवाल्या लोकांचे या वेळीं संघ (guilds) स्थापन झाले होते; हे संघ साम्राज्यांपेक्षाही चिरस्थायी असत. या संघांचे निधि व कार्यकारी मंडळें असत, व ते पुष्कळ लोकोपयोगी कार्येंही करीत. कर्नाटकांतील वीरबळंजु संघाने तर डांबल येथें एक वाङमयाचें महाविद्यालयही चालविलें होतें. [१] पण एखादें धंदे शिक्षणाचें विद्यालय एखाद्या संघाने चालवलेलें अद्याप तरी उपलब्ध नाही. ही गोष्ट वाटते तितकी चमत्कारिक नाही, कारण या वेळीं असल्या विद्यालयांची फारशी गरजही नव्हती. बहुतेक धंदे अनुवंशिक झाले होते, व त्यांचें शिक्षण मुलांना घरगुतीच मिळे. ज्यांना घरगुती शिक्षण मिळणें शक्य नसे, ते अंतेवासी पद्धतीने आपला धंदा शिकत. यामुळें सार्वजनिक विद्यालयांची जरूरी भासली नसावी असें वाटतें.

### सुमारें इ. स. ८०० ते सुमारें इ. स. १२००

सामान्यतः मागील कालखंडांतील परिस्थिति या कालखंडांतही टिकून राहिली. धंदेशिक्षणाच्या सार्वजनिक शाळा याही कालखंडांत निघाल्या नाहीत; अंतेवासी पद्धतीने किंवा घरगुती रीतीने धंदेशिक्षण प्रायः नवीन पिढीस मिळत असे. या कालखंडामध्यें लेखन वाचनाचें ज्ञान सामान्य जनसमूहास नव्हतें, व शेकडा ७० लोक निरक्षर होते, हें पुढल्या प्रकरणामध्यें दिसून येईल. विणकाम, शिल्पकाम वगैरे धंदे करणाऱ्या लोकांना या कालखंडांत आपल्या धंद्याशिवाय कांही विशेष दुसरें सामान्य ज्ञान होतें, असें दिसत नाही. मन्दसोरमधील विणकऱ्यांना पांचव्या

१ इं. अँ., भाग ८. पृ. १९५.

शतकामध्यें ज्योतिष, धनुर्वेद व लोककथा यांचें बरेंच ज्ञान होतें; पण या कालखंडामधील विणकरी किंवा शिल्पकारागीर असे बहुश्रुत असणें शक्य नव्हतें, कारण ते सामान्यतः निरक्षर झाले होते.

बहुतेक सर्व अभ्यासक्रम सोपे करण्याकडे या कालीं समाजांत प्रवृत्ति उत्पन्न झाली होती. विज्ञानेश्वराच्या एका विधानावरून वैद्यकीचा शिक्षणक्रम या वेळीं चार वर्षांचाच होता असें दिसून येतें. [१] पूर्वी तो निदान सात वर्षांचा तरी असे. या वेळीं शस्त्रक्रिया मागे पडल्यामुळें चार वर्षांत वैद्यकाध्ययन संपवणें शक्य झालें असावें. या वेळचें शिल्पकाम पूर्वीच्या मानानें बरेंच कमी प्रतीचें आहे. शिल्पशास्त्रही पूर्वीप्रमाणें कसोशीने शिकवण्यांत येत नसावें. हिंदुसैन्याचा मुसलमानी सैन्यापुढे कसा पराभव झाला तें पाहिलें म्हणजे लष्करी शिक्षणही बरेंच कमी दर्जाचें झालें असावें असें वाटूं लागल्याशिवाय रहात नाही.

बहुतेक सर्व शास्त्रांमध्यें या वेळीं प्रगतीचा अभाव दिसून येतो; रसायनशास्त्र हें एक तेवढें या नियमास अपवाद होय. रसायन शास्त्रावर या कालखंडांत इतके ग्रंथ लिहिले गेले आहेत, की त्याचा या वेळीं पुष्कळच अभ्यास करण्यांत येत असला पाहिजे, असें मानण्याशिवाय गत्यंतर दिसत नाही. आयुर्वेदिक औषधांमध्यें या वेळीं पाऱ्याचा फार उपयोग करण्यांत येऊं लागला; त्यामुळें पाऱ्याचीं रसायनें कशीं करावयाचीं, त्यांचा इतरांवर काय परिणाम होतो, याची वैद्यांना छाननी करणें जरूर पडूं लागलें. त्यामुळें रसायन शास्त्रास या वेळीं बरेंच उत्तेजन मिळालें. आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमामध्यें या वेळीं बहुतकरून रसायन शास्त्राचा अंतर्भाव केला गेला असावा.

वैद्यक, ज्योतिष, गणित वगैरे शास्त्रांवर या कालखंडामध्यें जे ग्रंथ लिहण्यांत आले आहेत, ते सर्व टीकात्मक, नावीन्यरहित व शोधशून्य आहेत. यावरून या शास्त्रांचें अध्ययन गतानुगतिकत्वाच्या स्वरूपाचें होतें, त्यांमधला जोम निघून गेला होता असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाही.

---

१ याज्ञवल्क्य स्मृति, २. १८४ वरील टीका.

# प्रकरण सहावें

# प्राथमिक शिक्षण

प्राथमिक शिक्षणामध्यें कोणकोणत्या विषयांचा अंतर्भाव होत असे, तें कसें दिलें जात असे, त्याच्या शाळा कोण व कोणाच्या मदतीनें चालवीत, याबद्दल थोडी माहिती उपलब्ध आहे. स्मृतिकारांचें सर्व लक्ष उच्च शिक्षणाकडे होतें, प्राथमिक शिक्षणाबद्दल कांही लिहावें हें त्यांच्या ध्यानीं मनींही आलेलें दिसत नाही.

### वेद व ब्राह्मण काल (सुमारें इ. स. पू. ८०० पर्यंत)

या कालखंडाच्या प्रारंभी लेखनकला आर्यांना अवगत नव्हती. ती माहीत झाल्यावरही बरींच शतकें तिचा अध्यापनामध्यें उपयोग करण्यांत येत नसे. व्याकरणशास्त्राचा अजून उदय व्हावयाचा होता, व गणितशास्त्रही फारच बाल्यावस्थेंत होतें. लेखन, वाचन, हिशेब व थोडेसें व्याकरण म्हणजे प्राथमिक शिक्षण अशी आपली हल्ली कल्पना आहे; या प्रकारचें प्राथमिक शिक्षण या कालखंडाच्या प्रारंभीं शक्यच नव्हतें, हें वाचकांना आता सहज कळून येईल. या वेळचें प्राथमिक शिक्षण म्हणजे कांही वेदमंत्र व ऐतिहासिक पोवाडे (नाराशंसी गाथा) पाठ करणें एवढेंच असावें, व तें उपनयनानंतरच सुरू होत असावें, असें दिसतें.

उत्तरसंहिताकाली लेखनकला अवगत झाली होती, व व्याकरण, छंदःशास्त्र, वर्णोच्चारशास्त्र (शिक्षा) वगैरेंचाही उदय किंवा विकास होत चालला होता. वेदाभ्यासी विद्यार्थ्यांना या काळीं प्रथम अक्षर ओळख करून देत असावेत असे वाटतें. याबद्दल खात्री मात्र देतां येत नाही, कारण वेदाध्ययनास लेखनकलेचा उपयोग करून घ्यावयाचा नाही असा पुष्कळ शतकांपर्यंत वैदिकांचा कटाक्ष होता. नवीन लेखनकलेकडे रहस्यस्फोट करणारी घातुक कला म्हणून कदाचित् पुराणमताभिमानी लोक साशंक दृष्टीनेही पहात असतील. त्यामुळेच कदाचित् अक्षरस्वीकरण संस्कार बरींच शतकें अस्तित्वांत आला नसावा.

वेदपूर्व अध्ययनास जर 'प्राथमिक शिक्षण' म्हणावयाचें आपण ठरविलें, तर सुमारें आठव्या नवव्या वर्षापर्यंत यावेळीं मुलांना काय काय शिकवीत हें तैत्तिरीय प्रातिशाख्यावरून कळून येतें. ऱ्हस्व व दीर्घ स्वर कसे उच्चारावयाचे, निरनिराळे उदात्तादि स्वर कसे म्हणावयाचे, संधी-मुळें स्वरांत व व्यंजनांत काय काय फेरफार होतात, शब्दांचे व्याकरण-शास्त्रदृष्ट्या नामसर्वनामादिक मुख्य भेद कोणते, पदपाठाचा संहितापाठ व संहितापाठाचा पदपाठ करिताना काय काय फरक पडतात, वगैरे-बद्दलचें ज्ञान वेदाध्ययन सुरू करण्यापूर्वी विद्यार्थ्यास देत असत.[१] या कालचें प्राथमिक शिक्षण अशा प्रकारचे असे.

क्षत्रिय-वैश्यांची मुलें वैदिक मंत्र ब्राह्मणाइतक्या कसोशीने शिकत नसत; बहुतकरून त्यांच्या 'प्राथमिक शिक्षणा'मध्यें इतक्या गोष्टींचा अंतर्भाव होत नसावा लेखनकलेकडे ती फारसें लक्ष देत नसावीत; व्यापार अजून बाल्यावस्थेत होता; त्यामुळें वैश्याना लेखनाची फारशी गरज नव्हती. मार्मियन् मधील लॉर्ड डग्लस्प्रमाणें या काळचे क्षत्रियही 'आपणास एक अक्षरही लिहितां येत नाही',[२] असें अभिमानाने सांगत नसतीलच असें खात्रीने म्हणवत नाही.

## द्वितीय कालखंड

### (सुमारें इ. स. पू. ८०० ते सुमारें इ. स. पू. २००)

या कालखंडामध्यें प्राथमिक शिक्षणाचें स्वरूप व विषय बरेचसे बदलले. लेखनकला समाजांत चांगली रूढ झाली होती; वेदाध्ययनाकरितां

---

१ गुरुत्वं लघुता साम्यं ह्रस्वदीर्घप्लुतानि च। लोपागमविकारांश्च प्रकृति-विकृतिः क्रमः ॥ ४ ॥ स्वरितोदात्तनीचत्वं श्वासो नादोऽङ्गमेव च। एतत्सर्वं तु विज्ञेयं छंदोभाषामधीयता ॥ ५ ॥ पदक्रमविशेषज्ञो वर्णक्रमविचक्षणः। स्वरमात्राविभागज्ञो गच्छेदाचार्यसंसदम् ॥६॥— तैत्तिरीय प्रातिशाख्य, अध्याय १६.

या श्लोकांमध्यें विद्यार्थी लिपिज्ञ असावा असें सांगितलेलें नाही हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. यांतील श्लोकांत सांगितलेल्या गोष्टी जाणणारा मनुष्य स्वर्गास जातो असा सायणाचार्यांनी या श्लोकाचा अर्थ केला आहे तो चिंत्य वाटतो. वेदाध्ययना-करितां गुरुकुलीं (आचार्यसंसदम्) जाणाऱ्या विद्यार्थ्यास या सर्व गोष्टी येत असाव्यात असेंच सांगण्याचा प्रातिशाख्याचा हेतु आहे, हे उघड दिसतें.

२ मार्मियन्, ६. १५.

तिचा उपयोग करणें जरी प्रशस्त मानलें जात नसलें, तरी तिचा एकंदरींत उपयोग समाजास पटला, व तिचा प्राथमिक शिक्षणामध्यें अंतर्भाव झाला. व्याकरणशास्त्राचा चांगला विकास झाला होता, व व्याकरणाचीं मूलतत्त्वें प्राथमिक विद्यार्थ्यास शिकावीं लागत. त्याचप्रमाणें थोडें बहुत गणितही शिकवलें जाई. वर्णोच्चारशास्त्र व छंदःशास्त्र याही शास्त्रांचीं मूलतत्त्वें पूर्वींप्रमाणें याही कालखडांत उपनयनापूर्वीं विद्यार्थ्यांना शिकवीत. मागें सांगितल्याप्रमाणें प्राथमिक शिक्षणास प्रारंभ चौलकर्माच्या वेळीं पांचव्या सहाव्या वर्षी होई, व तें उपनयनाच्या वेळीं म्हणजे आठव्या नवव्या वर्षीं संपत असे.

इतकें प्राथमिक शिक्षण झाल्याशिवाय या कालांत उपनयन होत नसे; व तें या वेळीं सर्व त्रैवर्णिकांना सक्तीचें करण्यांत आलें होतें हें आपण मागें पाहिलेंच आहे. त्यामुळें या कालखंडाच्या प्रारंभीं लेखनवाचन बहुतेक सर्व आर्यांना येत होतें असें मानण्यास हरकत नाही. या कालखंडाच्या शेवटीं वैश्य लोकांचा दर्जा शूद्रासमान होऊं लागला. त्यामुळें त्यांच्यापैकी कांहींचें उपनयन बंद होऊं लागलें असावें. पण हिंदुस्थानचा प्रांताप्रांतातील व परदेशीय व्यापार या वेळीं बराच वाढला होता, त्यामुळें उपनयन जरी बंद होऊं लागलें असलें तरी वैश्यांमधील साक्षरताप्रसारास आळा पडला नाही. एकदरीत आर्यांपैकी शेंकडा ७५ लोक तरी यावेळी साक्षर असावेत असें वाटतें. छांदोग्य उपनिषदामधील अश्वपति राजा 'माझ्या राज्यांत कोणीही निरक्षर नाही' असें म्हणतो;[१] हें त्याचें म्हणणें बरेंचसें खरें असावें असें वरील विवेचनावरून दिसून येईल. त्या त्या प्रांतांतील भाषांमध्यें व लिपींमध्यें अशोकानें आपला धर्मसंदेश ज्या अर्थी लिहिला आहे, त्या अर्थीं लोकांमध्यें साक्षरता बऱ्याच विस्तृत प्रमाणावर प्रसृत असली पाहिजे, असें व्हिन्सेंट स्मिथ आदिक कांहीं पाश्चात्य विद्वान्ही अनुमान काढितात.[२] लिपिभिन्नता व भाषाभिन्नता याच्या गृहीत कृत्यावर काढलेलें हें अनुमान जरी स्वभावतः तितकें निर्दोष नसलें, तरी वर दिलेल्या इतर कारणांवरून या वेळीं आर्या-

१ ५. ११. ५.

२ स्मिथ. अशोक (तिसरी आवृत्ति), पृ. १३८.

पैकी सुमारें शेंकडा ७५ लोक तरी साक्षर होते, असें म्हणण्यास कांहीच प्रत्यवाय दिसत नाही.

प्राथमिक शिक्षण या वेळीं कोठे व कसें दिलें जात असे, याबद्दल फारच थोडी माहिती मिळते. बनारसच्या एका श्रीमंत मनुष्याचा मुलगा शिकावयास बाहेर जात असे, व त्या वेळीं त्याचा नोकर त्याची लाकडी पाटी घेऊन त्याच्या बरोबर जाई, अशी माहिती एका जातकांत मिळते.[१] हा मुलगा अर्थातच प्राथमिक शिक्षणाकरितां बाहेर जात होता; पण तो खासगी शिकवणाऱ्या गुरूकडे जात होता, का शाळेस जात होता, शाळेस जात असला तर ती शाळा कशी चालवण्यांत येत असे, याबद्दल कांहीच माहिती मिळत नाही. या वेळीं समाजामध्यें साक्षरतेचें प्रमाण फारच होतें. तेव्हा पुष्कळ लोक मुलांना प्राथमिक शिक्षण देण्याचें काम धंदा म्हणून करीत असावेत. मुलांना उपनयनानंतर पुढे जे वेद शिकविणार, त्यांपैकी कांही अध्यापक प्रथम प्राथमिक शिक्षणही देत असावेत. प्राथमिक शिक्षणाच्या सार्वजनिक शाळा या काळी होत्या असें दिसत नाही; सर्व प्राथमिक शिक्षण खासगी रीतीनेच चाले.

या कालखंडामध्यें बौद्ध धर्म एक लहानसाच पंथ होता, व महायान मार्गाचा अद्याप उदय झाला नसल्यामुळें बौद्ध भिक्षूंचें सर्व लक्ष आपल्या वैयक्तिक मोक्षाकडेच लागलेलें असे. त्यामुळे जे थोडे छोटे बौद्ध मठ या वेळीं होते, त्यांमध्यें प्राथमिक अगर उच्च दर्जाचें शिक्षण देण्याची प्रथा अजून पडली नव्हती. अशोकाने स्थापलेल्या मठांमध्यें त्याच्या ह्यातींत प्राथमिक शिक्षण देत असल्याबद्दलचा पुरावा मिळत नाही.

## तृतीय कालखंड

(इ. स. पू. सुमारें २०० ते इ.स. ८०० पर्यंत)

या कालखंडामध्यें प्राथमिक शिक्षणास शिक्षणक्रमामध्यें निश्चित स्थान देण्यांत आलें. विद्यारंभ किंवा अक्षरस्वीकरण यास संस्काराचा मान मिळाला; तो संस्कार वयाच्या पांचव्या सहाव्या वर्षी करीत असत. ललित विस्तर,[२] रघुवंश,[३] व उत्तररामचरित[४] यांवरून बुद्ध, रघु, व लवकुश

---

१ कटाहक जातक, नं. १२५.

२ सर्ग १०.

३ सर्ग ३.

४ अंक २.

यांचें प्राथमिक शिक्षण चौलकर्मानंतर लगेच म्हणजे पांचव्या वर्षाच्या सुमारास सुरू झालें असे दिसून येतें. इत्सिंगच्या वृत्तातावरून या वेळच्या प्राथमिक शिक्षणाची रूपरेषा चांगली समजूत येते.[१] सहाव्या वर्षाच्या सुमारास मुलें लिपि शिकण्यास सुरुवात करीत. मूळाक्षरें, जोडाक्षरें, बाराखडचा वगैरे सर्व उत्तम तऱ्हेने येण्यास सहा महिने लागत. पुढील वर्षांत काय करीत याची माहिती इत्सिंग देत नाही; बहुतेक तें वर्ष पाढे, हिशेब, वगैरे शिकण्यात जात असावें. यांनतर उपनयनापूर्वी पाणिनीची सूत्रें, अमरकोष, समासचक्र, यांसारखी पुस्तकें विद्यार्थ्यांकडून पाठ करून घेत.

प्राकृत भाषा या वेळीं बऱ्याच परिणतावस्थेला पोचल्या होत्या, व या कालखंडाच्या प्रथमार्धांत तर प्राकृताचेंच संस्कृतापेक्षा व्यवहारांत वर्चस्व होतें. या कालचे बहुतेक कोरीव लेख प्राकृतामध्यें लिहिलेले आहेत; सातवाहनासारख्या कांही राजांनी तर आपल्या दरबारांत प्राकृत भाषाच वापरावी असे हुकूम सोडले होते. इ. स. ३०० पर्यंत प्राथमिक शाळांमध्यें प्राकृत भाषा, व्याकरण व वाङमय यांचेंही थोडें बहुत अध्ययन होत असावें असें वाटतें. त्यानंतर संस्कृताचें पुनरुज्जीवन होऊन त्याच्या अध्ययनावर जास्त भर देण्यांत येऊं लागला. उज्जयिनीच्या साहसांकासारख्या कांही राजांनी तर आपल्या अंतःपुरामध्यें देखील संस्कृत भाषाच वापरली पाहिजे अशी आज्ञा केली होती. संस्कृतवर असा भर इ. स. ४०० नंतर देण्यांत येऊं लागल्यामुळे प्राथमिक शिक्षणक्रमामध्यें प्राकृताच्या अध्ययनास फारच थोडा वेळ मिळूं लागला असावा. लेखन, वाचन, व थोडेसें गणित येऊं लागलें म्हणजे प्राकृतच्या अध्ययनाकडे जवळ जवळ दुर्लक्षच करून इ. स. ४०० नंतर मुलें लगेच संस्कृत व्याकरण व कोष यांच्या अध्ययनाकडे वळत.

या वेळीं प्राथमिक शाळांना लिपिशाला म्हणत, व प्राथमिक शिक्षकांना दारकाचार्य म्हणून संबोधीत.[२] शाळेमध्यें लेखन शिकण्याकरितां मुलें लांकडी पाटी नेत असत असें जें जातकें व ललितविस्तर यावरून दिसतें, त्यास चौकोनी लाकडी पाटी हातांत घेऊन त्यावर लिहीत

---

१ प्रकरण ३४.

२ काव्यमीमांसा, पृ. ५०.

असलेला बुद्धाचा एक पुतळा जो गांधारांत सापडला आहे, त्यावरून पुष्टि मिळते.[१] लाकडी पाटयांवर कांही ठिकाणी चुन्याने लिहीत तर काही ठिकाणीं त्यांच्यावर बारीक माती किंवा वाळू पसरून बोटाने अगर बारक्या काठीने अक्षरें काढीत. वरील दोनीही पद्धति अद्याप हिंदुस्थानांत कांही भागांत सुरू आहेत.

ललितविस्तराच्या दहाव्या सर्गांत प्राथमिक शिक्षक कसें शिकवीत याचें चांगलें वर्णन आढळतें. लाकडी फळ्यावर प्रथम दारकाचार्य एक अक्षर लिही, व त्याचें नांव मुलांना सांगे. नांव ऐकल्याबर मुलें तें जोरानें उच्चारीत, व गुरुजीनी लिहिल्याप्रमाणें आपापल्या पाटीवर तें लिहीत. पाढे गुरुजी तोंडाने सांगत, व सर्व मुलें ते एकदम मोठ्याने म्हणत.

प्राथमिक शिक्षण कोण देत असे याचा आता विचार करूं. वेदांगें व वेदांचा कांही भाग जो वृत्तीकरितां शिकवतो तो 'उपाध्याय' अशी मनूने व्याख्या दिली आहे. ज्यांना वैदिक पंडित होण्याची महत्वाकांक्षा नसे, त्यांचें एवढेंच शिक्षण होई, व तें बहुतेक प्राथमिक शिक्षणासारखेंच असे. वृत्तीकरितां प्राथमिक शिक्षण देणारे या वेळी बरेच लोक असत; ते श्रीमतांच्या मुलांना शिकवण्याचें काम पतकरीत.राजतरंगिणीमध्यें (भा.१ पृ. १३४ व १९६) एका प्रधानाच्या मुलांना शिकवणारे अशा तऱ्हेचे दोन प्राथमिक शिक्षक आढळतात; श्रीमंत मनुष्यांच्या मुलांच्या बरोबर कांही गरीब मुलेंही शिकण्यास येत असावीत; अशा तऱ्हेने गरिबांच्या मुलांच्या शिक्षणाची थोडी बहुत तजवीज होई.

स्वतःच्या खर्चाने प्राथमिक शिक्षक ठेवण्याजोगे धनिक लोक गांवांत नसले, तर अनेक लोक मिळून एक शिक्षक नेमीत; गांवांतल्या जोशाच्या, कुळकर्ण्याच्या अगर दुकानदाराच्या घरांतील एखादा तरुण पुष्कळदा शाळा उघडत असे; मुलांचे पालक जें आपखुषीने देत, त्यावर तो संतुष्ट असे. राजतरंगिणीतील प्राथमिक शिक्षकांनी आपलें स्वतःचें प्राथमिक शिक्षण संपल्याबरोबरच अध्यापनास सुरुवात केली होती; काश्मीरमध्यें फार अंदाधुंदी होती, त्यामुळें कदाचित् तेथील प्राथमिक शिक्षक फारसे शिकलेले नसावेत. इतरत्र बहुतेक इतके अल्पशिक्षित प्राथमिक

---

१ अर्केऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, १९०३–४; पान २४६–७;, चित्र ६६.१

शिक्षक नसावेंत असें वाटतें. स्मृतीमध्यें ब्राह्मणांनी ब्राह्मणेतरापासून शिकूं नये, असे निषेध पुष्कळ ठिकाणीं आढळतात. वैदिक शिक्षण येथे अभिप्रेत असणें शक्य नाही हें उघड आहे. बहुतकरून प्राथमिक शिक्षणासंबंधींच हें विधान असावें. यावेळीं प्राथमिक शिक्षकांपैकी कांही तरी ब्राह्मणेतर होते, हें त्यावरून दिसून येईल.

या कालखंडांत बौद्ध मठामध्यें जसें उच्च शिक्षण देत असत, तसें प्राथमिक शिक्षणही तेथे बहुतेक देत असावेत असें दिसतें. अमक्या इयत्तें-नंतर प्राथमिक शिक्षण संपतें, त्यापुढे दुय्यम किंवा उच्च शिक्षण सुरू होतें, व तें निराळ्या शाळेंत घेतलें पाहिजे, अशा प्रकारची हल्लीसारखी परिस्थिति पूर्वी नव्हती. जरी तसा निर्विवाद पुरावा उपलब्ध नाही, तथापि हल्ली जसें ब्रह्मदेशांतील बौद्ध मठांत प्राथमिक शिक्षण दिलें जातें, तसें या वेळीं हिंदुस्थानांतील बौद्ध मठांतही देत असावेत असें वाटतें. गुरूला पाणी आणून देणें, त्यास अन्न वाढणें, त्याचें आसन नेणें, वगैरे कामें मठांमध्यें छोटे विद्यार्थी करीत असें इत्सिंग म्हणतो;[१] हे छोटे विद्यार्थी बहुतेक प्राथमिक शिक्षण घेणारे असावेत. नालंदासारख्या विश्व-विद्यालयाच्या ठिकाणीं प्राथमिक शिक्षण दिलें जात नसे; पण ज्या लहान लहान मठांमधील अल्पशिक्षित भिक्षूंना उच्च शिक्षण देणें अशक्य होतें, ते प्राथमिक व दुय्यम शिक्षणच आपल्या मठांत देत असले पाहिजेत हें उघड आहे.

या वेळीं समाजांत साक्षरता किती प्रमाणावर होती, यासंबंधीं निश्चित विधान करणें कठीण आहे. या वेळींच प्रथम उच्च शिक्षणाच्या सार्वजनिक शाळा निघाल्या होत्या, पण त्यामुळें शिक्षणास अधिक उत्तेजन मिळालें असें म्हणतां येत नाही. कारण पूर्वी विद्वान् लोक खासगी रीतीनें शिकवीत, त्याऐवजी आता कांही थोड्या ठिकाणीं शाळा सुरू झाल्या. या कालखंडाच्या शेवटीं वैश्यांपैकी बहुतेक सर्व व क्षत्रियांपैकी बरेच जण उपनयन करीत नव्हते, हें आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. उपनयनाने साक्षरतेचा साहजिकच प्रसार होई; तें बंद झाल्यामुळें क्षत्रिय व वैश्य यांमध्यें या वेळीं निरक्षरतेचें प्रमाण बरेंच वाढलें असावें हें उघड

१ पृ. १०५-१०६.

आहे. या प्रकरणाच्या शेवटीं केलेल्या विवेचनावरून इ. स. ८०० च्या सुमारास शेकडा सुमारें ४० लोक साक्षर होते असें दिसून येईल.

## चतुर्थ कालखंड

### (सुमारें इ. स. ८०० ते सुमारें इ. स. १२००)

या कालखंडाच्या शेवटच्या सुमारास हल्लीच्या कानडी, मराठी, गुजराती, हिंदी, वगैरे लोकभाषा आकारास येऊं लागल्या होत्या, व त्यांचें अध्ययन प्राथमिक शिक्षणक्रमामाध्यें पूर्वीपेक्षा जास्त होऊं लागलें होतें. कर्नाटकांतील तालगुंड नांवाच्या गांवीं ११५८ मध्यें एक शाळा होती; तिजमध्यें कानडी शिकवण्याची सोय केली होती.[१] नर्सीपूर येथील महाविद्यालयामध्यें कानडी, तेलगु व मराठी या तीन भाषा शिकवण्याकरितां निरनिराळे अध्यापक होते.[२] उच्च शिक्षणक्रमांतही यावरून लोकभाषांचा प्रवेश झाला होता हें दिसून येईल. निरनिराळ्या मातृभाषांचे विद्यार्थी आले तर विद्यालयांच्या चालकांना अध्ययनाची सोय शक्य तितकी करावी लागे असें यावरून दिसून येईल. उच्च शिक्षणामध्येंही लोकभाषांचा प्रवेश झाला होता; तेव्हा प्राथमिक शिक्षणक्रमामध्यें त्यांना पूर्वीपेक्षा अधिक महत्त्व देत असावेत हें निर्विवाद होय. या वेळीं संस्कृत भाषा सामान्य लोकांस दुर्बोध झाली होती; वैश्य व क्षत्रिय वर्णांतील मुलें लहानपणीं अमरकोष, समासचक्र, संस्कृत व्याकरण, यांचा व्यासंग करीत असावींत असें दिसत नाही. लेखन, वाचन, गणित, जमाखर्च, लोकभाषेचें बऱ्या तऱ्हेचें ज्ञान, व संस्कृतची जुजबी माहिती इतक्यांचाच समावेश या वेळीं प्राथमिक शिक्षणामध्यें होत असे.

प्राथमिक शिक्षण कसें व कोण देत असत, याबद्दल फारशी माहिती मिळत नाही. बंगालमध्यें ब्रिटिश अंमलाच्या प्रारंभीं खेडोखेडीं देवळांतील पुजारी प्राथमिक शाळा चालवीत.[३] माळव्यामध्यें याच सुमारास खासगी लोक शाळा उघडीत, व मुलांच्या पालकांकडून खुषीने मिळणाऱ्या फीवर

१ ए. क., भाग. ७, शिकारपुर, नं. १८५.

२ ए. क., भाग ३, नर्सीपुर नं. २७.

३ रिपोर्ट ऑफ बेंगाल प्रॉव्हिन्सियल कमिटी, एज्युकेशन कामिशन १८८२, भाग १.

आपला निर्वाह करीत.[१] हे दोनही प्रकार इ. स. १०००–१२०० इतके जुने असावेत असें वाटतें. कांही गांवांमध्यें श्रीमंत सावकारांनी आपल्या मुलांच्या शिक्षणाकरितां नेमलेल्या शिक्षकांपाशीं इतर मुलेंही शिकत. प्राथमिक शिक्षक हा प्राय: जोशी किंवा कुळकर्णी वृत्तीच्या घराण्यांतील इसम असे. कांही ठिकाणीं वाण्यांपैकीही एखादा इसम तें काम करीत असे. शिक्षक ब्राह्मण असला म्हणजे तो पौरोहित्य व ज्योतिष हे धंदे जोडधंदे म्हणून करी. कर्नाटकातील १६५५ सालच्या एका कोरीव लेखांत ग्रामज्योतिषी व ग्रामशिक्षक यांचें काम करणाऱ्या एका ब्राह्मणास दान दिलेलें आढळतें.[२] या ब्राह्मणास श्राद्ध, संस्कार, वगैरे चालवून दक्षिणा घेण्याचाही अधिकार होता. मलबारमध्यें 'पनिक्कर' हा शब्द ज्योतिषी व शिक्षक या दोहोंचाही वाचक आहे.

प्राथमिक शिक्षणाचा प्रसार या वेळी बराच कमी होत चालला होता. खेडेगांवांतील बलुतेदारांमध्यें बहुतेक सर्व प्रांतांत प्राथमिक शिक्षक नाही ही गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.[३] या वेळचा शेतकरी सामान्यत: निरक्षर होता;[४] सुतार, लोहार, कुंभार, वगैरेंची त्यास जशी गरज होती तशी प्राथमिक शिक्षकाची नव्हती. प्राथमिक शिक्षक पोसण्याकरितां त्याच्या उत्पन्नांतील हिस्सा सक्तीने घेणें अन्यायाचें झालें असतें, म्हणून बलुतेदारांमध्यें प्राथमिक शिक्षकाचा अंतर्भाव करण्यांत आला नाही. यावरून समाजांत साक्षरता बरीच संकोच पावली होती हें दिसून येईल. तिचें प्रमाण काय होतें, याबद्दल या कालांतील पुरावा मिळत नाही, पण ब्रिटिश अंमल सुरू होण्याच्या वेळीं जी परिस्थिति होती, तिजवरून

---

१ माल्कम्, मेमॉयर्स ऑफ सेंट्रल इंडिया अँड माळवा, भाग २ पान १५८.

२ ए. क., भाग ६, तारिकेरे नं. २१.

३ एज्युकेशन कमिशन, १८८२, पुढील मद्रासमधील कांहीं साक्षीदारांनी प्राथमिक शिक्षक हा बलुतेदार असतो अशी साक्ष दिली, पण इतरांनी या गोष्टीचा इन्कार केला आहे (पुरावा, पानें २०, १५४, १७३ पहा.) मद्रासमधील कांहीं भागांत तो कदाचित् बलुतेदार असेल; इतरत्र तो नव्हता हें निर्विवाद आहे.

४ सांख्यतत्वकौमुदीवरील वाचस्पत्य मिश्राच्या टीकेंतील पुढील उपमा हेंच दर्शविते. 'तत्र व्यक्तं स्वरूपतः पांसुलपादिको हालिकोपि प्रत्यक्षतः प्रतिपद्यते।' भा. २ पृ. १५८ (गंगानाथ झांची आवृत्ति).

थोडें अनुमान काढतां येतें. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं मद्रासमध्यें बहुतेक प्रत्येक खेड्यांत एक शाळा होती.[१] बंगालमध्येंही लेखन वाचन व बालगणित शिकवणाऱ्या शाळा बहुतेक सर्व मोठ्या खेड्यांत होत्या.[२] ज्या माळव्यामध्यें बरीच दशकें बेबंदशाही व बजबजपुरी माजली होती त्यामध्यें देखील ब्रिटिश अंमलाच्या सुरवातीस १०० घरांच्या बहुतेक सर्व गांवांत प्राथमिक शाळा होत्या.[३] प्राथमिक शिक्षकांनाही समाजांत मान मिळत असे.[४]

जरी प्राथमिक शाळा पुष्कळ खेडेगांवांत असत, तरी त्यांमध्यें सर्व जातीची व वर्गांची मुले शिक्षण घेण्यास जात नसत. ब्राह्मण कायस्थ व वैश्य हे वर्गच प्राय: या शाळांचा फायदा घेत. त्यामुळे शाळा सर्वत्र होत्या म्हणून साक्षरता मोठ्या प्रमाणावर होती, असें अनुमान काढणें चुकीचें होईल. मद्रास इलाख्यामध्यें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी शेंकडा १५ मुलें शाळेला जात असत.[५] बंगालमध्यें व मुंबई इलाख्यांतही जवळ जवळ तशीच स्थिति होती.

लढाया व बेबंदशाही सुरू असतानाही शेकडा १५ मुलें जर १९ व्या शतकाच्या प्रारंभी प्राथमिक शिक्षण घेत, तर तेराव्या शतकाच्या प्रारंभीं प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या मुलांचें प्रमाण बरेंच अधिक असलें पाहिजे. मध्यंतरीच्या सहाशे वर्षांच्या काळात हिंदुस्थानांत मुसलमानी सत्ता जोरांत होती मुसलमानांनी मशिदीना शाळा जोडून मुसलमानी मुलांच्या शिक्षणाची सोय कांही अशी केली होती, पण बहुसंख्य हिंदू प्रजेच्या शिक्षणाकडे त्यांनी दुर्लक्ष केलें होते. सरकारी दक्षिणा व इतर प्रकारची मदत यांनी हिंदु राजवटींत शिक्षणास किती मोठी मदत होत असे, हें पुढे नवव्या प्रकरणांत दाखविण्यांत येईल हिंदु राजसत्ता जशी अस्तास

---

१ मिल्, हिस्टरी ऑफ् ब्रिटिश इंडिया, भा. १ पृ. ५२६ (चवथी आवृत्ति).

२ वॉर्ड व्ह्यू ऑफ् दी हिंदूज्, भा. १ पृ. १६०.

३ माल्कम्, मेमॉयर्स, पृ. १५८.

४ कोर्ट ऑफ् डायरेक्टर्सचा ३-६-१८१४ चा खलिता.

५ के, एन्शंट् इन्डियन् एजुकेशन्, पृ. १४२.

गेली तशी हिंदु शिक्षणसंस्थांस सरकारी मदत मिळेनाशी झाली व त्यांची स्थिति फार निकृष्ट होऊं लागली. यामुळें शिक्षणाचें क्षेत्र फार आकुंचित होऊं लागलें. हिंदूंना राज्यकारभारांत नोकऱ्याही फार थोड्या मिळूं लागल्या, त्यामुळेंही शिक्षण घेण्यासंबंधीं लोकांचा हुरूप फार कमी झाला. अशी सहा सातशें वर्षें परिस्थिति असतांना व शेवटीं शेंपन्नास वर्षें बजबजपुरी माजली असतांना देखील एकुणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं सुमारें शेकडा १५ मुलें शाळेस जर जात होतीं, तर तेराव्या शतकाच्या प्रारंभीं निदान शेकडा ३० मुलें तरी शाळेला जात असावींत यांत संशय नाही. गुप्त कालापर्यंत कांही क्षत्रिय वैश्यांचीं उपनयनें होत, त्यावेळीं साक्षरतेचें प्रमाण शेकडा ५० पर्यंत असावें. आठव्या शतकांत तें शेकडा ४० पर्यंत उतरलें असावें. इ. स. पू. चवथ्या शतकांत जेव्हा त्रैवर्णिकांचीं उपनयनें सर्रास होत, तेव्हा शेकडा ७५ लोक तरी साक्षर असावेत असें दिसतें.

---

# प्रकरण सातवें

# स्त्रीशिक्षण

जसजसें मागे प्राचीन काळांत जावें, तसतशी सामान्यत: स्त्रियांची स्थिति अधिक असमाधानकारक दिसून येते. हा नियम बहुतेक सर्व देशांना लागू पडतो; हिंदुस्थान मात्र त्याला एक अपवाद आहे. जसजसें प्राचीन काळांत जावें, तसतशी हिंदुस्थानांत स्त्रियांची एकंदरींत स्थिति अधिक समाधानकारक असलेली आढळते. शिक्षणाचे बाबतींत तर हें विधान सत्य असल्याचें निर्विवाद सिद्ध करतां येतें.

## वेद-ब्राह्मण काल

(सुमारें इ. स. पू. ८०० पर्यंत)

स्त्रिया शूद्रसमान आहेत, व म्हणून त्यांना उपनयन व वेदाध्ययन यांचा अधिकार नाही, हें स्मृतिकालीन मत या वेळीं समाजास माहीतही नव्हतें. 'अर्धो ह वा एष आत्मनो यज्जाया' [१] हें शतपथ ब्राह्मणांतील वचन

---

१ ५. २. १. १०

स्त्रियाचा दर्जा कसा पुरुषाबरोबर असे, हें दाखवितें. धार्मिक अपात्रतेचा शिक्का त्यांच्यावर या काळीं मारला गेला नव्हता इतकेंच नव्हे, तर पुरुष जर लग्न करण्याचें नाकारतील तर धार्मिक अपात्रतेचा शिक्का त्यांच्यावर स्त्रियांना अप्रत्यक्षपणें मारतां येत असे.[१] पत्नी शब्दाची व्युत्पत्ति तिच्या यज्ञकर्तव्याशी निगडित आहे;[२] यावरूनही पत्नीस यज्ञामध्यें महत्त्वाचें काम करावयाचें असे, हें दिसून येईल. यज्ञाचे वेळीं तिचें व्रतोपनयन होत असे, व नवऱ्याबरोबर तिलाही दीक्षा मिळे.[३] यजमान व त्याची पत्नी हे दोघेही कसे बरोबरीने यज्ञांत भाग घेत असत, याचें वर्णन ऋग्वेदांत आढळतें.[४]

पण वेदमंत्रांची व त्यांच्या अर्थाची चांगली माहिती असल्याशिवाय वैदिक यज्ञामध्यें भाग घेणें शक्य नसे. त्याकरितां उपनयनाची जरूरी असे, व या वेळीं सामान्यत: सर्व स्त्रिया तें करीतही असत. 'ब्रह्मचर्येण कन्या युवानं विंदते पतिम्' या अथर्व वेदमंत्रावरून[५] कांही स्त्रिया तरी उपनयनानंतर बराच काल अध्ययनामध्यें घालवीत, असें दिसून येतें. सामान्य मुली किती वेदाध्ययन करीत, याची आपणास विश्वसनीय माहिती नाही, पण कांही स्त्रिया पुरुषाइतकें विद्याप्रावीण्य मिळवीत, हें घोषा, लोपामुद्रा, यांसारख्या स्त्रियांचा मंत्रद्रष्टयांत अंतर्भाव झाला आहे यावरून दिसून येतें. याखेरीज देखील आणखी कित्येक विदुषी समाजांत असाव्यात; त्यांच्या कवनांचा अंतर्भाव संहितेंत न झाल्यामुळे त्यांची स्मृति नष्ट झाली असावी. वाङ्मयात्मक शिक्षणाबरोबर संपन्न कुलांत तरी स्त्रियांना गायनवादनादि ललित कला शिकवीत असत.

या कालखंडाच्या शेवटीं शेवटीं स्त्रियांचें वैदिक अध्ययन मागें पडूं लागलें, व यज्ञामध्यें त्या औपचारिक रीतीचाच भाग घेऊं लागल्या.

---

१ अयज्ञियो वा एष योऽपत्नीकः ।—शत. ब्रा. ५. १. ६. १०.

२ 'पत्युर्नो यज्ञसंयोगे'—पाणिनि, ४. १. ३३.

३ तै. ब्रा. ३. ३. ३; शत. ब्रा. १. ३. १. १२.

४ या दंपती सुमनसा सुनुत आ च धावतः । देवासो नित्ययाशिरा ॥— ८. ३१. ५; शिवाय १०. ८५. १० ही पहा.

५ ११. ५. १८.

एका यज्ञामध्यें 'हविष्कृत्'ला होत्याने हाक मारल्याबरोबर यजमान-पत्नीनेच ओ देऊन उठून यज्ञांतील त्या वेळचें काम करावयाचें असे; शतपथ ब्राह्मणकालीं पत्नीऐवजी दुसऱ्या कोणीही तें काम करण्याची प्रथा सुरू झाली होती.[१] या एका उदाहरणावरून पत्नीचे धार्मिक अधिकार व हक्क यांवर हळू हळू कशी गदा येऊं लागली होती तें दिसून येईल.

## द्वितीय कालखंड

(सुमारें इ. स. पू. ८०० ते सुमारें इ. स. पू. २००)

रोज जरूर असणाऱ्या वैदिक मंत्रांचें ज्ञान, व प्रत्यही विहित असलेले धार्मिक विधी करण्याची पात्रता या कालामध्यें स्त्रियांमध्यें होती, अशाबद्दल बराच पुरावा सापडतो. गृह्याग्नीतील रात्रीचा होम पत्नीनेच करावयाचा असे; दिवसाचा होम देखील तिनेच करावा असें कांहींचें मत होतें.[२] सुगीच्या वेळीं करावयाचा 'सीता यज्ञ' तर बायकांनींच करावा अशी रूढी होती. स्रस्तरारोहण संस्काराच्या वेळीं पत्नीने स्वतः आपल्या उपनीत मुलांसमवेत पुष्कळ मंत्र म्हणावयाचे असत.[३] वनवासास जावयाच्या वेळी राम जेव्हा कौसल्येचा निरोप घेण्यास गेला, तेव्हा ती स्वतः एकटीच होम करण्यांत गुंतलेली होती.[४] वालीची पत्नी तारा हीही मंत्रवेत्ती होती.[५] पुष्कळ शोध करूनही जेव्हा मारुतीला सीता लंकेंत सापडेना, तेव्हा तो एका नदीचे तीरावर गेला, कारण संध्येच्या वेळीं तरी सीता तेथे येईल अशी त्याची खात्री होती.[६]

वरील पुराव्यावरून या वेळीं मुलीचें उपनयन होत असे, हें कबूल करावें लागेल. उपनयनानंतर वयांत येईपर्यंत कांही मुली थोडेंसें वेदा-

---

१ शतपथ ब्रा., ३.२.४. ६

२ कामं गृह्येऽग्नौ पत्नीर्जुहुयात्प्रातर्होमौ । गो. गृ. सू., १.३

३ पा. गृ. सू., ३. २.

४ सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा । अग्निं जुहोति स्म तदा मन्त्रवित्कृत-मंगला ॥ रामायण २.२०.१५.

५ ततः स्वस्त्ययनं कृत्वा मंत्रविद्विजयैषिणी । ४. १६. १२.

६ संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी । नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी । सुंदर कांड, १५.४८.

ध्ययन करीत, व लगेच विवाह करीत. अशा मुलींना 'सद्योद्वाहा' म्हणत. कांही मुली याप्रमाणें लवकर विवाह न करितां वेदवेदांतादिकांचें पुष्कळ अध्ययन करीत. त्यांना 'ब्रह्मवादिनी' म्हणत.[१] अशा तऱ्हेनें चिरकाल शिकत राहणाऱ्या मुलींकडे समाज वाकडया दृष्टीने पहात नसे, इतकेंच नव्हे तर कांही आईबाप आपणास अशा 'ब्रह्मवादिनी' मुली व्हाव्यात याबद्दल नवसही करीत.[२]

ब्रह्मवादिनींचें शिक्षण कितपत होत असे हें आपण आता पाहूं. कांही वेदांचें अध्ययन करीत, तर कांही वेदांत-तत्त्वज्ञानाचा व्यासंग करीत. याज्ञवल्क्याची पत्नी मैत्रेयी हिची वेदान्ताकडे अभिरुची होती; उंची वस्त्रें व मौल्यवान् दागिने यांचा तिला शोक नव्हता;[३] आत्म्याचें स्वरूप काय, याबद्दल चर्चा करीत राहणें तिला आवडे. जनक राजाच्या दरबारांत जो तत्वज्ञानाचा शास्त्रार्थ झाला, त्यामध्यें याज्ञवल्क्य ऋषींना सर्वांत कठीण प्रश्न गार्गी वाचक्नवी नांवाच्या विदुषीनेंच विचारले होते.[४] तिने याज्ञवल्क्याची जी कसून उलट तपासणी केलेली आहे, त्यावरून तिची विद्वत्ता व वादविवादशक्ति असामान्य प्रतीची होती, हें कबूल करावें लागेल. उत्तररामचरितांतील आत्रेयी देखील वेदान्ताचा अभ्यास करणारी स्त्री होती. वेद व वेदांत एवढ्याच विषयांचा स्त्रिया अभ्यास करीत नसत; कांही जणी तर पूर्वमीमांसेसारखा रुक्ष विषय देखील हौसेनें अभ्यासास घेत, असें पातंजल भाष्यावरून दिसून येतें. 'काशकृत्स्नन्' नांवाच्या पंडितानें पूर्वमीमांसेवर एक ग्रंथ लिहिला होता, त्याचें 'काशकृत्स्नी' असें नांव होतें. ज्या स्त्रिया त्याचें अध्ययन करीत, त्यांना 'काशकृत्स्ना' असें म्हणत.[५]

---

१ द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्योद्वाहाश्च । तत्र ब्रह्मवादिनीनां अग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भैक्षचर्या । वी. मि. सं. पान ४०२ वर हारीत.

२ अथ य इच्छेद्दुहिता मे पंडिता जायेत... तिलौदनं पाचयित्वा दंपती सर्पिष्मन्तमश्नीयाताम् । बृ. उप., ६. ४. १७.

३ बृ उप, २. ४; ४.५

४ अनतिप्रश्न्यां वै देवतामतिपृच्छासि । बृ. उप, ३. ६. १. या कारणाकरितां याज्ञवल्क्याने गार्गीदेवीच्या प्रश्नांचें उत्तर सर्वांसमोर देण्याचें नाकारलें होतें.

५ एवमपि काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी । काशकृत्स्नीमधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी । ४. १. ४ वरील पातंजल भाष्य.

निरनिराळ्या शास्त्रांचें अध्ययन करणाऱ्या स्त्रियांना ज्या अर्थी अशा निरनिराळ्या स्वतंत्र अभिधानाने संबोधीत, त्या अर्थी त्यांची संख्या बरीच असली पाहिजे, असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाही.

बुद्धाने थोडयाबहुत नाखुषीने स्त्रियांना भिक्षुणी होण्यास अखेर परवानगी दिली होती. त्यामुळें क्षत्रिय व वैश्य कुलांतील बऱ्याच स्त्रिया आपलें आयुष्य ब्रह्मवादिनीप्रमाणें विवाह न करितां तत्वज्ञानाच्या व्यासंगांत घालवूं लागल्या. थेरीगाथा ग्रंथांत ज्या अशा स्त्रियांचीं चरित्रें व कवनें आहेत, त्यांपैकी ३२ कुमारिका व १८ विवाहित स्त्रिया आहेत. कुमारिकांमधील शुका, अनोपमा व सुमेधा या संपन्न घराण्यांतील होत्या. तत्वज्ञानजिज्ञासेमुळें जर इतक्या मुली आजन्म कौमार्य पतकरीत, तर सामान्य शिक्षणाकरितां विवाहकाल पुढें ढकलणाऱ्या मुलींची संख्या बरीच असावी, असें मानण्यास हरकत दिसत नाही.

समाजांत सुशिक्षित स्त्रिया बऱ्याच होत्या, व त्यांपैकीं कांही आजन्म ब्रह्मचर्य पाळीत. अशा परिस्थितीमध्यें स्वाभाविकपणेंच अध्यापकाचा धंदा करणाऱ्या कांही स्त्रिया असाव्यात, हें अपरिहार्य होतें. 'उपाध्यायानी' हा शब्द उपाध्यायपत्नीस लावावा व 'उपाध्याया' हा शब्द जी विदुषी स्वत: शिकविते, तिला लावावा, असा जो या दोन शब्दांमधील फरक पातंजल भाष्यांत विशद करून सांगितला आहे,[१] त्यावरून अध्यापनाचें कार्य करणाऱ्या स्त्रिया समाजामध्यें अगदीच थोडया नव्हत्या, हें दिसून येईल. सुलभा, वडवा, प्रातीथेयी, मैत्रेयी, गार्गी वाचक्नवी या प्रख्यात विदुषी असल्या पाहिजेत यांत शंका नाही. तसें नसतें तर त्यांचा उल्लेख ब्रह्मयज्ञांत खास आला नसता.[२]

उच्च शिक्षण घेणाऱ्या ब्रह्मवादिनींची संख्या समाजांत किती असे, हें सांगणें बरेंच कठीण आहे. स्त्रियांकरितां निराळ्या शाळा नव्हत्या. मुलांना उच्च शिक्षणाकरितां स्वगृह सोडून दुसरीकडे गुरुगृहीं जाण्याची परवानगी असे; मुलींनी घरींच पिता, भ्राता, किंवा चुलता यांचेपासून

---

१ उपेत्याधीयते अस्याः सा उपाध्यायी । ३. ३. २२ वरील भाष्य.

२ अश्व, गृ. सू. ३. ४.४.; शां. गृ. सू. ४. १०. ३.

शिकावें अशी पद्धति होती.[१] यामुळें ज्यांचे घरीं वडील पुरुष मंडळी उच्च शिक्षण देण्याइतकी सुसंस्कृत नसत, त्या मुलीचें उच्च शिक्षण अशक्यप्राय होई, व त्यांना प्राथमिक शिक्षणावरच संतुष्ट राहावें लागे. उपनयनानंतर विशेष कांही शिक्षण न होतांच त्यांचा विवाह होत असला पाहिजे. संपन्न व सुसंस्कृत घराण्यांमधील मुलींनाच उच्च शिक्षण मिळणें शक्य होई; त्यामुळें समाजामध्यें विदुषींची संख्या फार मोठी नसावी असें दिसतें.

'सद्योद्वाहा' मुलींचें नांवालाच उपनयन होत असे; पण तेंही इ. स. पू. २५०च्या सुमारास बंद झालें. मुलींचें उपनयनच करूं नये, व स्त्रियांना वेदाधिकार व यज्ञाधिकार असूं नयेत असें मत ऐतिशयनादिक सुधारक आचार्य मंडळी समाजापुढे मांडूं लागली. बादरायण, जैमिनि, वगैरे सनातनी आचार्यांचें मत स्त्रियांचें उपनयन करावें, त्यांना वेदादिक शिकवावे, त्यांच्या यज्ञादिकाच्या हक्कावर गदा आणूं नये, असें होतें.[२] पण नेहमीप्रमाणें सुधारकांचा जय व सनातन्यांचा पराजय झाला, व स्त्रियांचें अध्ययन संपुष्टांत आलें, व त्या वेदवेदांताच्या ज्ञानास मुकल्या. 'ब्राह्मण आपलें तत्त्वज्ञान स्त्रियांस शिकवीत नाहीत,' असें मेगॅस्थनीस म्हणतो;[३] त्यावरून इ. स. पू. २५०च्या सुमारास स्त्रियांचा उपनयनाचा व वेदाध्ययनाचा हक्क बुडाला होता, असें दिसून येईल.

स्त्रियांची योग्यता शूद्राइतकीच, म्हणून त्यांना वेदाधिकार नाही, हें नवीन मत कां समाजांत लोकप्रिय झालें, याची येथे सविस्तर चर्चा करणें जरूर नाही. शक, पार्थियन्, कुशाण, वगैरे रानटी राजकर्त्यांच्या चालीरीतींमुळें समाजाचा दृष्टिकोन बदलला, असें कांही जण म्हणतात; पण हीं रानटी राजकुळें इ. स. पू. १००च्या सुमारास उदयास आलीं,

---

१ पुराकल्पे तु नारीणां मौञ्जीबंधनमिष्यते। अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा॥ पिता पितृव्यो भ्राता वा नैनामध्यापयेत्परः। स्वगृहे चैव कन्याया भैक्षचर्या विधीयते॥ –यम. उत्तररामचरितामध्यें आत्रेयी वाल्मीकि व अगस्ति यांच्या आश्रमास वेदांत शिकण्याकरितां जात असलेली दिसते; पण आत्रेयी ही ब्रह्मजिज्ञासू वयस्क स्त्री होती, लहान वयाची सामान्य कुमारिका नव्हती.

२ पूर्वमीमांसा ६.१. ६–१६ व त्यावरील भाष्य पहा.

३ फ्रॅगमेंट, ४१.

व त्यांचें अधिकारक्षेत्र पंजाबच्या बाहेर फारसें दीर्घकालपर्यंत नव्हतें. स्त्रिया या शूद्रासम आहेत, हें मत पतंजलीच्या पूर्वीच म्हणजे इ. स. पू. तिसऱ्या शतकापूर्वीच समाजांत रूढ होऊं लागलें होतें.

स्त्रियांच्या अवनतीचें खरें कारण आर्येतर स्त्रियांशीं विवाह करण्याची पद्धत होय असें प्रस्तुत लेखकास वाटतें. वेदकालीं त्रैवर्णिकांमध्यें परस्पर विवाह होत; पण आर्यांचे दासांशीं, शूद्रांशीं किंवा अनार्यांशीं विवाह झालेल्याचे दाखले फारसे सापडत नाहीत. पंजाबमधील अनार्यांचा आर्यांनी पुरा निःपात केला होता, त्यामुळें तेथे आर्य व अनार्य संस्कृति एकमेकाशेजारीं नांदल्याच नाहीत. गंगा यमुनांच्या खोऱ्यांत अनार्य जास्त प्रबळ होते; त्यामुळें तेथे त्यांचा निःपात करणें शक्य नव्हतें. तेथे आर्य व अनार्य या दोन्ही संस्कृती एकत्र नांदूं लागल्या, व अनार्य लोकांच्या स्त्रियांशीं विवाह करण्याची प्रथा समाजांत पडूं लागली. भीम-अर्जुनादिकांचीं हिडिंबा, उडुपी इत्यादिकांशीं झालेलीं लग्नें याच प्रकारचीं होत. प्रथम प्रथम या चालीस कोणी फारसा विरोध केला नाही; पण तिचे दुष्परिणाम जसे दिसूं लागले, तसें आर्यांनी आपापसांत वाटल्यास अनुलोम लग्नें करावींत, पण अनार्य किंवा शूद्र स्त्रियांशीं विवाह कधीच करूं नयेत, असें धर्मशास्त्रकार प्रतिपादूं लागले. कांही लोक हा निषेध मानीत, तर कांही लोक तो धाब्यावर बसवीत.

अनार्य बायका आर्य गृहांत आल्याने आर्य स्त्रियांचा दर्जाही कमी होऊं लागला. अनार्य स्त्रियांना संस्कृत येत नसे,—आलें तर फारच थोडें येई—त्यामुळें त्यांना वेदाधिकार किंवा यज्ञाधिकार देणें शक्य नव्हतें. पुष्कळदा अनार्य स्त्रियाच आपल्या पतींच्या लाडक्या असत; त्यामुळे आर्य स्त्रियांना बाजूस सारून अनार्य स्त्रियांस त्यांचे पती धर्मकार्यांतही सहभागी करीत असावेत. यामुळें बराच बखेडा व अनाचार वाढूं लागला. हा अनाचार टाळावा, म्हणून ऐतिशायन कंपूने स्त्रियांचा वेदाधिकार काढून घेण्याचें योजिलें. जैमिनि, बादरायण, वगैरेंनी त्या कंपूस कसून विरोध केला; पण त्यांना यश आलें नाही. स्त्रियांचे विवाह या वेळीं १३-१४ व्या वर्षीच होत होते, त्यामुळें उपनयनानंतर फारसें वेदाध्ययन न होतांच लवकरच लग्नें होत. उपनयन हा त्यामुळें एक निरर्थक संस्कार बनत चालला होता.

तो ठेवून तरी काय उपयोग, असें समाजास वाटूं लागलें, व त्यामुळें स्त्रियांचें उपनयन करूं नये, त्यांना वेद शिकवूं नयेत, वगैरे मतें समाजांत दिवसेंदिवस जास्त लोकप्रिय होऊं लागलीं. यामुळें स्त्रीशिक्षणावर किती दूरवर व अनिष्ट परिणाम झाला हें लवकरच दिसून येईल.

## तृतीय कालखंड

## ( स्मृति-पुराण काल )

### (इ. स. पू. सुमारें २०० ते इ. स. १२०० पर्यंत)

या कालखंडामध्यें पहिलीं तीन चार शतकें मुलीचें उपनयन एक संस्कार म्हणून चालू होतें; पण त्यानंतर वेदाध्ययन वगैरे कांही होत नसे. मनु तर स्त्रियांचें उपनयन करावे, पण तें वेदमंत्र न म्हणता करावें, असें म्हणतो.[१] वेदविहीन उपनयन म्हणजे वदतो व्याघातच होय. या वेळीं उपनयन म्हणजे एक शारीरिक संस्कार असें मानीत; त्यामुळें स्त्रियांना वेदाधिकार नसला[२] तरी त्यांचें उपनयन करण्यास हरकत नाही असें मनूचें मत झाले असावें. वेदाध्ययन होत नसल्यामुळें स्त्रियांचें उपनयन म्हणजे एक फार्सच बनलें होते, तेव्हा तें बद केलेलेंच बरें असें तिसऱ्या चवथ्या शतकातील समाजधुरीणांस वाटूं लागलें. त्यामुळें याज्ञवल्क्य स्मृतीत स्त्रियांचे वेदमंत्रहीन उपनयन देखील करूं नये असें मत डोकावूं लागलें.[३] या कालखडांतील यमासारख्या कांही स्मृतिकारांना पूर्वी स्त्रियांचें उपनयन होत असे हें माहीत होतें[४], पण ती चाल हल्लीच्या कालास सोइस्कर किंवा अनुरूप नाही असे त्यानी आपलें मत नमूद करून ठेविले आहे. मनुस्मृति २.६६ या श्लोकाचा मनुस्मृति ५.१५५ च्या संदर्भाने अर्थ लावला तर स्त्रियाचें वेदमंत्रविहीन उपनयन करावें हा मनूचा देखील खरा अभिप्राय कसा नव्हता हें सिद्ध करण्याचा आठव्या

---

१ मनु. २ ६६.

२ नास्ति स्त्रीणां क्रिया मंत्रैरिति धर्मे व्यवस्थितिः। निरिंद्रिया ह्यमंत्राश्च स्त्रियोऽनृतमिति स्थितिः॥ ९.१८. मनुस्मृति ४.२०५ही पहा.

३ १.१३.

४ पृ. १२७ वरील टीप १ पहा.

शतकांतील मेधातिथीनें बराच अट्टाहासाचा प्रयत्न केला आहे.[१] विज्ञानेश्वर[२] व कुल्लूक[३] यांचींही मतें स्त्रियांना वेदाधिकार बिलकुल नाही, अशींच आहेत. निरर्थक संस्कार म्हणून देखील स्त्रियांचें उपनयन इ. स. च्या पांचव्या शतकाच्या पुढे चालू नव्हतें हें यावरून उघड आहे.

सक्तीचें उपनयन बंद पडल्यामुळें प्राथमिक शिक्षणावरही परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. गरीब घराण्यांमधील मुलींच्या प्राथमिक शिक्षणाचीही हेळसांड होऊं लागली; ज्या वेळीं उपनयन सक्तीचें होतें, त्या वेळी थोडे तरी वेदमंत्र योग्य तऱ्हेनें म्हणतां यावेत म्हणून मुलींना लेखन, वाचन, व्याकरण, इत्यादिकांचें शिक्षण देणें जरूर होतें. आतां उपनयनच बंद पडल्यामुळे प्राथमिक शिक्षणाकडेही दुर्लक्ष होऊं लागलें; संस्कारामध्यें म्हणावयाचे मंत्रही कांही मुलींना नीट म्हणतां येईनासे झाले. अशा स्थितींत उपाध्यायाने तिच्याऐवजी मंत्र म्हटले तरी चालेल असें मत प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें.[४]

स्त्रियांचा उपनयनाचा अधिकार ज्या वेळीं काढून घेण्यांत आला त्या वेळीं जर त्यांची विवाहकालमर्यादा अलीकडे ओढण्यांत आली नसती तर स्त्रियांच्या वेदव्यतिरिक्त विषयांच्या शिक्षणावर फारसा परिणाम झाला नसता. दुर्दैवाने याच सुमारास स्त्रियांचें विवाहवय भराभर उतरूं लागलें. धर्मसूत्रकारांचें एकंदरींत मत मुलीचें लग्न ऋतुप्राप्तीनंतर दोन तीन वर्षांच्या आंत करावें असें आहे.[५] इ.स.पू. ४००–२०० च्या सुमारास हें मत प्रचलित होतें. सामान्यतः बारा वर्षांच्या मुलीचें लग्न करावें, असें म्हणणारा मनु योग्य वर मिळाला नाही, तर मुलीस मरेपर्यंत देखील अविवाहित ठेवण्यास परवानगी देण्यास मागे पुढे पहात नाही.[६] पण मनूनंतरचे स्मृति-

---

१ मनु २.६७ वर मेधातिथि.

२ याज्ञवल्क्य १.१५ वरील टीका.

३ मनु २.६६ वरील टीका.

४ गो. गृ. सू., २.१.२१; जै गृ. सू. १.२०.

५ कुमारी ऋतुमती त्रीणि वर्षाण्युपासीत। व. ध. सू., १७.५९.

६ काममामरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यपि। न चैवेनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित्॥ ९.८९.

कार मुलींचे विवाह रजोदर्शनापूर्वी केले नाहीत, तर पालकांना भ्रूणहत्ये-सारखें घोर पातक लागतें असें प्रतिपादूं लागले.[१] यामुळें चवथ्या पांचव्या शतकापासून साहजिकच मुलींचीं लग्नें लवकर म्हणजे ११-१२ व्या वर्षीं होऊं लागलीं. अश्वलायन, संवर्त, काश्यप यांसारखे स्मृतिकार[२] तर ७ व्या ८ व्या वर्षीं केलेले मुलींचे विवाहच सर्वांत प्रशस्त मानूं लागले. इतक्या लवकर जेव्हा विवाह होऊं लागले, तेव्हा साहजिकच प्राथमिक शिक्षणही संपुष्टांत येऊं लागलें.

कुलीन, संपन्न व सुसंस्कृत घराण्यांमध्यें मात्र, मुलींचें वेदाध्ययन बंद पडल्यावरही त्यांच्या वाङमयात्मक शिक्षणाकडे थोडेंबहुत लक्ष देत. इसवी सनानंतरच्या दोन चार शतकांत विवाहकाल १२-१३ वर्षांपर्यंत होता, व तोंपर्यंत मुलींना लेखन वाचन वगैरे शिकवून वाङमयाचीही ओळख करून देत. या वेळीं स्त्रियांपैकीं कांही जणी प्राकृतांचा विशेष व्यासंग करीत, व त्या भाषांमध्यें कविताही करीत हें गाथासप्तशतीवरून दिसून येतें; कारण रेवा,[३] रोहा,[४] माधवी,[५] अनुलक्ष्मी[६] पाहई,[७] वद्धवही,[८] व शशिप्रथा[९] इतक्या कवयित्रींच्या कविता वरील ग्रंथांत हालाने उद्धृत केल्या आहेत. चवथ्या शतकानंतर जेव्हा संस्कृतचा विशेष अभ्यास होऊं लागला, तेव्हा कांही स्त्रियाही संस्कृतमध्यें ग्रंथनिर्मिती करूं लागल्या. अर्थानुरूप भाषाशैलीबद्दल शीलभट्टारिका नांवाच्या कवयित्रीची ख्याति होती.[१०] शृंगाररसप्रधान मनोहर कविता करण्याबद्दल गुजरातमधील

१ याज्ञवल्क्य, १. ६४; संवर्त, १. ६७; यम, १. २२.
२ वी. मि. सं., पृ. ७६७ वर उद्धृत.
३ गाथासप्तशती १. ८७ व ९०.
४ गा. स. २. ६३.
५ ,, १. ९१.
६ ,, ३. २८, ६३, ७४, ७६.
७ ,, १. ७०.
८ ,, १. ८६.
९ ,, ४. ४.
१० शब्दार्थयोः समो गुंफः पांचाली रीतिरुच्यते । शीलभट्टारिकावाचि... ॥
—सूक्तिमुक्तावल्युद्धृत राजशेखर.

देवी नांवाची कवयित्री प्रसिद्ध होती; मृत्यूनंतरही तिची लोकप्रियता कमी झाली नाही.[१] वऱ्हाडमध्यें विजयांकेची कीर्ति जवळ जवळ कालिदासाइतकी होती.[२] तिचें काव्य खरोखर उच्च प्रकारचें असलें पाहिजे, कारण राजशेखर हा तिची सरस्वतीशी तुलना करितो. राजशेखराची स्वतःची बायको मार्मिक टीकाकार व कवयित्री होती. कांही स्त्रिया वैद्यकाचाही अभ्यास करीत; त्यांपैकी बहुतेक जणी स्त्रीरोगचिकित्सेवर अधिक लक्ष देत. 'रूसा' नांवाच्या एका हिंदू स्त्रीवैद्यानें स्त्रीरोगाबर एक पुस्तक लिहिलें होतें; तें इतकें प्रसिद्ध व उपयुक्त होतें, की आठव्या शतकामध्यें त्याचें आरबी भाषेमध्यें भाषांतर करण्यांत आलें.[३]

दुर्दैवानें वरील विदुषींपैकी कोणाचेच ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. ज्या अर्थी त्यांपैकी कांहींची स्तुति राजशेखरासारख्या कवीनें इतक्या मुक्तकंठानें केली आहे, व कांहींच्या ग्रंथांचीं परभाषेंत भाषांतरें झालीं आहेत, त्या अर्थी त्यांची विद्वत्ता व योग्यता मोठी असली पाहिजे यांत संशय नाही. या विदुषी कोणत्या प्रकारच्या कुळांत जन्मास आल्या होत्या, त्या विवाहित होत्या, की यावज्जीव अविवाहितच राहिल्या होत्या, विवाहित असल्या तर त्यांचें सर्व शिक्षण विवाहापूर्वीं झालें होतें, की विवाहानंतर झालें होते, याबद्दल कोणासही कुतूहल वाटेल; पण त्याबद्दल कांहीच माहिती मिळत नाही. या विदुषी बहुतेक अमात्य, प्रधान, मांडलिक, यांसारख्या सपन्न व सुसंस्कृत कुलांतील असाव्यात, कारण नवव्या शतकापर्यंत असल्या घराण्यांत स्त्रियांना उच्च शिक्षण देत असत व शास्त्राभ्यास व कविता करण्याची त्यांच्या अंगी पात्रता असे, असें काव्यमीमांसेवरून दिसून येतें.[४] संस्कृत नाटकांतील नायिकांवरून तेंच अनुमान

---

१ सूक्तीनां स्मरकेलीनां कलानां च विलासभूः । प्रभुर्देवी कवी लाटी गतापि हृदि तिष्ठति ॥ —सूक्तिमुक्तावल्युध्दृत राजशेखर.

२ सरस्वतीव कर्णाटी विजयांका जयत्यसौ । या वैदर्भगिरां वासः कालिदासादनंतरम् ॥ नीलोत्पलदलश्यामां विजयांकामजानता । वृथैव दंडिनाप्युक्तं सर्वशुक्ला सरस्वती ॥ —सूक्तिमुक्तावल्युध्दृत राजशेखर.

३ नदवी, अरब और भारत के संबंध, पृ. १२२. 'रूसा'चें मूळ हिंदु नांव काय असावें हे कळत नाही.

४ पुरुषवद्योषितोऽपि कवीभवेयुः । श्रूयन्ते दृश्यन्ते च राजपुत्र्यो महामात्रदुहितरो गणिकाः कौतुकिभार्याश्च शास्त्रप्रहितबुद्धयः कवयश्च । —काव्यमीमांसा, पृ. ५३.

निघतें. या कुलांतील मुलींना संगीत, चित्रकला, गृहशृंगार, वगैरे ललित कलांचेंही शिक्षण देत असें संस्कृत नाटकें व कामसूत्र[१] यांवरून दिसतें. सुसंस्कृत व संपन्न कुळें समाजांत थोडींच असतात; त्यांमधील स्त्रियांना वाङ्मयादिकांचें शिक्षण मिळत असलें, तरी त्यावरून स्त्रीसमाजामध्यें साक्षरता बऱ्याच प्रमाणावर होती असें अनुमान काढतां येत नाही. आठव्या नवव्या शतकाच्या सुमारास जेव्हा मुलींचीं लग्नें नवव्या दहाव्या वर्षीं होऊं लागलीं, तेव्हा बऱ्याचशा मुली अशिक्षित राहूं लागल्या. मुलीं-मधील साक्षरतेचें प्रमाण या वेळीं काय होतें, हें सांगणें कठीण आहे. पण १२ व्या शतकामध्यें पुरुषांमधील साक्षरता शेकडा ३० या प्रमाणावर होती, हें ध्यानांत आणलें, म्हणजे स्त्रियांमधील साक्षरता या वेळीं शेकडा १०च्या वर नसावी, असें अनुमान काढण्यास कांहीच हरकत दिसत नाही.

मुसलमानी अमलामध्यें साक्षरतेचें हें प्रमाण भराभर कमी होऊं लागलें. राज्यक्रांतीमुळें ज्या संपन्न व सुसंस्कृत कुलांत स्त्रियांना शिक्षण देण्यांत येई, तीं कुळें बहुतेक धुळीस मिळालीं. कांही नवीन हिंदू कुलें संपन्न झालीं, पण तीं बहुतेक मूलतः हीन संस्कृतीचीं असल्यामुळें मुलींना शिक्षण देण्याकरितां खासगी शिक्षक ठेवण्याची प्रथा त्यांचेमध्यें पडली नाही. मुलींच्या शिक्षणाच्या सार्वजनिक शाळा नव्हत्याच. त्यामुळें मुसलमानी अमलांत स्त्रियांमध्यें निरक्षरतेचा प्रसार जोरांत होंऊं लागला. राजपुत राजघराण्यांमध्यें राजकुमारींना शिक्षण देत असत, जैन विधवां-नाही एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं मठामध्यें धर्मग्रंथ वाचतां येण्या-इतकें शिक्षण देत.[२] पण हीं अपवादात्मक उदाहरणें आहेत. सामान्यतः स्त्रिया या वेळीं अशिक्षित असत. १८२६ सालीं मद्रास इलाख्यांत ४०२३ मुली प्राथमिक शाळांत जात असत; म्हणजे शाळेला जाणाऱ्या वयाच्या मुलींपैकी शेकडा $\frac{१}{४}$ मुली साक्षर होत्या.[३]

हिंदुकालाच्या शेवटीं शेकडा दहापेक्षा जास्त स्त्रिया जरी साक्षर

---

१ वात्स्यायन कामसूत्र, १. ३. १६.

२ माल्कम्, मेमॉयर्स्, २. १६९.

३ रिपोर्ट ऑफ दि मद्रास प्रॉव्हिन्शियल कमिटी, एजु. कमि., १८८२, पृ.५.

नव्हत्या, तरी सामान्य स्त्रीसमाज असंस्कृत होता असें म्हणतां यावयाचें नाही. पुराणांच्या द्वारें या वेळीं हिंदु संस्कृतीचें ज्ञान बहुजनसमाजास लोकभाषेंतून देण्याची प्रथा बद्धमूल होऊं लागली होती, त्यामुळें धर्म, नीति, तत्वज्ञान व प्राचीन संस्कृति यांचें ज्ञान निरक्षर लोकांतही चांगलेंच फैलावूं लागलें. निरक्षर असूनही हिंदु स्त्रियांनी हिंदु संस्कृतीचें जें संरक्षण केलें आहे, त्याचें बरेचसें श्रेय पुराणश्रवण, पौराणिकधर्मपालन, व मध्ययुगांतील संतकवींच्या लोकभाषांतील वचनांचें पठण, यांसच दिलें पाहिजे.

हिंदुकालामध्यें क्षात्र घराण्यांतील व राजकुलांतील स्त्रियांना काय शिक्षण देत, तें आता आपण पाहूं. राजघराण्यांतील स्त्रियांना राज्यकारभाराचें व लष्करी कवाइतीचें शिक्षण देण्यांत येई. मस्सग लोकांचा राजा अलेक्झँडरबरोबरच्या लढाईंत जेव्हा पडला, तेव्हा त्याच्या विधवा राणीने राजधानीच्या बचावाचें व राज्यकारभाराचें काम आपल्याकडे घेतलें होतें. सातवाहन घराण्यांतील नयनिका राणी[१] व वाकाटक घराण्यांतील प्रभावतीगुप्ता राणी[२] या दोघीही आपल्या पतीच्या पश्चात् मुलांच्या अज्ञानावस्थेंत आपल्या राज्यांचा कारभार पहात होत्या. काश्मीरमध्यें सुगंधा व दिद्दा या दोन राज्यकर्त्या राण्या होऊन गेल्या. चालुक्यांच्या राजवटींत तर राजघराण्यांतील पुष्कळच स्त्रियांकडे राज्यकारभारांतील जबाबदारीचीं कामें सोपविण्यांत येत. विजयभट्टारिका, अक्कादेवी, मइलादेवी, कुंकुमदेवी व लक्ष्मीदेवी या चालुक्य राजघराण्यांतील राजस्त्रियांकडे अनुक्रमें सातव्या शतकामध्यें, व इ. स. १०२२, १०५३, १०७७ व १०९५ सालीं शहराधिकाऱ्यांचें किंवा प्रान्ताधिकाऱ्यांचें काम सोपविलें होतें असें कोरीव लेखांवरून दिसून येतें.[३] ज्या अर्थी राजघराण्यांतील स्त्रियांना अशा तऱ्हेने अडचणीच्या वेळीं, किंवा इतर वेळीं सुद्धा, राज्यकारभाराचें सुकाणूं हातीं धरावें लागे, त्या अर्थी त्यांना राज्यकारभाराचें योग्य शिक्षण देत असले पाहिजेत. घोड्यावर बसणें, तलवार, भाला

---

१ नानाघाट येथील मोठा कोरीव लेख.

२ ए. इं., भाग १५, पान १३०.

३ इं. अँ., ७ पान १६३; १८ पान ३७; ९ पान २७४ हीं पहा.

चालवणें, पोहणें वगैरे गोष्टी त्यांना येत असत. विजयमहादेवीच्या मुलाचें नांव गंगदत्त हें ठेवलें होतें, कारण त्याच्या गरोदरपणीं पोहण्याचे डोहाळे लागून त्याची आई सारखी नदींत पोहत असे.[१] आपल्या खेडेगांवचें रक्षण करतां करतां मेलेल्या स्त्रियांच्या स्मरणार्थ कोरलेले कांही लेख सापडले आहेत.[२] टिगु नदक नांवाच्या दरोडेखोराचा पराभव करून त्यास पकडल्याबद्दल एका कर्नाटकांतील वीरस्त्रीस १२६४ सालीं एक मुगवट बक्षीस दिल्याचा उल्लेख आढळतो.[३] आपल्या बापाचा खून करणाऱ्या मारेकऱ्याबरोबर लढतां लढतां हरियक्का नांवाची कर्नाटकी वीरस्त्री १४४६ सालीं मरण पावली होती.[४] मराठा व राजपुत स्त्रियांनाही मध्ययुगांत लष्करी शिक्षण देत असत.[५] सारांश सामान्य क्षत्रिय घराण्यांमध्यें सुद्धा स्त्रियांना थोडें बहुत लष्करी शिक्षण देत असत यांत संशय नाही.

ललितकला व वाङ्मय हेंच सामान्यपणें सर्वसाधारण स्त्रियांच्या शिक्षणाचे मुख्य विषय असत. शिक्षणाने स्त्रिया आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी व्हाव्यात, ही कल्पना अलीकडची आहे; स्वाभाविकपणेंच ती प्राचीन हिंदुस्थानांत नव्हती. तथापि आपत्काल ओढवला तर हिंदु विधवांची स्थिति पूर्वी हल्लीइतकी असहाय होत नसे. सूत कातण्याची कला या कालीं सर्व आबालवृद्धास व विशेषत: स्त्रियांस चांगली अवगत असे, त्यामुळें अनाथ लोकांस जरुरीच्या वेळीं बरीच मदत होत असे. 'तुमच्या पश्चात् मला मुलांचें पोट भरावयास येईल, कारण मला सूत कातणें व विणणें हीं दोन्ही चांगली येतात' असें म्हणून आसन्नमरण पतीचें समाधान करीत असलेल्या बायका पाली वाङमयांत आढळतात.[६] अर्थशास्त्रामध्यें विधवा किंवा प्रोषितभर्तृका स्त्रियांना सूत कातण्याचें काम त्यांच्या

१ ए. क., ७, शिमोगा नं. ४ इ. स. ११२२.

२ सौ. इं. ए. रि, १९११ नं. १७३.

३ ए. क. १ शिकारपुर नं. ७५.

४ ए. क. ७, शिकारपुर नं. २.

५ माल्कम्, मेमॉयर्स, २, ९९–१०.

६ 'कुसलाहं गहपति कप्पासं कंतितुं वेणिमोलिखितुं सक्काहं गहपति तवाच्चयेन दारके पोसेतुं।'

स्वतःच्या घरींच मिळून त्यांच्या उपजीविकेस मदत व्हावी, म्हणून प्राचीन राजवटींत काय तजवीज करीत याचें सविस्तर वर्णन सापडतें.[१] विधवा स्त्रिया तूं धन नसलें म्हणजे प्रायः सूत कातून उपजीविका करीत, असें मेधातिथीवरूनही दिसून येतें. [२] आपत्कालीं स्वाभिमानानें निर्वाह करण्याचें हें स्वायत्त साधन गेल्या शतकामध्यें गिरण्यांच्या चढाओढीपुढे खादीचें कापड चिरडून जाईपर्यंत हिंदू स्त्रियांना जरूर त्या वेळीं उपलब्ध होतें.

---

# प्रकरण आठवें
## शिक्षणकेन्द्रें व शिक्षणसंस्था

अनेक शतकें प्राचीन हिंदुस्थानांत सार्वजनिक शिक्षणसंस्था नव्हत्या. विद्वान् ब्राह्मण खासगी रीतीनेंच अध्यापनाचें कार्य करीत. अध्यापन हें ब्राह्मणांचें धार्मिक कर्तव्य होतें, व त्यांची धर्मनिष्ठा इतकी जाज्वल्य होती, की अनेक ब्राह्मण, फीचा करार न करितां, येईल त्या योग्य विद्यार्थ्यास फुकट शिकवत असत. बौद्ध संघांप्रमाणें ब्राह्मणांचे संघ किंवा सार्वजनिक संस्था ठिकठिकाणीं असत्या, तर त्यांच्या अनुषंगानें सार्वजनिक शिक्षणसंस्थाही निघाल्या असत्या. पण ब्राह्मणांनी असले संघ स्थापले नाहीत. कांहीं प्रसिद्ध ठिकाणीं विद्वज्जनांच्या परिषदा असत; पण या ब्राह्मणपरिषदा धार्मिक गुंतागुंतीचे प्रश्न सोडविण्याचें काम वेळोवेळीं अंगावर घेत. शिक्षणाच्या सार्वजनिक संस्था काढण्याचें किंवा चालविण्याचें कार्य त्यांनी कधीच केलें नाही. जें कार्य प्रत्येक विद्वान् ब्राह्मण स्वयंस्फूर्तीनें धार्मिक कर्तव्य म्हणून गाजावजा न करितां करीत असे, त्याकरितां संस्था कशाला, असें समाजास वाटलें असावें असें दिसतें. तक्षशिला, बनारस वगैरे ठिकाणीं शेंकडो ब्राह्मण अध्यापनाचें कार्य करीत असत. पण त्यांनाही सहकार्याच्या तत्वावर सार्वजनिक शिक्षणसंस्था चालवण्याची कल्पना सुचली नाही.

---

१ कौटिलीय अर्थशास्त्र, २. २३.

२ मृतपतिकाया अनपत्याया असति भर्तृधनादौ दायिके च कर्तनादिना केनचिदुपायेन जीवन्त्या... ।—मनु ५. १५७ वर मेधातिथिटीका.

सार्वजनिक शिक्षणसंस्था प्रथम बौद्ध मठांत निघाल्या. भिक्षूनें एकेकटें राहूं नये, दहा भिक्षू एके ठिकाणीं असले म्हणजे त्यांनी आपला संघ बनवलाच पाहिजे, नवीन श्रमणास भिक्षुत्वाची दीक्षा दिली की त्याला दहा वर्षेंपर्यंत त्रिपिटकादिकांचें सांगोपांग शिक्षण वृद्ध भिक्षूंनी दिलें पाहिजे, असे बुद्धानें नियम घालून दिले होते. त्यामुळें शिक्षणाचें कार्य प्रत्येक मठांत अविरत चालत असे; कारण नवीन नवीन श्रमणांना भिक्षुत्वाची दीक्षा देण्याचें काम नेहमी सुरू असे. प्रथम प्रथम नवभिक्षूनाच बौद्ध उपाध्याय शिकवीत असत, पण पुढे समाजांतील मुलांचें शिक्षण पहिल्यापासूनच आपल्या देखरेखीखालीं घेण्यानें धर्मप्रसाराचें काम अधिक सुलभ होतें असा अनुभव येऊं लागल्यामुळें बौद्ध मठांतून सर्वांनाच शिक्षण देण्याचें कार्य सुरू झालें. हिंदूंचीं आतापर्यंत ज्ञात असलेलीं सर्व सार्वजनिक विद्यालयें इसवी सनानंतरच्या नवव्या शतकानंतरचीं आहेत. तेव्हा तीं काढण्याची कल्पना बौद्ध विहारांतील शिक्षणसंस्थांवरून हिंदूंना सुचली असावी असें म्हणण्यास हरकत नाही; कारण बौद्धांच्या मठ-शिक्षणसंस्था पांचव्या शतकांतच भरभराटीस आल्या होत्या.

राजधान्या, तीर्थें, मठ, देवालयें, व अग्रहार गांवें या ठिकाणीं प्राचीन काळीं शिक्षणकेंद्रें असत. राजे लोक हे विद्वानांचा परामर्ष घेत, म्हणून राजधानीच्या ठिकाणीं साहजिकच विद्वान् लोक पुष्कळ असत; त्यामुळें तक्षशिला, कनोज, मालखेड, कल्याणी, धारा वगैरे राजधान्या शिक्षणकेन्द्रें बनल्या होत्या. बनारस, पैठण, कांची, नासिक, कऱ्हाड, वाई, वगैरे सारख्या तीर्थांच्या ठिकाणीं विद्वान् ब्राह्मणांची वस्ती मोठी असे, व ते अध्यापनकार्य आपलें पवित्र धार्मिक कर्तव्य समजत; त्यामुळें तीर्थेंही शिक्षणकेन्द्रें बनत. बौद्ध मठांमध्यें शिक्षणकार्य का चालत असे, हें वर सांगितलेंच आहे. त्यांचें उदाहरण डोळ्यापुढे असल्यामुळें हिंदू देवालयांना जेव्हा मोठमोठ्या मिळकती देणग्या म्हणून मिळूं लागल्या, तेव्हा त्यांचे चालकही उत्पन्नाचा कांही भाग देवळांमध्यें शिक्षणसंस्था काढून त्यामध्यें विद्यार्थ्यांना फुकट शिक्षण व भोजन देण्याकडे खर्च करूं लागले. राजे लोक विद्वान् ब्राह्मणांच्या निर्वाहाकरितां जीं गांवें इनाम देत, त्यांना अग्रहारगांवें म्हणत; तेथील इनामदार ब्राह्मण हे नाणावलेले पंडित असत, व उदर-

निर्वाहाची चिंता राजसत्तेने निवारली असल्यामुळें ते कृतज्ञतेने अध्यापनाचें कार्य हौसेने करीत. यामुळें अग्रहारगांवेंही शिक्षणकेन्द्रें होत.

प्राचीन हिंदुस्थानांतील शिक्षणकेन्द्रांची व संस्थांची आता आपण येथे माहिती व इतिहास देऊं.

## तक्षशिला

तक्षशिला हें निस्संशय हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें व नाणावलेलें शिक्षणकेन्द्र होय. हें नगर भरताने वसवलें होतें असें रामायणावरून, व येथे जनमेजयाने सर्पयज्ञ केला होता, असें महाभारतावरून समजतें. त्या वेळीं हें नगर शिक्षणकेन्द्र होतें की नाही, याबद्दल रामायणमहाभारतांत कांही माहिती मिळत नाही; कदाचित त्याबद्दल लिहिण्याचें कांही प्रयोजन नाही, असें वाल्मीकिव्यासांना वाटलें असावें. इ. स. पू. सातव्या शतकांत सर्व हिंदुस्थानात तक्षशिला हेंच अत्यंत प्रसिद्ध शिक्षणकेन्द्र होतें, असें जातकांवरून दिसून येतें; तेव्हा अध्यापनाचें कार्य तेथे त्यापूर्वी कांही शतकें तरी सुरू झालें असावें हें निर्विवाद होय.

ज्या गांधार प्रांताची तक्षशिला राजधानी होती तो गांधार प्रान्त इ. स. पू. सहाव्या शतकांत पर्शियन लोकांनी, इ. स. पू. दुसऱ्या शतकांत ग्रीक लोकांनी, इ. स. पू. पहिल्या शतकांत पार्थियन लोकांनी, इ. स. च्या पहिल्या शतकांत कुशाण लोकांनी जिंकून आपापल्या राज्यास जोडला होता. या राज्यक्रांत्यांमुळें तक्षशिलेच्या शिक्षणक्रमांत थोडा बहुत फेरफार झाल्याशिवाय राहिला नाही. पर्शियन अंमलांत तक्षशिलेंतून राष्ट्रीय ब्राह्मी लिपीचें बरेंचसें उच्चाटन होऊन तेथे पर्शियन लोकांनी राजलिपि म्हणून सुरू केलेल्या खरोष्ट्री लिपीचें स्तोम माजलें. पार्थियन् व कुशाण लोक रानटी होते; त्यामुळें त्यांच्या अंमलांत शिक्षणक्रम बदलला नाही; पण ग्रीक अमलांत बरेच फरक पडले. तक्षशिलेवर ग्रीक लोकांचें राज्य सुमारें इ.स.पू.१९०पासून ते इ.स.पू ७०पर्यंत होतें. त्या कालामध्यें हल्ली जितका इंग्रजीचा अभ्यास केला जातो तितका नसला तरी, थोडा बहुत तरी राजभाषा म्हणून ग्रीक भाषेचा अभ्यास तक्षशिलेंतील विद्यालयांत होत असावा. अपोलोनियस नांवाचा ग्रीक प्रवासी हिंदुस्थानांत या वेळीं आला

होता; हिन्दु लोक सॉफोक्लीस् व यूरिपिडीस् यांचीं नाटकें वाचतात, हिन्दु व ग्रीक तत्वज्ञानी परस्परांच्या ग्रंथांचें परिशीलन करितात, व तक्षशिलेजवळच्या खेड्यांतील लोकांना सुद्धा ग्रीक भाषा समजते असें त्यानें लिहून ठेवलें आहे.[१] यामध्यें थोडीशी अतिशयोक्ति असली, तरी या वेळी तक्षशिलेचे अध्यापक ग्रीक भाषा व ग्रीक शिल्पकला आपल्या विद्यालयांत शिकवीत असावेत यांत संशय नाही. ग्रीक अंमलामुळें शिक्षणपद्धतीवर आणखी काय काय परिणाम झाले, याची सविस्तर माहिती मिळत नाही हें दुर्दैव होय.

तक्षशिलेमध्यें हल्लीसारखीं सार्वजनिक विद्यालयें नव्हतीं. तेथे अनेक 'जगप्रसिद्ध' ( दिसापमोक्ख ) शिक्षक होते, पण ते एखाद्या सार्वजनिक विद्यालयाचे किंवा विश्वविद्यालयाचे घटक अथवा अध्यापक नव्हते; व ते जो अभ्यासक्रम शिकवीत तो एखाद्या शिक्षणमंडळाने आखलेलाही नव्हता. प्रत्येक अध्यापक स्वतंत्र असे. आपल्या सोयीप्रमाणें तो विद्यार्थी घेई व स्वतःस आवडणारे किंवा विद्यार्थ्यास जरूर असणारे विषय शिकवी. शिक्षणक्रम अमक्या वर्षांचा असा ठरलेला नसे; प्रत्येक विद्यार्थी आपल्या सोयीप्रमाणें रहात असे. शिक्षणक्रमाच्या शेवटची अशी ठराविक पद्धतीची परीक्षा नसे, व विद्यार्थ्यांना पदव्या किंवा प्रमाणपत्रेंही देत नसत.

तक्षशिलेच्या नामांकित अध्यापकाजवळ प्रत्येकीं ५०० विद्यार्थी शिकत असत, अशीं विधानें जातकांत आढळतात, पण तीं अक्षरशः का खरीं मानतां येत नाहीत याबद्दल मागे विवेचन केलेंच आहे.[२] शरभंग जातकामध्यें मात्र एका गुरूजवळ १०३ राजपुत्र धनुर्विद्या शिकत, असें जें विधान आढळतें तें विश्वसनीय मानावें लागेल, पण बहुतकरून त्याच्या हाताखाली मदत करण्यास दुसरे पुष्कळ शिक्षक असावेत. सामान्यतः प्रत्येक गुरूच्या हाताखाली २०–२५ पेक्षा जास्त विद्यार्थी नसावेत असें का मानावें लागतें, याबद्दल मागे चर्चा केलीच आहे.[२] प्राचीन तक्षशिला

१ मार्शल, गाइड टु तक्षिला, पान, १५ व १७.

२ मागे पान ८२ पहा.

नगराचा सर्व भाग आता वरची माती वगैरे काढून टाकल्यामुळे(excavation) पूर्वीसारखा दिसूं लागला आहे; ५०० विद्यार्थ्यांना पुरणाऱ्या इमारतीचे अवशेष तेथे उपलब्ध झालेले नाहीत.

शिक्षणकेंद्र म्हणून तक्षशिलेची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरलेली होती. कुरु, कोशल, वगैरे देशांतून व उज्जयिनी, बनारस, मिथिला, राजगृह, वगैरे सारख्या दूरच्या नगरांतून,त्या कालीं प्रवास इतक्या जिकिरीचा व जोखमीचा असतांही, असंख्य विद्यार्थी तक्षशिलेस अध्ययनास येत असत.[१] बनारस, राजगृह, वगैरे राजधान्यांमध्यें प्रसिद्ध शिक्षक असत, पण तक्षशिलेचा लौकिक मोठा म्हणून दूर देशचे संपन्न लोक तेथेच शक्य तितकीं आपलीं मुलें पाठवीत. कोसलचा प्रख्यात प्रसेनजित् राजा तक्षशिलेंतच शिकलेला होता;[२] राजगृहाच्या जीवक राजपुत्राने तेथेच वैद्यकाचा अभ्यास केला होता;[३] पाणिनीचें अध्ययन तेथेच झालें होतें.

सोळाव्या वर्षाच्या सुमारास तक्षशिलेस विद्यार्थी अभ्यासास जात, व सात आठ वर्षांनी तेथून परत फिरत. गरीब विद्यार्थी दिवसा काम करीत व त्यांना गुरु रात्रीं शिकवत. संपन्न विद्यार्थी गुरुगृहींच रहात, व पुष्कळदा आगाऊच गुरुदक्षिणा देत. वेद, वेदांत, तत्वज्ञान, व अठरा सिप्पें म्हणजे वैद्यक, धनुर्वेद, ज्योतिष, जमाखर्च, व्यापार, शेतकी, सर्पविद्या, जादुगिरी, संगीत इत्यादि विद्या तेथे शिकवीत.[४] ब्राह्मण मुलें क्षात्रविद्येचें व क्षत्रिय मुलें ब्राह्म विद्येचेंही अध्ययन करीत. अलेक्झँडरच्या वेळीं तक्षशिलेची तत्वज्ञानाच्या अभ्यासाबद्दल फार ख्याति होती.

इ. स. च्या प्रारंभापासून तक्षशिलेच्या अध्यापनकार्याबद्दल फारशी माहिती मिळत नाही. कुशाण सम्राटांच्या अमदानीमध्यें म्हणजे सुमारें इ. स. २२५ पर्यंत तक्षशिलेची भरभराट होत होती; पण त्यांच्या पश्चात् जे छोटे युएह्ची(Little Yuehchi) राजे आले, ते रानटी होते व त्यांच्या अमलापासून तक्षशिलेस उतरती कळा लागली. गुप्तांचें साम्राज्य तक्षशिलेपर्यंत पसरलें असतें, तर तेथे नालंदासारखें विश्वविद्यालय पुन्हा

---

१ जातक नं. ३७८, ४८९, ३३६, ४९८ पहा.

२ जातक नं, ४९८

३ महावग्ग ८

४ जातक नं, ८०, १३०, १५०, १८५, ४१६, ५३७ पहा.

स्थापन झालें असतें. पण गुप्तसाम्राज्य तक्षशिलेपर्यंत पोहचूं शकलें नाही. पांचव्या शतकाच्या प्रारंभीं चिनी भिक्षु फा हियन् तक्षशिलेला गेला होता, त्या वेळीं त्यास तेथे कांही शिक्षणकार्य दिसून आलें नाही. सातव्या शतकामध्यें युआन्च्वांग ज्या वेळीं तक्षशिलेस गेला, त्या वेळीं तेथील बहुतेक लोक बौद्ध असूनही सर्व मठ मोडून उध्वस्त झाले होते. प्रसिद्ध कुमारजीवाच्या मठांचीही तीच स्थिति होती. पांचव्या शतकाच्या शेवटीं क्रौर्य व रानटीपणा याबद्दल कुप्रसिद्ध असलेल्या हूण लोकांनी पंजाब पादाक्रांत केला होता, त्यांच्या हातून तक्षशिला नगराचा, तेथील मठाचा, व विद्यालयांचा नाश झाला. यापुढे गांधार प्रांत अनार्य मानण्यांत येऊं लागल्यामुळें तक्षशिलेस हिंदु विद्येचें पुनरुज्जीवन होऊं शकलें नाही.

## बनारस

हिंदु धर्माचें व विद्येचें माहेरघर म्हणून आज दोन हजारांपेक्षाही अधिक वर्षें बनारस प्रसिद्ध आहे; पण संस्कृत वाङ्मय, कोरीव लेख, किंवा विदेशी प्रवासी यांपैकी एकापासूनही बनारसच्या अध्यापनविषयक इतिहासाची विशेष माहिती मिळत नाही. बनारस हें तक्षशिलेइतकें प्राचीन विद्याकेन्द्र असणें शक्य नाही; कारण तक्षशिलेनंतर अनेक शतकांनी आर्यधर्म व विद्या बनारसला पोहोंचल्या. काशी, विदेह, अंग, वंग, वगैरे पूर्वेकडील देशांतील लोकांस ब्राह्मण कालीं हीन आचाराचे समजत; पंजाब, कुरुपांचाल हे देश त्या वेळीं आर्य संस्कृतीचे माहेरघर होते. जादूनें काढलेला रोग्याचा ताप बनारस–मगधाकडे जावो अशी इच्छा अथर्ववेदामध्यें एके ठिकाणीं प्रदर्शित केली आहे.[१] आर्य धर्म स्वीकारल्यावरही बनारसच्या लोकांची त्यावर फारशी श्रद्धा नव्हती. आर्यधर्माचा अंगीकार केल्यावर बनारसच्या धृतराष्ट्र नांवाच्या राजाने अश्वमेध यज्ञ सुरू केला. दुर्दैवाने शतानीक सत्राजित् नांवाच्या भरत राजाने त्याचा यज्ञाचा घोडा पळवून नेला. धृतराष्ट्रास तो परत मिळवतां न आल्यामुळें जेव्हा त्याचा अश्वमेध यज्ञ फिसकटला, तेव्हा त्याचा आर्यधर्मावरील विश्वास उडाला, व सोमयाग व अग्निपूजा करण्याचें त्याने सोडून दिलें.[२]

१ अ. वे.सं. (पिप्पलादशाखापाठ) ५.२२.१४.

२ शत. ब्रा. १३. ५. ४. १९.

पुढे कांही वर्षांनी काशीचें राजघराणें पुन्हा आर्यधर्मी बनलें, व मग आर्य संस्कृतीचा व विद्येचा त्याच्याकडून जोराने प्रसार होऊं लागला. विदेहामध्यें प्रख्यात जनक राजाची कारकीर्द सुरू होती, तेव्हा बनारसला अजातशत्रु राज्य करीत होता; जनकापेक्षा आपल्या दरबारीं जास्त विद्वान असावेत, म्हणून त्याने अधिक मोठ्या दक्षिणा देण्यास सुरुवात केली होती.[१] त्यामुळें बनारस हें झपाट्याने विद्येचें केन्द्र बनूं लागलें. तथापि जातककालामध्यें बनारसची तक्षशिलेइतकी विद्येबद्दल प्रसिद्धि नव्हती. बनारसचे राजे व शेटसावकारच नव्हे, तर गरीब लोक सुद्धा, तक्षशिलेस आपलीं मुलें शिकावयास पाठवीत. तिलमुट्ठिजातकामध्यें बनारसलाही 'दिसापमोक्ख' म्हणजे जगद्विख्यात शिक्षक होते असें विधान आढळतें. पण त्यांची कीर्ति तक्षशिलेच्या पंडितांइतकी नव्हती. बनारसच्या अध्यापकांपैकीं कांहींचें शिक्षण तक्षशिलेस झालेलें दिसतें.

बुद्धाने ज्या अर्थी बनारसजवळील सारनाथमध्यें प्रथम धर्मोपदेश करण्याचें ठरविले, त्या अर्थी त्या वेळी बनारस हें विद्येचें व तत्त्वज्ञानचर्चेचें केन्द्र असावें असें वाटतें. याबद्दल निश्चित असा पुरावा मात्र अद्याप उपलब्ध नाही. अशोकाच्या वेळेपासून सारनाथ मठाच्या ऊर्जितावस्थेचा काल सुरू झाला, युआन् च्वांगच्या वेळीं तर तेथे अनेक भव्य मठ व १५०० बुद्ध भिक्षु होते. नालंदाच्या अध्यापनाच्या कार्यक्रमाविषयीं जसें युआन् च्वांगनें वर्णन केलें आहे तसें त्याने सारनाथ संबंधाने केलेलें नाही हें खरें, पण हें अनवधानतेमुळें झालें असावें. लहान लहान मठांतूनही या वेळीं विद्यादान होत असे; नालंदाच्या इतक्या नर्जीक असलेलें व धर्मचक्रप्रवर्तनासारख्या महत्वाच्या घटनेचें स्थान असलेलें सारनाथ हें बौद्ध विद्येचें महत्वाचें केन्द्र असलें पाहिजे यांत संशय नाही.

तीर्थ म्हणून बनारसचें अनेक पुराणांत वर्णन आढळतें, पण त्यांमध्यें चालणाऱ्या अध्यापनासंबंधीं कांहीच माहिती मिळत नाही. नाही म्हणावयास भविष्यपुराणाच्या ब्रह्मखंडामध्यें बनारसमधील ब्राह्मण विद्वान असतील अशा अर्थाचा एक श्लोकार्ध आढळतो. तीर्थांमधील विद्वान् ब्राम्हण हे अध्यापनाचें कार्य पवित्र कर्तव्य म्हणून करीत, तेव्हा त्यांबद्दल विशेष निर्देश करण्याची जरूरी नाही, असें पुराणलेखकांना वाटलें असावें.

---

१ बृ. उ., २.४; जनकाचा काल सुमारे इ. स. पू. १००० हा असावा.

इसवी सनाच्या पहिल्या दहा शतकांमध्यें बनारस विद्येचें माहेरघर होतें. शंकराचार्यासारख्यांना सुद्धा आपल्या मतांस व ग्रन्थांस मान्यता मिळवण्यास काशीलाच जाऊन तेथे त्यांचें उद्‌घोषण करावें लागलें. ११व्या शतकामध्यें हिंदुस्थानांत काश्मीर व बनारस हीं संस्कृत विद्येचीं मुख्य केंद्रें होतीं.[१] पण बनारसमध्यें, नालंदासारख्या नजीकच्या ठिकाणीं सार्वजनिक शिक्षणसंस्था निघाल्यावरही, तसल्या शिक्षणसंस्था इ. स. ५०० ते १२०० च्या दरम्यान निघाल्या नाहीत. बनारस हें बाराव्या शतकामध्यें गहडवाल राजांची दुय्यम राजधानी होतें. त्यांनी तेथील विद्वान ब्राह्मणांना दिलेले अनेक ताम्रपट्ट उपलब्ध झाले आहेत, पण त्यांपैकी एकामध्येंही एखाद्या विद्यालयास दिलेल्या दानाचा, किंवा एखादें सार्वजनिक विद्यालय चालवणाऱ्या ब्राह्मणाचा उल्लेख नाही. बनारस मधील असंख्य विद्वान् ब्राम्हण कर्तव्य म्हणून यथाशक्ति अध्यापनकर्म करीत; त्यांनी एखादें सार्वजनिक विद्यालय चालवलेलें दिसत नाही. सतराव्या शतकामध्येंही तीच स्थिती होती. बर्नियर म्हणतो, "बनारस हें एक प्रकारचें विश्वविद्यालय आहे, पण तेथे सार्वजनिक विद्यालयें व नियमित अभ्यासक्रम नाहीत. प्राचीन ग्रीसप्रमाणें तेथें अध्यापक शहराच्या सर्व भागभर पसरले आहेत. कांही शिक्षकांजवळ चार तर कांहींजवळ सहा विद्यार्थी शिकत असतात. अत्यंत प्रसिद्ध पंडिताजवळ देखील बारा ते पंधरापेक्षा अधिक शिष्य नसतात.[२] बनारसला हीच पद्धत प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. नालंदा, एन्नायिरम्, सालोट्गीप्रमाणें येथे कधी सार्वजनिक विद्यालयें अस्तित्वांत आलेलीं दिसत नाहीत.

## नालंदा

पाटलीपुत्राच्या आग्नेयेस सुमारें पन्नास मैलांवर, व बहारची प्राचीन राजधानी जें राजगृह तेथून सुमारें सात मैलांवर, नालंदा वसलें होतें. बुद्धाच्या चरित्राशीं सारनाथ, गया, कुसीनगर याप्रमाणें नालंदाचा महत्वाचा किंबहुना कसलाच संबंध नव्हता. तेव्हा तेथील मठ बौद्ध विद्येकरितां इतका प्रसिद्ध कां व्हावा, हें एक कोडेंच आहे. गुप्तांच्या राजा-

१ अल्बेरुनी, भाग १ पान १७३.

२ बर्नियर, ट्रॅव्हल्स इन् इंडिया, पान, ३४१.

श्रयामुळें नालंदाची भरभराट झाली हें खरें, पण गुप्त सम्राटांनी तरी सारनाथ, गया, वगैरे सारख्या प्रसिद्ध बौद्धतीर्थांतील मठांऐवजी नालंदांतील मठासच का इतकी गावें दिलीं ते समजत नाही.

इ. स. ४१० च्या सुमारास फा हियन् नालंदाला गेला होता; त्या वेळीं तेथें कांहीच अध्यापन कार्य चालत नव्हतें. पण त्यानंतर लवकरच नालंदामध्ये अनेक विहार बांधले गेले, व तेथे बौद्ध विद्येचें केंद्र प्रस्थापित झालें.[१] याचें बरेचसें श्रेय गुप्त सम्राटांनाच दिलें पाहिजे. हिंदुधर्माभिमानी म्हणून प्रसिद्ध असलेल्या गुप्त सम्राटानी सढळ हाताने व उदारमताने मदत करून नालंदा विश्वविद्यालय नांवारूपास आणिलें; या गोष्टीवरून सामान्यत: बौद्ध व हिंदू धर्म कसे गुण्यागोविंदाने रहात हें दिसून येईल. शक्रादित्याने (म्हणजे बहुतेक पहिल्या कुमारगुप्ताने इ. स. ४१४–४५४) नालदाला एक मोठें देवालय व मठ बांधून नालंदाच्या कीर्तिप्रासादाचा पाया घातला. तथागतगुप्त,[२] नरसिहगुप्त, बालादित्य, (४६८–४७२) व बुधगुप्त (सु. इ. स. ४७५–५००) या गुप्तसम्राटांनी आणखी नवे मठ बांधून व गांवें देऊन जास्त भिक्षु विद्यार्थ्यांची राहण्याची व जेवण्याची सोय केली.[३]

सहाव्या शतकातील नालदाचा इतिहास फारसा माहीत नाही. त्या वेळीं वज्र नांवाच्या एका राजाने नालंदाला आणखी मठ बांधले होते. पण या शतकाच्या पहिल्या पंचविशीत बौद्धधर्माचा नितांत द्वेष्टा जो मिहिरकुल त्याने पाटलीपुत्र जिंकून बालादित्य राजास समुद्रापर्यंत पिटाळून लावलें होते. हर्ष–शशांक युद्धामध्यें बिहार प्रान्त शशांकाच्या ताब्यांत कांही दिवस होता, व तोही बौद्धधर्माचा इतका द्वेष्टा होता, की त्याने गयेमधील बोधिवृक्ष तोडून टाकविला होता. मिहिरकुल व शशांक या राजांकडून नालंदास कदाचित् उपसर्ग पोचला असेल, पण

---

१ नागार्जुनाचा शिष्य आर्यदेव याने नालंदास अध्ययन केल असें तारानाथ म्हणतो नागार्जुनासंबंधीं इतक्या दंतकथा आहेत कीं त्याचा काल ठरवणें कठीण आहे. तारानाथाच्या या विधानास फारशी किंमत देतां येत नाही.

२ हा राजा कोण हे अद्याप माहिती नाहीं.

३ बील, युआन्‌च्वांग चरित्र, पान ११०–१११ पहा.

त्याबाबतींत विश्वसनीय अशी कांहींच माहीती मिळत नाही. पण जरी तेथे कांही नासधूस झाली असली, तरी इ. स. ६३० च्या सुमारास सर्व दुरुस्ती झाली होती; कारण त्यासुमारास जेव्हा युआन् च्वांग तेथें आला, तेव्हा तेथे भव्य उत्तुंग देवालयें व मठ चोहोकडे दिसत होते. नालंदाच्या देवालयांचीं शिखरें मेघ भेदून पलीकडे गेलीं आहेत असें जें युआन् च्वांगचा चरित्रकार म्हणतो, त्यास 'यस्यामम्बुधरावलेहि शिखरश्रेणी विहारावली। मालेवोर्वविरजिनी विरचिता धात्रा मनोज्ञा भुवः।' या यशोवर्म्याच्या नालंदास सापडलेल्या कोरीव लेखांतील श्लोकावरून[१] दुजोरा मिळतो. भव्य विहाराशेजारीं नीलोत्पलाच्छादित रम्य सरोवरें होतीं, त्यांतील कमलांचा देवपूजेकरितां, व पाण्याचा स्नानपानादिकाकरितां उपयोग होई. सर्व मठांभोवती एक उंच प्राकार उभारला होता.[२]

इत्सिगच्या वेळीं नालंदास ३००० च्या वर भिक्षु असत;[३] युआन् च्वांग म्हणतो की तेथे 'कांही हजार' भिक्षु राहत;[४] त्याचा चरित्रकार म्हणतो की तेथें १०००० पेक्षा क्वचीच कमी भिक्षु नसत.[५] एकंदर गोष्टींचा विचार करतां सातव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास नालंदास निदान ५००० भिक्षु असावेत याबद्दल संशय वाटत नाही. दरवर्षी भिक्षूंना नव्याने खोल्या वाटून देत. ज्ञानज्येष्ठांना व वयोज्येष्ठांना सर्वांत उत्तम खोल्या मिळत. कांही खोल्यांमध्यें दोन तर कांहींमध्यें एक भिक्षु राहण्याची सोय असे. प्रत्येकास निजण्याकरितां एक बाक असे. दिव्याकरितां व पुस्तकांकरितां प्रत्येक खोलीत कोनाडे असत. सर्व जण एकत्र जेवीत. मोठमोठ्या चऱ्यावर स्वयंपाक करीत. खोल्या, निजावयाचीं बाकें, स्वयंपाकाच्या चरी, अजूनही उत्खनन केलेल्या (excavated) नालंदाच्या भागांत पाहावयास सापडतात.

---

१ ए. इं., २०, पान ४३.

२ बील, युआन् च्वांग चरित्र, पानें १०९–११४; वॉटर्स, भाग २, पानें १६४–१७१; इत्सिग, पानें ३०,६५,८६,१५४ यावरून मुख्यतः नालंदासंबंधीं माहिती मिळते.

३ पान १५४.

४ वॉटर्स, २.१६५.

५ पान ११२.

नालंदास इतके भिक्षु मुख्यत: तिच्या अध्यापनाबद्दलच्या कीर्तीमुळें येत. युआन् च्वांग म्हणतो, "नालंदामध्यें जे कित्येक हजार भिक्षु होते, ते सर्व विद्वान् होते, त्याच्यांपैकी शेकडो भिक्षूंची विद्वत्तेबद्दल चोहोंकडे मोठी ख्याति होती. धार्मिक नियम ते मनापासून पाळीत; तत्वज्ञानाची चर्चा व वादविवाद करण्यामध्यें वेळ कसा निघून जाई हें त्यांना कळतही नसे. म्हणूनच आपल्या शंकांचें समाधान व्हावें, व आपलीही ज्ञानाबद्दल कीर्ति व्हावी, म्हणून दूरदूरच्या परदेशांतून नालंदास विद्यार्थी येत. नालंदांत शिक्षण घेतलेल्यांना समाजांत फार मान मिळे."[१]

नालंदामधील ५००० (किंवा १००००) भिक्षूंपैकी सुमारें एक हजारांना वीस सूत्रग्रंथ, सुमारें पांचशेंना तीस सूत्रग्रंथ, सुमारें दहांना ५० सूत्रग्रंथ विवरण करून सांगतां येत;[२] यावरून तेथील भिक्षु कसे विद्वान् असत तें दिसून येईल. तेथील मठाधिपतींची तर जाडया विद्वत्तेबद्दल फारच मोठी ख्याति असे. "त्यांपैकी धर्मपाल व चन्द्रपाल यांनी बौद्ध तत्वज्ञानास नवीन मनोहारिता प्राप्त करून दिली होती, गुणमति व स्थिरमति यांची विद्वत्तेबद्दल फारच ख्याति होती, प्रभामित्र हा स्वमतप्रतिपादनांत फारच कुशल होता, जिनमित्र हा संभाषणांतच ज्ञानानें श्रोत्यास भारून टाकी, जिनचंद्र याचें वर्तन आदर्शभूत व बुद्धि अत्यन्त तीव्र होती."[३] युआन् च्वांगच्या वेळीं जो शीलभद्र नामक मठाधिपति होता, 'तो इतका साधा होता की त्याच्या अगाध ज्ञानाची कोणास कल्पनाच येत नसे'. या मठाधिपतींपैकी बहुतेकांनी जाडया विद्वत्तेचे अनेक ग्रंथ लिहिलेले होते. बौद्धधर्म, तत्वज्ञान व वाङमय एवढेच नालंदांत अभ्यासाचे विषय नव्हते; वेद, तर्कशास्त्र, व्याकरण, सांख्यशास्त्र, वैद्यक वगैरे विषयांमध्येंही शिक्षण दिलें जाई.[४] नालंदाचे भिक्षु महायानपंथी असत, पण तेथे हीनयान ग्रंथांचेंही परिशीलन करण्यांत येई.

---

१ वॉटर्स भाग २, पान १६५.

२ युआन् च्वांग चरित्र, पान ११२.

३ वॉटर्स, भाग २, पान १६५.

४ युआन् च्वांग चरित्र, पान ११२.

नालंदांतील ५००० किंवा १०,००० भिक्षूंकी १५०० भिक्षूंना निदान वीस सूत्रग्रंथ विवरण करून सांगतां येत; [१] अर्थात् त्यांच्या अंगीं अध्यापक होण्याची पात्रता होती. नेव्हां एकेका अध्यापकाचे हाताखाली बरोबरीने नवापेक्षा जास्त विद्यार्थी नसत हें उघड आहे. अर्थात् अध्यापकास प्रत्येक विद्यार्थ्याकडे वैयक्तिक लक्ष देतां येई. दररोज सुमारें १०० वर्ग भरत असत; अध्यापनाकरितां आठ मोठीं दालनें व ४०० लहान खोल्या बांधलेल्या होत्या. शिकविण्याच्या हातोटीबद्दल अध्यापकांची फार ख्याति होती; इत्सिंग म्हणतो, "नालंदाच्या अध्यापकांच्या हाताखाली शिक्षण घेण्याचें भाग्य माझ्या नशिबीं होतें, म्हणून बरें, नाहीतर माझे अनेक संशय कधींच नाहींसे झाले नसते." [२]

नालंदास शिक्षण मिळावें, म्हणून पुष्कळ लोक धडपडत असत, पण अधिकारी विद्यार्थ्यांसच तेथे प्रवेश मिळे. प्रवेशाच्या वेळीं कसून परीक्षा घेण्यांत येई. तिच्यामध्यें दहापैकी दोन किंवा फार तर तीनच उत्तीर्ण होत. [३] तेथे हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतून व हिंदुस्थानाबाहेरील बौद्ध देशांतूनही विद्यार्थी येत असत. फा हियन्, युआन् च्वांग, इत्सिंग हे तेथे अभ्यासाकरितां राहिले होते हें सर्वश्रुत आहे; पण इ.स. ६४५ ते ६७५ च्या तीस वर्षांतील कालामध्यें थोन्मि, हिउऐन् चिउ, टोहि, ह्वुइ निएह, आर्यवर्मन्, बुद्धधर्म, टोसिंग, टंग,व ह्वुइ लू इतके भिक्षु चीन, कोरिया, तिबेट, तुखारा, वगैरे सारख्या दूर देशांतून नालंदास अध्ययनार्थ येऊन राहिले होते, [४] हें वाचून सामान्य वाचकास आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही.

नालंदामधील ग्रंथालय फार मोठें होतें; रत्नसागर, रत्नोदधि व रत्नरञ्जक या अन्वर्थक नांवांनी प्रसिद्ध असलेल्या इमारतींत त्यांमधील पुस्तकें ठेवलेलीं असत. या इमारती ज्या मोहल्यांत होत्या, त्यास धर्मगंज असें नांव होतें. चीन, कोरिया, वगैरे दूर देशांतील विद्यार्थ्यांचा नालंदास येण्यांतील एक हेतु तेथील ग्रंथालयांतून त्रिपीटकादि ग्रंथांच्या शुद्ध प्रती

---

१ युआन् च्वांग चरित्र, पान ११२.

२ इत्सिंग, पान १८५.

३ वॉटर्स, भाग २, पान १६५.

४ युआन् च्वांग चरित्र, प्रस्तावना पानें, २७–२९.

मिळविणें हा असे. इत्सिगनें नालंदाहून ५,००,००० श्लोकांचे चारशें ग्रंथ आपल्याकरितां लिहवून घेऊन चीनमध्यें नेले होते. जुन्या नव्या ग्रंथांच्या प्रती लिहवून काढण्याकडे मठाधिपतींचें विशेष लक्ष असे; देणग्यांपैकी कांही भाग पुष्कळदा या कारणाकरितां (धर्मरत्नस्य लेखनार्थम्) राखून ठेवण्यांत येई.

नालंदाच्या खर्चाकरितां निरनिराळया राजांनी सुमारें शंभर गांवें दिलीं होतीं; त्यामुळे तेथे अध्ययन करणाऱ्या सर्व भिक्षूंना जेवण, कपडे व औषधें फुकट मिळत असत.[१] ज्यांना बौद्धधर्माची दीक्षा घ्यावयाची नसे, त्यांना फुकट अन्नवस्त्र देण्याची हिंदुस्थानांतील मठांत पद्धत नसे, असें इत्सिग म्हणतो. नालंदास काय चाल होती, याबद्दल निश्चित माहिती मिळत नाही; बरीचशी इनाम गांवें हिंदू राजाकडून मिळाली असल्यामुळे व नालंदास दूरदूरच्या प्रांतांतून व देशांतून विद्यार्थी येत असल्यामुळें तेथे सर्व योग्य विद्यार्थ्यांस फुकट अन्न, वस्त्र व औषध मिळण्याची सोय केलेली असणें अशक्य वाटत नाही.

तेराव्या शतकामध्यें मुसलमानांकडून उच्छेद होईपर्यन्त नालंदाची शिक्षणकेन्द्र म्हणून प्रसिद्धि टिकून होती. आठव्या शतकांतील यशोवर्म्याच्या नालंदाशिलालेखांत विद्वत्तेमध्यें सर्व नगरांत नालंदाकडेच अग्रेसरत्व होतें असें विधान आढळतें.[२] नवव्या शतकामध्येंही शिक्षणकेन्द्र म्हणून नालंदाची अंतर्राष्ट्रीय कीर्ति होती. जावासुमात्राच्या बलपुत्रदेव नामक राजानें 'नालंदाच्या विद्वत्तेच्या कीर्तीवर मोहित होऊन' तेथे एक नवीन मठ बांधून दिला व आपला मित्र जो बंगालचा देवपालराजा त्याचेकडून या मठाच्या खर्चास पांच गावें इनाम मिळून दिलीं. या उत्पन्नापैकी कांही उत्पन्न पुस्तकालयाच्या खर्चाकडे तोडून दिलें होते.[३] आठव्या शतकापासून

१ युआन् च्वांग चरित्र, पान ११३.

२ ए. इं., २०, पान ४३.

३ ए. इं., १७ पान ३१०. नालंदागुणवृन्दलुब्धमनसा भक्त्या च शौद्धोदनेः। नानासद्गुणभिक्षुसंघवसतिस्तस्यां विहारः कृतः॥ पुढे देवपाल म्हणतो, "सुवर्णद्वीपाधिपमहाराजश्रीबलपुत्रदेवेन, वयं विज्ञापिताः। यथा मया श्रीनालंदायां विहारः कृतः।...इत्यादि

नालंदांतील विद्वान् भिक्षु तिबेटमध्यें धर्मप्रसारार्थ जाऊं लागले. नालंदाच्या चन्द्रगोमिन् नांवाच्या भिक्षूने हें कार्य करण्यास प्रथम सुरुवात केली. त्याच्या अनेक ग्रंथांचें तिबेटन् भाषेंत भाषांतरही झालेलें आहे. शांतरक्षित नांवाच्या दुसऱ्या एका नालंदामधील प्रख्यात भिक्षूस खि-स्रन्-देउत्सन् नांवाच्या तिबेटच्या राजाने बौद्धधर्मप्रसारार्थ इ. स. ७४२ मध्यें बहुमानपूर्वक आमंत्रण दिलें; तो आला त्या वेळीं त्याने त्याचा राजासारखा सत्कार केला, व त्याच्याकडून पहिला बौद्धमठ प्रस्थापित केला. इ. स. ७६२ मध्यें मरण येईपर्यंत शांतरक्षिताने बौद्धधर्म प्रसाराचें काम तिबेटांत केलें, व या कामामध्यें त्यास काश्मिरांत जन्मलेल्या, पण नालंदास शिक्षण घेतलेल्या, पद्मसंभव नांवाच्या भिक्षूकडून बहुमोल साहाय्य मिळालें.[१] नालंदाहून ज्या अर्थी तिबेटमध्यें धर्मप्रसारार्थ भिक्षु जात, त्या अर्थी तेथे तिबेटी भाषा शिकवण्याची व्यवस्था या सुमारास केली गेली असली पाहिजे. नालंदामध्यें दहाव्या, अकराव्या, बाराव्या शतकांमध्यें लिहिलीं गेलेलीं अनेक हस्तलिखित पुस्तकें उपलब्ध आहेत, त्यावरून या कालामध्येंही तेथे अध्ययनाध्यापनाचें कार्य पूर्वीप्रमाणें चाललें होतें असें दिसून येईल.

अकराव्या शतकापासून नवीन स्थापल्या गेलेल्या विक्रमशिला विद्यापीठाची जास्त भरभराट होऊं लागली. पाल राजांचें प्रेम त्या विद्यापीठावर अधिक होतें; नालंदाची अंतर्व्यवस्था विक्रमशिलेच्या पंडितांकडे सोपविण्यांत येऊं लागली.[२] कालचक्रयानांतील अनैतिक तांत्रिक आचारांचाही तेथे पुढे शिरकाव झाला. या कारणामुळें अकराव्या शतकापासून नालंदास थोडी उतरती कळा लागल्याशिवाय राहिली नाही.

बाराव्या शतकाच्या अखेरीस मुसलमानांच्या स्वाऱ्यांमध्यें नालंदाचा उच्छेद झाला. मुसलमान सैन्याने विहाराच्या कांही इमारती जाळल्या कांही उध्वस्त करून टाकल्या, व भिक्षूंपैकी बहुतेकांची कत्तल केली. मुसलमानी सैन्य परतल्यावर मुदितभद्र नांवाच्या राजाने इमारतींची पुन्हा डागडुजी केली होती, पण अपमान केला गेलेल्या दोन तीर्थिकांनी

१ इंडियन टीचर्स ऑफ् बुद्धिस्ट युनिव्हर्सिटीज्, पान ११६–१२१.

२ ,, ,, पान ३६.

दैवी चमत्कार करून त्या इमारती जाळून टाकल्या, असें तारानाथ म्हणतो; [१] पण दैवी चमत्कारावर विश्वास ठेवणाऱ्यांनाच त्या विधानाच्या सत्यासत्यतेची छाननी करावी असें वाटेल.

## वलभि

सुमारें इ. स. ४७५ पासून तीनशे वर्षें काठेवाडमधील वलभिनगर मैत्रक राजघराण्याची राजधानी होतें. सातव्या आठव्या शतकामध्यें त्याची भरभराट होत होती. जगांतील सर्व देशांतील मोल्यवान् जिनसा वलभीच्या बाजारांत मिळत. लक्षाधीशांची संख्या तेथे १०० वर होती. [२]

युआन् च्वांगने वलभीच्या विद्यापीठाबद्दल कशी माहिती लिहून ठेवली नाही, याचें आश्चर्य वाटतें; कारण त्या वेळी नालंदा व वलभि हीं सर्व हिंदुस्थानांत अत्यंत प्रसिद्ध विद्यापीठें होती, असें इत्सिंग म्हणतो. वलभीला १०० बौद्ध मठ होते; त्यांपैकी बऱ्याच मठांत शिक्षणाची सोय करण्यांत येई. वलभीतील विद्वान् पंडितांपैकी स्थिरमति व गुणमति या दोघांचीच नांवें आपणास आज उपलब्ध आहेत. हे भिक्षु ज्या मठांत रहात होते तो मठ गांवाबाहेर होता, व त्यामध्ये एक पुस्तकालयही होतें. या पुस्तकालयाच्या ग्रंथखरेदीचा खर्च भागविण्यास दिलेलें दान एका त्रुटित ताम्रपट्टामध्यें नोंदलेलें आहे. [३] हा गांवाबाहेरील मठ बहुतेक उच्च शिक्षणाचें केन्द्र असावा.

राजघराणें हिंदु होतें तरी त्याची या विद्यापीठावर कृपादृष्टि असे. स्थिरमतीच्या विहारास पहिल्या गुहसेन राजानें एक दान दिलें होतें. [३] पहिल्या धरसेन राजाची दुड्डा नांवाची एक आतेबहीण बौद्ध भिक्षुणी झाली होती तिनेंही एक मठ प्रस्थापित केला होता.

नालंदाप्रमाणें वलभीलाही सर्व प्रांतांतून विद्यार्थी येत, व तेथे सर्व 'संभाव्य व असंभाव्य विषयांची' चर्चा करीत. कांही विद्यार्थी १६ व्या वर्षाच्या सुमारास येत, तर कांही इतरत्र बराच अभ्यास संपवून अखेर

---

१ विद्याभूषण, ए हिस्टरी ऑफ् इंडियन लॉजिक्, पान ५१६.

२ अळतेकर, ए हिस्टरी ऑफ इंपॉर्टंट टौन्स अँड सिटीज इन् गुजरात अँड कठियावाड, पृ. ३९–४० मध्यें वलभीचा इतिहास सापडेल.

३ इं. अँ., ७, पान ७९.

अखेर वयाच्या विसाव्या वर्षाच्या सुमारास वलभीस शिक्षणक्रम संपवण्यास येत. विद्यार्थी दोन तीन वर्षें रहात, व त्यांच्याकडे नव्या मुलांच्या अध्यापनाचेंही थोडे बहुत काम सोपविण्यांत येई.[१]

वलभीमध्यें हिंदु विद्यापीठेंही होतीं. संयुक्त प्रान्तामध्यें राहणाऱ्या एका ब्राह्मणाचा मुलगा वलभीला अध्ययनास गेला होता, असें कथासरित्सागरांतील एका कथेवरून दिसून येतें.[२] जवळची बनारससारखी विद्यापीठें सोडून ज्या अर्थी या मुलास वलभीला पाठविण्यांत आलें होतें, त्या अर्थी वलभीच्या हिंदु विद्यापीठांचीही कीर्ति मोठी असली पाहिजे यांत संशय नाही. धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, जमाखर्च, वाङ्मय, वगैरे विषय या विद्यापीठांत शिकवीत असले पाहिजेत. कारण येथे शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांना पुष्कळदा सरकारी नोकऱ्या मिळत.[१] त्रिपिटकें, उपनिषदें, वगैरे ग्रंथांचाच अभ्यास केलेल्या स्नातकांचा राज्यकारभारांत फारसा उपयोग झाला नसता. वलभीच्या या भारतखंडप्रसिद्ध विद्यापीठाची आपणास इतकी अल्प व त्रुटित माहिती असावी ही फार दुर्दैवाची गोष्ट होय.

## विक्रमशिला[३]

विक्रमशिला मठविद्यापीठाची जागा निश्चयानें अद्याप माहीत झालेली नाही, पण बहुतकरून भागलपुरपासून वीस मैलावर गंगेच्या दक्षिण तीरावर पाथरघाट टेकडीवर तें वसलें असावें असें दिसतें.[४] धर्मपालराजानें प्रथम येथे मठ स्थापून त्यास गांवें इनाम देऊन १०८ भिक्षूंची जेवणाखाण्याची तरतूद केली; त्याच्या वंशजांनीही पुढें तोच क्रम सुरू ठेवला; त्यामुळें विक्रमशिला हें लवकरच प्रसिद्ध मठविद्यापीठ बनलें. या विद्यापीठाचा व तिबेटचा विशेष निकट संबंध असे; येथे अनेक तिबेटी लोक अध्ययनास येत व त्यांच्याकरितां स्वतंत्र वसतिगृह बांधलेलें होतें. तिबेटमध्यें अकराव्या शतकामध्यें ज्याने बौद्धधर्मांत सुधारणा घडवून

---

१ इत्सिंग, पान १७७.

२ अध्याय ३२; ४२–४३.

३ बोसः 'इंडियन टीचर्स ऑफ बुद्धिस्ट युनिव्हर्सिटीज'; दासः 'इंडियन पंडिट्स इन् दि लँड ऑफ स्नो' या पुस्तकांवरून येथे दिलेली माहिती घेतलेली आहे.

४ जे. ए. एस्. बी., (न्यू सीरीज) ७; पान ७.

आणली, तो दीपंकर श्रीज्ञान ऊर्फ अतीश हा विक्रमशिलेचाच मठाधिपति होता. तिबेटच्या राजाच्या अत्याग्रहामळें, वार्धक्यास न जुमानतां, तो तिबेटला गेला होता. तिबेटन भाषेमध्यें त्याच्या नांवावर खपणारे दोनशें-हूनही अधिक ग्रंथ आहेत.

विक्रमशिलेमधील विद्वत्परंपरा फार अभिनंदनीय व स्पृहणीय होती. बुद्ध, ज्ञानपाद, वैरोचन, रक्षित, जेतारि, रत्नाकर, ज्ञानश्रीमित्र, रत्नवज्र, अभयंकरगुप्त, तथागतरक्षित, वगैरे जाडे पंडित विक्रमशिलेमध्यें मठाधि-पती झाले होते. त्यांनी अनेक ग्रंथ लिहले होते; त्यांपैकी पुष्कळांची तिबेटी भाषेंत भाषांतरेंही झालीं. विक्रमशिलेचे अध्यापक असे जाडे पंडित असल्यामुळें साहजिकच तेथे फार विद्यार्थी येत; बाराव्या शतकांत तेथें ३००० भिक्षु रहात असत. तेथील पुस्तकालय फार मोठें होतें; मुसलमान विध्वंसकांनाही तें पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहिलें नाही.

मठांचा कारभार मठाधिपतीच्या हाताखालीं एक सहा भिक्षूंचें मंडळ पहात असे. भिक्षूंना दीक्षा देणें, नोकरचाकरांवर देखरेख ठेवणें, धान्य, जळण, वगैरे पुरवणें, मठांतील निरनिराळीं कामें भिक्षूंना वाटून देणें, वगैरे मठांच्या अंतर्व्यवस्थेचीं कामें या मंडळाकडे असत. अध्यापनाच्या कार्यावर देखरेख करण्याकरितां मठाधिपतीच्या हाताखालीं दुसरें एक सहा भिक्षूंचें मंडळ असे; त्याचें मुख्य काम म्हणजे प्रवेशेच्छू भिक्षूंची परीक्षा घेऊन त्यांच्या अंगीं मठांत प्रवेश करण्याची पात्रता आहे की नाही हें ठरवण्याचें असे. या भिक्षूंना 'द्वारपंडित' असें संबोधीत. कनक राजाच्या कारकीर्दींत पुढे दिलेले भिक्षु या मंडळाचे सभासद होतेः—

| | |
|---|---|
| पूर्वद्वारपंडित | आचार्य रत्नाकर शांति |
| पश्चिमद्वारपंडित | वागीश्वरकीर्ति (मूळ बनारसचा रहिवाशी) |
| उत्तरद्वारपंडित | नरोप |
| दक्षिणद्वारपंडित | प्रज्ञाकरमति |
| प्रथमान्तद्वारपंडित | रत्नवज्र ( मूळ काश्मीरचा रहिवासी ) |
| द्वितीयान्तर्द्वारपंडित | ज्ञानश्रीमित्र (गौड देशवासी) [१] |

१ विद्याभूषण, ए हिस्टरी ऑफ् इंडियन् लॉजिक् पृ. ५२०

प्रवेशेच्छू विद्यार्थ्यांस निदान तीन परीक्षकांच्या तडाक्यांतून सुटावें लागे. व्याकरण, न्यायशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय येथे मुख्यत: शिकवत असत.

इतर कोणत्याही प्राचीन विद्यापीठापे । येथील अभ्यासक्रम जास्त सुव्यवस्थित असावा असें वाटतें, कारण अभ्यासक्रमाच्या शेवटीं परीक्षा घेऊन येथे विद्यार्थ्यांना वंगाधिपाच्या हातून प्रमाणपत्रें देण्यांत येत असत. जेतारी व रत्नवज्र या भिक्षूंस अनुक्रमें महीपाल व कनक राजांचे हस्तें प्रशस्तिपत्रें मिळालीं होती. विद्वत्तेमुळें जे विद्यार्थी पुढे दिगंतकीर्ति मिळवीत, त्यांचीं नांवें कोरून ठेवून मठाच्या भिंतीवर त्यांचीं चित्रें काढण्याची येथे चाल होती. नागार्जुन व अतीश यांना हा मान देण्यांत आला होता.

इ. स. १२०३ मध्यें बख्त्यार खिलजीने विक्रमशिलेचा विध्वंस केला. विक्रमशिला टेकडीवर वसलेली असून तिच्या भोंवती तट असल्यामुळें मुसलमानांना तो एक किल्ला आहे असें वाटलें. त्यांनी जोराचा हल्ला केला व सर्व भिक्षूंची कत्तल केली. तेथील असंख्य पुस्तकें पाहून मुसलमानांना आश्चर्य वाटलें. चौकशी अंतीं आपण सर केलेलें गांव किल्ला नसून विद्यापीठ होतें असें त्यांना कळून आलें.[१]

या वेळीं शाक्यश्रीभद्र हा विक्रमशिलेचा मठाधिपति होता, तो व इतर कांहीं थोडे भिक्षु कत्तलीतून बचावले; ते पुढे तिबेटकडे निघून गेले. अशा तऱ्हेने या विद्यापीठाचा अंत झाला.

## आणखी कांही मठ-विद्यापीठें

नालंदा, वलभि व विक्रमशिला या व्यतिरिक्त इतर पुष्कळ बौद्ध मठांतही अध्यापनाचें कार्य चालू असे. संघांत प्रविष्ट केल्यावर प्रत्येक भिक्षूला दहा वर्षें कोणा तरी उपाध्यायाच्या हाताखालीं शिष्य म्हणून रहावें लागे; या वेळीं त्यास ध्यानधारणादिकांच्या अभ्यासाबरोबर पाली व संस्कृत या भाषांचें, व त्रिपोटकें, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र वगैरे विषयांचेंही अध्ययन करावें लागे. प्रथम प्रथम नवप्रविष्ट भिक्षूनाच शिकविण्यांत येई, पण मतप्रसाराच्या दृष्टीने समाजांतील सर्व मुलांचें

---

१ रॅव्हर्टी, तबाखत-इ-नासिरी, भा. १, पृ. ५५२

शिक्षण आपल्या हातीं घेणें इष्ट आहे असें दिसून आल्यावर इतरांनाही भिक्षूंच्या बरोबर शिकवण्यांत येऊं लागलें. पांचव्या शतकाच्या सुमारास ही प्रथा चोहोकडे सुरू होती.

यूरोपमध्येंही सहाव्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत ख्रिस्ती मठांकडूनच सर्व शिक्षणकार्य होत असे. ख्रिस्ती भिक्षूंना वाचण्यास येणें आवश्यक असे, म्हणून नवप्रविष्टांना शिकविण्याकरितां मठांत शाळा काढाव्या लागल्या. दररोज आठतास तरी भिक्षूंनी काम केलें पाहिजे असा नियम असे, व पुस्तकें फार दुर्मिळ असत, म्हणून पुस्तकांच्या प्रती करण्याचें काम मठांतील भिक्षूंना सांगण्यांत येऊं लागलें; जस्टिनियन् बादशहानें इ. स. ५२९ मध्यें ख्रिस्तेतरधर्मीय सर्व शाळा एक फर्मान काढून बंद करून टाकल्या; त्यामुळें मठ हेच तेवढें शिक्षणकेन्द्रें म्हणून राहिले. त्यांच्या शिवाय इतर कोठेंही शिक्षण मिळत नसे, संशोधनाचेंही कार्य फक्त तेथेंच होई, पुस्तकालयेंही इतरत्र नसत, एखाद्या ग्रंथाची नक्कल पाहिजे असल्यास मठांचाच आश्रय करावा लागे. ११व्या शतकामध्यें मठाबाहेर शाळा सुरू झाल्या तरी देखील तेराव्या शतकापर्यंत अभ्यासक्रम जुन्या धार्मिक स्वरूपाचाच असे.[१]

युआन् च्वांगच्या चरित्रावरून व प्रवासवृत्तावरून आणखी कांही मठविद्यापीठांची माहिती मिळते. काश्मीरच्या राजधानीजवळ जो जयेन्द्रमठ होता तेथे एक महत्वाचें शिक्षणकेन्द्र होते. युआन् च्वांगच्या आगमनाच्या वेळीं तेथील विद्वान् मठपति सकाळीं कोषशास्त्र, दुपारीं न्यायानुसारशास्त्र व रात्री हेतुविद्याशास्त्र शिकवीत असे. त्याचीं प्रवचनें ऐकण्यास काश्मीरांतील सर्व विद्वान लोक येत असत. युआन् च्वांगने येथें दोन वर्षे अध्ययन करण्यांत घालविलीं. मठामधील पुस्तकालयही मोठें होतें. आपणास जरूर असलेल्या ग्रंथांच्या नकला करून घेण्यास युआन् च्वांगने वीस कारकून नेमले होते, व ते दोन वर्षे त्या कामांत गुंतले होते. जयेन्द्रमठ फार प्रसिद्ध विद्यापीठ असलें पाहिजे यांत संशय नाही.

---

१ मन्रो, ए टेक्स्ट् बुक् ऑफ् दी हिस्टरी ऑफ् एज्युकेशन् पृष्ठें २५५–९१.

२ बील, युआन् च्वांग चरित्र, पान ६९–७०.

पंजाबमधील चिनपति येथील मठही जयेन्द्रमठाच्या तोडीचें शिक्षण-केन्द्र होतें. तेथील मठपति विनीतप्रभ हा जाडा पंडित होता, त्यानें पंचस्कंधशास्त्र व विद्यामात्रसिद्धित्रिदशशास्त्र यावर उत्कृष्ट टीका लिहिल्या होत्या. युआन् च्वांग या मठांत चौदा महिने अध्ययन करीत राहिला होता.[१]

युआन् च्वांग हा जालंदर मठामध्यें प्रकरणपदविभाषाशास्त्राचें अध्ययन करण्यास चार महिने, मतिपुर मठामध्यें तत्वसत्यशास्त्र व अभिधर्मज्ञानप्रस्थानशास्त्र यांचा अभ्यास करण्यास सहा महिने, कनोजमधील भद्रविहार मठामध्यें धर्मविभाषाव्याकरणाचें अवलोकन करण्यास तीन महिने, हिरण्य (?) देशांतील एका मठामध्यें विभाषा, न्यायानुशासन वगैरे शास्त्रें शिकण्यास एक वर्ष, व आंध्रदेशांतील अमरावती मठामध्यें मूलाभिधर्म व इतर कांही शास्त्रें यांचें आलोडन करण्यास कित्येक महिनें राहिला होता. हे सर्व मठ प्रसिद्ध विद्याकेन्द्रें असले पाहिजेत हें उघड आहे. बाराव्या शतकांत रामपाल राजानें स्थापलेला जगदल्लविहार व ओदन्तपुरी येथील मठ हेही विद्यादानाची जुनी परंपरा मध्ययुगांत पुढे चालवीत होते. सर्व मठ कांही याप्रमाणें विद्याभ्यासाबद्दल प्रसिद्ध नसतील हें खरें, तथापि बौद्ध धर्माच्या चलतीच्या काळांत शेकडा दहा मठ तरी हल्लींच्या इंटरमीजियेट कॉलेजच्या तोडीचीं शिक्षणकेन्द्रें असावींत असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाही.

## देवालयस्थ विद्यापीठें

मध्ययुगामध्यें, म्हणजे सुमारें ४०० पासून ते १२०० पर्यंत, हिंदु देवालयें हीं हिंदु संस्कृतीचीं केन्द्रें होतीं. धार्मिक उत्सव तेथे होत; गोरगरिबांकरितां घातलेलीं सत्रें तेथे चालत, संस्कृति टिकवण्यास आवश्यक अशीं कथाकीर्तनें तेथेच करीत; गांवांतील कज्जांचा निवाडा देवालयाच्या मंडपांत होई; गांवाला दुष्काळादिकामुळें आर्थिक मदत लागली, तर देवालयाच्या खजिन्यांतून सवलतीनें कर्ज मिळे; गांवांतील उत्तम बाग म्हणजे देवळाजवळची असे. स्वाभाविकपणें शिक्षणाचेंही कार्य देवस्थाना-

---

१ युवान् च्वांग चरित्र, पृष्ठ ७६.

२ ,, ,, पृष्ठें ७७, ८१, ८४, १२७ व १३७.

च्या मार्फत होऊं लागलें. दहाव्या शतकापासून दक्षिण हिंदुस्थानांतील देवालयें शिक्षणकार्य करीत होतीं याबद्दल कोरीव लेखामध्यें भरपूर पुरावा मिळतो, पण त्याही पूर्वी म्हणजे सहाव्या सातव्या शतकापासून नालंदादि बौद्ध मठांप्रमाणें हिंदु विद्यालयांत चोहोकडे शिक्षणकार्य हाती घेण्यांत येऊ लागलें असावें असें वाटतें. याबद्दलचा पुरावा पुढे मिळेल असा प्रस्तुत लेखकास विश्वास आहे.

## सालोट्गी[1] देवालय-विद्यालय

दहाव्या व अकराव्या शतकामध्यें विजापूर जिल्ह्यांत सालोट्गी गांवामध्यें एक प्रसिद्ध विद्यालय होतें. राष्ट्रकूट घराण्यांतील तिसऱ्या कृष्ण राजाचा नारायण नांवाचा एक प्रधान होता. त्याने इ. स. ९४५ मध्यें या गांवांतील त्रयीं पुरुषाच्या देवालयास लागून एक मोठी इमारत बांधली होती, त्यामध्यें हें विद्यालय भरत असे. विद्यालयामध्यें अनेक देशांतील (नानादेशसमुद्भवाः) विद्यार्थी अध्ययन करीत. त्यांना राहण्या करितां सत्तावीस घरें घेतलीं होती. विद्यार्थ्यांना शिक्षण व जेवण फुकट मिळे. भोजन खर्चाकरितां ५०० निवर्तन (२००० एकर) जमीन विद्यालयास देणगी म्हणून मिळाली होती. दिवाबत्तीच्या खर्चाकरितां आणखी एक साठ एकराची जमीन लावून दिली होती. विद्यालयामध्यें किती मुलें शिकत असत, याची माहिती शिलालेखामध्यें मिळत नाही ही खेदाची गोष्ट आहे; पण एकंदर गोष्टींचा विचार करितां येथे २०० तरी विद्यार्थ्यांची शिक्षण-भोजनाची मोफत सोय होत असावी असें दिसतें.

विद्यालयाच्या मुख्याध्यापकास २०० एकर जमीन वृत्तीकरितां दिलेली होती. इतर अध्यापकांना काय मिळत असे, याबद्दल माहिती मिळत नाही.

गांवकरी लोक हे विद्यालयास मनोभावाने मदत करीत. लग्नाच्या वेळीं पांच, मुंजीच्या वेळीं अडीच व शेंडी राखण्याच्या वेळीं सव्वा

१ या गांवाचें पूर्वीचें नांव पाविट्टगे हें होतें, तेथे पुष्कळ वर्षें शाळा चालू होती म्हणून त्यास शाला-पाविट्टगें म्हणूं लागले; त्याचा अपभ्रंश होऊन हल्लींचें सालोटगी हें नांव बनलें आहे.

पण[1] प्रत्येक गांवकऱ्याने देणगी म्हणून द्यावे, व ब्राह्मण-भोजनाच्या प्रसंगीं शक्य तितके शिक्षक व विद्यार्थी जेवावयास बोलवावे, असा त्यांनी आपसांत करार केला होता. नारायण प्रधानाने बांधलेली शाळेची इमारत अकराव्या शतकांत जेव्हा पडून गेली, तेव्हा गांवांतील एका इनामदारानें ती पुन्हा बांधून दिली.

या विद्यालयामध्यें काय काय विषय शिकवत असत याबद्दल माहिती मिळत नाही. बहुतेक तें वेदविद्यालय असावें असें वाटतें.

## एन्नायिरम् येथील देवालय–विद्यालय[2]

अकराव्या शतकामध्यें दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील एन्नायिरम् गांवीं एक मोठें संस्कृत विद्यालय होतें. त्याचा खर्च चालवण्यास ४५ वेली, म्हणजे सुमारें ३०० एकर भाताची जमीन, गांवकऱ्यांकडून देणगी म्हणून मिळालेली होती, त्यामुळे ३४० विद्यार्थींना विद्यालयामध्यें फुकट शिक्षण व भोजन मिळत असे. ऋग्वेद व कृष्ण यजुर्वेद यांच्या अध्ययनाकरितां प्रत्येकीं ७५, छांदोग्य सामवेद, तालवचार सामवेद व शुक्ल यजुर्वेद यांच्या अध्ययनाकरितां प्रत्येकीं २०, अथर्व वेद, बोधायन गृह्यसूत्र व वेदान्त यांच्या अध्ययनाकरितां प्रत्येकी १०, रूपावताराकरितां ४०, व्याकरणाकरितां २५, व प्रभाकर मीमांसेकरितां ३५ असे एकूण ३४० विद्यार्थी विद्यालयामध्यें घेत. ऋग्वेद व कृष्ण यजुर्वेद शिकवण्यास तीन, मीमांसेकरितां दोन, व इतर विषयांकरितां प्रत्येकीं एक असे अध्यापक नेमले होते. सरासरीने प्रत्येक अध्यापकामागे बावीस विद्यार्थी पडत; त्यामुळें प्रत्येक विद्यार्थ्याकडे वैयक्तिक लक्ष देणें अध्यापकांना शक्य होई. हल्लीसारखे मोठाले वर्ग या विद्यालयामध्यें नव्हते.

भोजनखर्चाकरितां या विद्यालयमध्यें प्रत्येक विद्यार्थ्यास सहा नाळी[3] भात मिळत असे. चमचमीत मेजवानीला पानामागे खर्च आठनाळी भाताच्या किमतीइतका या वेळीं येत असे; तेव्हा प्रत्येक विद्यार्थ्यास

---

१ पण हें एक जुने नाणें होतें; चांदीचा पण पावलीच्या सरासरी दीडपट असे तोच येथे अभिप्रेत असावा.

२ सौ.इं. ए. रि., १९१८ पृ. १४५, १९१७सालचा ३३३ नंबरचा कोरीव लेख

३ नाळी भात किंवा तांदूळ हे वजनी तीन शेर (२४० भार) भरत.

साध्या जेवणास जरूर तितकें धान्य मोफत मिळे असें दिसून येईल. मीमांसा व वेदान्त या विषयांच्या विद्यार्थ्यांस दहा नाळीभात मिळत असे. हे विषय अवघड म्हणून कदाचित् या विद्यार्थ्यांस अधिक धान्य मिळत असावें. हेंही शक्य आहे, की या विषयाचे विद्यार्थी प्रौढ किंवा विवाहित असल्यामुळें त्यांच्या कौटुंबिक खर्चास थोडी बहुत मदत म्हणून त्यांना चार नाळी धान्य अधिक देत असावेत. याशिवाय प्रत्येक विद्यार्थ्यास अर्धा कळंजु म्हणजे सुमारें चवली भार सोनें (सरासरी दोन रुपये किमतीचें) दरसाल मिळत असे. हें बहुतेक कपडेलत्त्याच्या खर्चाकरितां असावें.

अध्यापकांच्या वेतनासंबंधीही या कोरीव लेखांत महत्त्वाची माहिती मिळते. अध्यापकांना सामान्यत: रोज १६ नाळी भात मिळत असे; वेदान्ताच्या शिक्षकास २४ नाळी अधिक मिळत. या वेळीं साध्या जेवणाचा रोजचा खर्च १नाळी भाताच्या किंमतीइतका असे; तेव्हा प्रत्येक अध्यापकास सोळा माणसें पोसतां येतील इतकें वेतन मिळे. कुटुंबामध्यें सरासरीने पांच माणसें असतात; तेव्हा प्रत्येक अध्यापकास कुटुंबाच्या अन्नवस्त्रास जो खर्च लागेल त्याच्या दुपटीइतकाच पगार मिळत असे हें दिसून येईल. अध्यापनाचें कार्य करण्याऱ्या ब्राह्मणांचे अत्यन्त दारिद्र्यामुळें हालही होत नसत, किंवा ऐषआरामामध्यें राहण्याइतकें त्यांना विपुल द्रव्यही मिळत नसे. मध्यम स्थितीच्या गरिबीनें राहणाऱ्या कुटुंबास नित्य, नैमित्तिक व आकस्मिक खर्चाकरितां जितकें द्रव्य लागे, तेवढेंच त्यांना समाज देत असे, व त्यावर ते संतुष्ट असत.

दर अध्यायाला एक कळंजु (म्हणजे सुमारें ½तोळा) सोनें या हिशेबाने व्याकरणाध्यापकाला वेतन मिळे. त्यालाच तेवढा कामाच्या मानाने व रोख पगार का मिळत असे, हें समजण्यास कांही मार्ग नाही.

एन्नायिरम् विद्यालयामध्यें तेरा अध्यापक एका संस्थेचे सदस्य म्हणून काम करीत, प्रत्येकाकडे निरनिराळे विषय नेमून दिलेले होते, व प्रत्येक विषयांत घ्यावयाच्या मुलांची संख्याही चालकांनी ठरवलेली होती. तेव्हा हें विद्यालय आधुनिक काळांतल्या सुव्यवस्थित शिक्षणसंस्थेप्रमाणें चालवलें होतें हें दिसून येईल. या विद्यालयांत वर्ग केव्हा भरत असत, सुट्या केव्हा व किती असत, शिक्षणक्रम किती वर्षांचा असे, वगैरे बद्दल जर माहिती उपलब्ध असती तर फार बहारीची गोष्ट झाली असती.

## तिरुमुक्कुडुल येथील देवालय–विद्यालय[1]

चिंगलपुर जिल्ह्यांतील तिरुमुक्कुडुल गांवांतील वेंकटेशाचें देवालय हें एक अकराव्या शतकामध्यें अपूर्व संस्था होती. या देवालयास लागून व त्याच्या विद्यमानें एक विद्यालय, एक छात्रालय, व एक रुग्णालय अशा तीन लोकोपयोगी संस्था चालवण्यांत येत असत. येथे ६० विद्यार्थ्यांची शिक्षणाची व भोजनाची सोय केलेली होती. एन्नायिरम्च्या मानानें हें विद्यालय लहान होतें. ऋग्वेद, यजुर्वेद व पंचरात्र मत याकरितां प्रत्येकी दहा, व्याकरणाकरितां वीस, शैवागमाकरितां तीन व वानप्रस्थ–संन्यासाश्रमी मोक्षमार्गी लोकांकरितां सात अशा तऱ्हेनें साठ जागांची वाटणी करण्यांत येई. छात्रालयामध्यें विद्यार्थ्यांना निजण्यास चटया, मिळत व शनिवारी न्हाण्याकरितां त्यांना तेल देण्यांत येत असे.

या विद्यालयांत व्याकरणाध्यापला सालिना १२० कळम् भात[2] व १० कासु सोनें असें वेतन मिळे. हा पगार एन्नयिरम् विद्यालयांत मिळणाऱ्या पगाराच्या सरासरी निम्या इतका होतो. तेव्हा गरिबीनें कुटुंबपोषण करण्यास अत्यंत आवश्यक जेवढें असे, तेवढेंच या विद्यालयांत वेतन मिळे असें दिसून येईल वेदाध्यापकास तर तेथें सालिना अवघे ६० कळम् भात व चार सुवर्ण कासु मिळत. रुग्णालयामध्यें रानांतून औषधें आणण्यास व कुटण्यास जो गडी ठेवला होता, त्यासही जवळ जवळ हाच पगार म्हणजे ६० कळम् भात व २ सुवर्ण कासु मिळत. वेदाध्यापकास गड्याइतका, व्याकरणाध्यापकाच्या एकतृतीयांश, पगार असणें संभवनीय नाही. थोडा वेळ शिकवण्याचें काम या अध्यापकाकडे असून त्याचा मुख्य धंदा भिक्षुकीचा असावा असें दिसतें.

## तिरुवोरियुर येथील देवालय–विद्यालय[3]

चिंगलपुर जिल्ह्यातील तिरुवोरियुर गांवी तेराव्या शतकांत एक

---

१ एक कळम् म्हणजे ८० तोळ्यांचे वजनी ३६ शेर भरतात.

२ ए. इं. २१, पान २२०.

३ सौ. इ. ए. रि. १९१२; लेख नं. २०१. या कोरीव लेखाचा त्रोटक गोषवाराच प्रसिद्ध केला असल्यामुळें या विद्यालयाची भरपूर माहिती मिळत नाही.

मोठें व्याकरण विद्यालय होतें. त्या गांवामध्यें एक शिवाचें देवालय होतें; भगवान् शंकराने पाणिनीला चौदा दिवस चौदा सूत्रें जीं शिकवलीं तीं याच देवालयामध्यें, असा तेथील गांवकऱ्यांचा दृढ समज होता, म्हणून त्यांनी तेथे एक मोठें व्याकरण महाविद्यालय चालविलें होतें. या विद्यालयाच्या खर्चाकरितां ६० वेली म्हणजे ३००–३५० एकर जमीन देणगी म्हणून मिळाली होती. एन्नायिरम् विद्यालयाला ४५ वेलीचीच देणगी होती, व तेथे ३४० विद्यार्थ्यांची सोय करण्यांत आली होती; तेव्हा तिरुवोरियुर विद्यालयांत निदान ४५० विद्यार्थ्यांना तरी मोफत शिक्षण व भोजन मिळत असावें असें वाटतें. शिक्षकांची संख्या वीस पंचवीस पर्यंत असावी. चौदाव्या शतकामध्येंही हें विद्यालय चालू होतें; त्या वेळीं त्याच्या मदतीकरितां कांही कर त्याकडे कसे लावून देण्यांत आले होते, हें त्या शतकांतील एका कोरीव लेखावरून कळून येतें.

## मल्कापुरम् येथील देवालय-विद्यालय[१]

गुंतूर जिल्ह्यांतील मल्कापुरम् या गांवीं सापडलेल्या इ. स. १२६८ च्या एका कोरीव लेखावरून तेथेंही तिरुमुक्कुडूलाप्रमाणें एका देवस्थानातर्फे एक विद्यालय, छात्रालय, व रुग्णालय ही चालवली होती असें दिसते. या कोरीव लेखाचा अजून नुसता गोषवाराच प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून विद्यालयाची संपूर्ण कल्पना येत नाही. या विद्यालयामध्यें आठ शिक्षक होते, त्यांपैकी तिघाकडे वेदाध्यापनाचें काम असे, व बाकीचे पाच व्याकरण, साहित्य, न्याय, आगम, वगैरे विषय शिकवीत प्रत्येक अध्यापकाच्या हाताखाली सामान्यत: २० मुलें असत; तेव्हा या विद्यालयांत सुमारें १५० मुलें असावीत असे वाटतें.

वेतनाऐवजी प्रत्येक शिक्षकास २ 'पट्टी' जमीन दिलेली होती देवळाचा जो सुतार होता त्यास एक 'पट्टी' जमीन दिलेली होती संस्कृताध्यापकाचा पगार सुताराच्या दुप्पट होता असें दिसतें. येथेंही अध्यापकास मध्यम स्थितींतील ब्राह्मणकुटुंबाच्या खर्चास जरूर तेवढाच पगा

---

१ सौ. इं. ए. रि. १९१७ पान १२२–१२४

मिळत असे, हें यावरून दिसून येईल. मुख्याध्यापकास सालिना १०० निष्क मिळत; पण निष्काची या वेळची व या प्रांतांतील नक्की किंमत माहीत नसल्यामुळें हा पगार किती होता याची नीटशी कल्पना येत नाही.

## इतर देवालयस्थ विद्यालयें

वरील देवालय-विद्यालयांसारखीं आणखी वरींच विद्यालयें असावींत असें कोरीव लेखामध्यें सापडणाऱ्या कांही उल्लेखांवरून दिसून येतें. दहाव्या शतकांत धारवाड जिल्ह्यांतील हेब्बाळ गांवीं भुजब्बेश्वर देवालयांत एक मठ होता, या मठास इ. स. ९७५ मध्यें २०० एकर जमिनीची एक देणगी मिळाली होती, व त्यामुळें तेथे विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण व भोजन मिळण्याची सोय करण्यांत आली होती.[१] इ. स. १०६४ मध्यें चितळदुर्ग जिल्ह्यांतील जटिंग रामेश्वर येथील देवालयास देवपूजेच्या व शिक्षणाच्या खर्चाकरितां एक इनाम मिळालें होतें.[२] विजापुरला योगेश्वर पंडित नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण मीमांसा विद्यालय चालवीत असे; त्यास विद्यार्थ्यांस फुकट भोजन घालण्याकरितां व देवपूजेचा खर्च चालविण्याकरितां इ. स. १०७५ सालीं एका गृहस्थानें १२०० एकर जमीन दान केली होती.[३] इ. स. १०८३ मध्यें कर्नाटकमधील ताबरगेरे गांवीं एका देवालयामध्यें विद्यार्थ्यांना भोजन घालणारें एक सत्र होतें.[४] बाराव्या शतकामध्यें विजापूर जिल्ह्यांतील मणगोली गांवीं एका देवालयांत एक व्याकरण विद्यालय होतें. कौमार व्याकरण शिकवण्याबद्दल तेथील अध्यापकास वीस एकर जमीन इनाम देण्यांत आली होती.[५] या सुमारास शिमोगा जिल्ह्यांतील बेळगांवें गांवांतील दक्षिणेश्वर देवालयांत विद्यार्थ्यांना फुकट जेवण मिळत असे.[६] इ. स. ११५८ मध्यें शिकारपुर जिल्ह्यांतील तालगुंड गांवीं प्राणेश्वर देवालयामध्यें ४८ विद्यार्थ्यांना फुकट

१ ए. इं., ४, पान ३५५
२ ,, ,, पान २१४
३ इं. अॅ., १०, पान १२९–३१
४ ,, ५ पान ३४४
५ ए. इं., ५ पान २२
६ ए. क., १ नं. ४५

जेवण घालून त्यांना ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, प्रभाकरमीमांसा, वेदांत, भाषाशास्त्र व कानडी हे विषय शिकवण्याची सोय करण्यांत आली होती. दोन आचारी विद्यार्थ्यांचें जेवण तयार करण्याकरितां येथें नेमलेले होते.[१] तंजावर जिल्ह्यांतील पुन्नवयिल नांवाच्या गांवांत एका देवालयामध्यें एक व्याकरण विद्यालय होतें. या विद्यालयाच्या खर्चाकरितां ६० वेली (म्हणजे एन्नायिरम् विद्यालयापेक्षा १५ वेली जास्त) जमीन मिळाली होती;[२] तेव्हा तेथे बहुतकरून ४५० विद्यार्थ्यांना मोफत भोजन व शिक्षण मिळत असावें. १९१६ सालीं नक्कल केलेले ६०४, ६६७, ६७१ व ६९५ नंबरचे कोरीव लेख अध्यापकांच्या पगाराची व विद्यार्थ्यांच्या भोजन-खर्चाची निरनिराळ्या ठिकाणीं कशी तरतूद करण्यांत आली होती त्याची माहिती देतात. यापैकी शेवटच्या कोरीव लेखांत सरस्वतीभवनाकरितां म्हणजे ग्रंथालयाकरितां दिलेल्या देणगीचा उल्लेख सापडतो.

वरील उदाहरणांवरून या काळीं दक्षिण हिंदुस्थानांत पुष्कळच देवालयांमध्यें संस्कृताध्यापनाची सोय करण्यांत येत असे, हें दिसून येईल. अठराव्या शतकांत सुद्धा दक्षिण हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व मोठीं देवस्थानें संस्कृत विद्यालयें चालवीत; त्यामुळें सर्व दक्षिण देश असल्या विद्यालयांनी गजबजून गेला होता.[३] मुसलमानपूर्व कालामध्यें तर याहीपेक्षा उच्च-शिक्षणाची जास्त समाधानकारक स्थिति असली पाहिजे, हें निर्विवाद आहे.

वर दिलेलीं देवालयस्थ विद्यालयांचीं सर्व उदाहरणें दक्षिण हिंदु-स्थानांतीलच आहेत हें खरें; पण उत्तर हिंदुस्थानांत तशीं विद्यालयें नसत असें म्हणणें योग्य होणार नाही. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व जुनीं देवालयें मुसलमानी स्वाऱ्यांमुळें उध्वस्त होऊन गेलेलीं आहेत; त्यामुळें त्यांवरील जुने कोरीव लेख मिळत नाहीत. दक्षिण हिंदुस्थानांत देवाल-यास मिळालेल्या सर्व देणग्यांची संपूर्ण माहिती देवालयाच्या भिंतीवर कोरून ठेवण्याची पद्धत असे; उत्तर हिंदुस्थानांत ती नव्हती असें दिसतें. हिंदुस्थानांतील प्रसिद्ध देवस्थानास जीं मोठमोठीं उत्पन्नें मिळालीं आहेत त्यासंबंधी जर सर्व कागदपत्र किंवा कोरीव लेख उपलब्ध झाले, तर

---

१ ए. क. ७, शिकारपुर नं. १८५.

२ मौ. इं. ए. रि. १९१३ पृ. १०९-११०.

३ एज्युकेशन कमिशन, १८८२, मद्रास कमिटीचा रिपोर्ट, पान १, टीप.

या उत्पन्नापैकी कांही भाग संस्कृत विद्यालयें चालविण्याकरितां खर्च करण्यांत यावा अशी दात्यांची इच्छा होती, हें स्पष्ट दिसून येईल. देवाळयांच्या अफाट उत्पन्नापैकी कांही भाग शिक्षणप्रसारार्थ घ्यावा की नाही, या प्रश्नाचा विचार करितांना वरील गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

## अग्रहार विद्यालयें

पूर्वीच्या काळी राजे लोक शे पन्नास विद्वान् ब्राह्मणांचें एकादें गांव वसवून त्यांच्या निर्वाहाकरितां तेथील जमिनी त्यांना इनाम देत. अशा गांवांना अग्रहार गांवें म्हणतात. ताम्रपट्टावरून अनेक अग्रहार गांवांची माहिती मिळते. तिजवरून अग्रहार गांवांतील ब्राह्मण हे स्वतः विद्वान् असून निर्वाहाबद्दलची सर्व काळजी नाहीशी झाल्यामुळें अध्ययन अध्यापनाचें कर्तव्य आनंदानें व तत्परतेनें बजावीत असें दिसून येतें.

कर्नाटकांत कलास येथे कोरलेल्या एका दहाव्या शतकांतील लेखावरून अग्रहार गांवें हीं कशीं विद्येचीं केन्द्रें असत, तें चांगलें दिसून येतें. प्रस्तुत गांव राष्ट्रकूट सरकारनें २०० विद्वान् ब्राह्मणांस इनाम दिलें होतें.[१] या दोनशे पैकी प्रत्येक ब्राह्मण वेद, व्याकरण, पुराण, न्याय, नीतिशास्त्र, साहित्य, टीकालेखन यांमध्यें निष्णात होता. गांवामध्यें एक सत्र व एक विद्यालय होतें. सत्रामध्यें बहुतकरून इतरांबरोबर विद्यार्थ्यांनाही फुकट जेवण मिळत असावें. प्रत्येक अग्रहार गांवीं विद्यार्थ्यांच्याकरितां फुकट सत्र जरी नसलें, तरी मोफत संस्कृतचें शिक्षण देणारें विद्यालय तरी असेच.

म्हैसूर संस्थानांतील हसन जिल्ह्यांतील अर्सिकेरें हें गांव पूर्वी ब्राह्मणांना अग्रहार दिलेलें होतें. त्या वेळीं त्याचें सर्वज्ञपुर असें अन्वर्थक नांव होतें. येथे सापडलेल्या एका कोरीव लेखावरून[२] असें दिसतें की 'गांवांतील कांही भागामध्यें वेदशास्त्रें व षड्दर्शनें यांचें अध्ययन अध्यापन चाले; कांही ब्राह्मण वेदपठनामध्यें तर कांही शास्त्रश्रवणामध्यें आपला काळ घालवीत, कांही न्यायशास्त्राची चर्चा करीत, तर कांही धर्मशास्त्रांच्या अर्थांचें विवरण करीत, तर कांही काव्य व नाटकें यांचा व्यासंग

---

१ ए. इं., १३, पान ३२७.

२ ए. क., ५, पान १४४.

करीत. सर्वज्ञपुरांतील सर्व ब्राह्मण धर्माने वागत व अध्ययन-अध्यापनामध्यें गर्क असत.

कळास व सर्वज्ञ पुर या दोन अग्रहारांबद्दल जी माहिती मिळते, त्यावरून असें अनुमान काढण्यास कांही हरकत नाही की सर्व अग्रहार गांवें हीं संस्कृत विद्येचीं केन्द्रें असत व तेथे वेद, वेदान्त, षड्दर्शनें, पुराणें, धर्मशास्त्र, काव्य, नाटकें, तर्कशास्त्र वगैरे विषय विद्यार्थ्यांना फुकट शिकवीत. विद्यार्थ्यांना फुकट जेवावयास घालणें ब्राह्मणांच्या शक्तीच्या बाहेरचें असे, पण प्रयत्न करून देणग्या मिळवून कांही ठिकाणीं तरी ब्राह्मण लोक विद्यार्थ्यांकरितां फुकट सत्रेंही चालवीत, हें कळासच्या वर दिलेल्या उदाहरणावरून दिसून येईल.

शेवटीं आता बंगाल बहारमधील अजून टिकून असलेल्या संस्कृत पाठशालांचा उल्लेख करणें जरूर आहे. या पाठशालांना 'टोल' म्हणतात. 'टोल' हा एक अग्रहाराचाच प्रकार आहे. राजाकडून अगर समाजाकडून मिळालेल्या जमिनीच्या उत्पन्नावरच 'टोल'मध्यें शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचा व शिकणाऱ्या अध्यापकांचा निर्वाह चालतो. कायमधाऱ्याच्या मदतीनें जेव्हा अठराव्या शतकाच्या अखेरीस बंगालमधील जमीनदारांची स्थिति सुधारली, तेव्हा त्यांनी 'टोल' शालांना अधिक इनामें दिलीं, त्यामुळें त्यांची जास्त भरभराट झाली. जेथे अशी मोठीं इनामें मिळालेलीं नसत, तरी तेथे या पाठशालांचे शिक्षक स्वतः खटपट करून वर्गणी जमवून विद्यार्थ्यांच्या अन्नवस्त्राची सोय करीत. या 'टोल' पाठशाला कच्च्या मातीने बांधलेल्या व गवताने आच्छादलेल्या झोपड्यांत भरतात, विद्यार्थ्यांची राहण्याची सोय शाळेला लागूनच दुसऱ्या लहान झोपड्यांत केलेली असते. प्रत्येक पाठशाळेंत सरासरी २५ विद्यार्थी अध्ययन करतात. अशा तऱ्हेच्या अनेक पाठशाला अजून उत्तर हिंदुस्थानांत जीव धरून आहेत, व तेथे विद्यार्थ्यांना अद्याप मोफत शिक्षण मिळतें. मोफत शिक्षण देण्याची पद्धति अजूनही जुन्या पंडित घराण्यांमध्यें व काशी, पैठण, वाई, वगैरे सारख्या क्षेत्रांमध्यें चालू आहे हें येथे नमूद करणें जरूर आहे.

हल्लींच्या जिल्ह्याएवढ्या प्रदेशांत पूर्वी एखाद दुसरें तरी अग्रहार गांव किंवा मोठें देवस्थान असे, व तेथे उच्च संस्कृत शिक्षणाची

मोफत सोय होई. विद्यार्थ्यांच्या मोफत भोजनाचीही सोय अनेक विद्यालयांत केलेली असे. बहुतेक ठिकाणी शिक्षण मोफत असे; निदान सक्तीने तरी फी कोठेच वसूल केली जात नसे. फुकट भोजनाचें छात्रालय नसलें तरी गरीब विद्यार्थ्यांना गुरूच्या घरीं काम केल्यास फुकट जेवण मिळे; तेंही शक्य नसलें तर मधुकरी मागून निर्वाह करून गरीबांतल्या गरीब विद्यार्थ्यासही आपला शिक्षणक्रम संपवितां येई. या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे एकंदरींत उच्च शिक्षणाची सोय प्राचीन हिंदुस्थानांत हल्लींपेक्षा बरीच समाधानकारक होती हें कबूल करावें लागेल.

---

## प्रकरण नववें

# शिक्षणकार्य आणि समाज व राजसत्ता

समाज व राजसत्ता यांची शिक्षणकार्याकडे कोणत्या प्रकारची दृष्टी असे, त्यांची शिक्षणकार्यास किती सहानुभूति मिळे, त्यांची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष मदत कोणत्या प्रकारची होत असे, यांचें या प्रकरणांत विवेचन करण्याचें योजिलें आहे.

फार प्राचीन कालापासून शिक्षणाचें महत्त्व हिंदु समाजाने चांगलें ओळखलेलें आहे. वाङमय व विद्या या दोन्ही दैवी देणग्या आहेत; देव विद्वानांशींच सख्य करितात; हात, पाय, वगैरे अवयव सर्वांना सारखेच असतात, बुद्धीच्या तीक्ष्णत्वावर एका मनुष्याचें दुसऱ्यावरील श्रेष्ठत्व अवलंबून असतें; एखादी गोष्ट कंठगत करणें म्हणजे विद्या नव्हे, ती समजण्याची पात्रताही जरूर आहे; ज्याला अर्थ समजतो त्यावरच सरस्वतीचा वरदहस्त असतो, इतर सर्व भारवाहक पशू होत; अशा तऱ्हेचीं वचनें ऋग्वेदांत आढळतात.[१] त्यावरून अतिप्राचीन काळीं सुद्धा आर्य लोक विद्येस कसें महत्त्व देत तें दिसून येतें.

---

१ यज्ञेन वाचः पदवीयममायॅस्तानन्वविन्दन्नृषिषु प्रविष्टाम्। १०. ७१. ३.
उत त्वं सख्ये स्थिरपीतमाहुर्नैनं जिन्वन्त्यपि वाजिनेषु ॥ ,, ,, ५.
अक्षण्वन्तः कर्णवन्तः सखायो मनोजवेष्वसमा बभूवुः ॥ ,, ,, ७.
उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्।

[पुढील पान पहा.]

उत्तरसंहिता कालामध्यें तर याहीपेक्षा मुक्तकंठाने ज्ञानाची महती गाइलेली आहे. इन्द्राला देवांमध्यें जे श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे, तें ब्रह्मचर्याने होय असें अथर्ववेद म्हणतो.[१] तैत्तिरीय संहितेमध्यें तीन ऋणांचीं कल्पना पुरस्कृत केलेली आढळते, त्यांपैकी ऋषिऋण हे अध्ययनानेच फेडतां येईल, असें त्या संहितेचें निक्षून सांगणें आहे.[२] काठक व मैत्रायणीय संहिता याच्याही पुढे जाऊन बजावून सांगतात की ब्राह्मण्य हें जन्मावर अवलंबून नसून ज्ञानावर अधिष्ठित आहे.[३] तैत्तिरीय संहितेचेंही तेंच मत आहे, जो विद्वान तोच ब्राम्हण असें या संहितेने समीकरण केलें आहे.[४]

वेदोत्तर कालीन वाङमयामध्यें विद्येच्या महतीचीं अनेक वचनें आढळतात. बहुश्रुत वाचकांना तीं माहीत आहेत म्हणून त्यांपैकी थोडयांचाच येथे उल्लेख करितों. मनुष्याला श्रेष्ठत्व हें वयाने, वित्तानें किंवा कुलाने येत नाही, तर विद्येनेच येतें असें मनूचें ठाम मत आहे.[५] विद्या हेंच सर्व सुखाचें मूल आहे. कारण विद्येने विनय, विनयाने योग्यता, योग्यतेनें द्रव्य, द्रव्याने धर्म व धर्माने सुख प्राप्त होतें असें एक सुभाषितकार म्हणतो.[६] दुसरा एक सुभाषितकार, विद्या हें एक अनन्यसाधारण गुणाचें द्रव्य कसें आहे तें दाखवितो,[७] तर तिसरा विद्या ही कल्पलतेप्रमाणे कशी सर्व गोष्टींची प्राप्ती करून देते तें सिद्ध करतो.[८]

---

उत त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्ये उशती सुवासाः। १०, ७१. ४
स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम्॥ निरुक्त, १.१८.

१ इन्द्रो वै ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभवत्। ११. ५. १९.

२ तै. सं., ६. ३. १०. ५; शत. ब्रा., १. ५. ५. १–५.

३ किं ब्राह्मणस्य पितरं किमु पृच्छासि मातरम्। श्रुतं चेदस्मिन्वेद्यं स पिता स पितामहः॥ काठक सं., ३०. १; मै. सं., ४८. १. १०७.

४ एष वै ब्राह्मण ऋषिरार्षेयः यः शुश्रुवान्॥ ६. ६. १. ४.

५ न हायनैर्न पलितैर्न वित्तेन न बंधुभिः। ऋषयश्चक्रिरे धर्मं योनूचानः स नो महान्॥ २. १५४.

६ विद्या ददाति विनयं विनयाद्याति पात्रताम्। पात्रत्वाद्धनमाप्नोति धनाद्धर्मं ततः सुखम्॥ सुभाषितम्।

७ सर्वद्रव्येषु विद्यैव धनमाहुरनुत्तमम्। अहार्यत्वादनर्घ्यत्वादक्षयत्वाच्च सर्वदा॥

८ मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते कान्तेव चापि रमयत्यपनीय खेदम्॥
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं किं किं न साधयति कल्पलतेव विद्या॥

प्राचीन काळीं धर्माचा पगडा समाजावर फार असे, म्हणून विद्येचें महत्त्व समाजावर बिंबवण्याकरितां समाजधुरीणांना धर्माचा अवलंब करून उपनयन हा एक नितांतावश्यक धार्मिक संस्कार ठरविला. हिंदूंना पुत्रप्राप्तीचें फार महत्त्व वाटत असे, पण तरीही विवाह हा कांही उपनयनासारखा आवश्यक संस्कार करण्यांत आला नाही. चाळीस अधिक संस्कारांत फक्त उपनयन हा तेवढा एकच संस्कार अत्यंतावश्यक करण्यांत आला आहे; उपनयानेच द्विजत्व प्राप्त होतें,उपनयन केलें नाही तर आर्यत्व नष्ट होतें, वगैरे जीं वचनें आढळतात त्यास कारण एकच; तें म्हणजे शिक्षणाचें महत्त्व समाजाच्या मनावर ठसविण्याची उत्कट इच्छा हेंच होय

समाप्तविद्य तरुणांचा सन्मान करण्याकरितां जो समावर्तन संस्कार करण्यांत येई, त्यावरूनही जे तरुण अध्ययन करून ज्ञानाची व संस्कृतीची परंपरा एका पिढीपासून दुसऱ्या पिढीला पोचवीत, त्यांना समाज कसा मान देई, तें दिसून येईल. प्रथम समावर्तन संस्कार ज्यांचें अध्ययन संपूर्ण होत असे, त्यांचाच करण्यांत येई, हल्लीसारखा लग्नाच्या आधले दिवशीं किंवा मुंजीच्या दुसरे दिवशी उरकून घेण्याचा तो एक फार्स नव्हता, हें आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. एवढा मोठा जाज्वल्य विद्याचा सूर्य, पण त्यानेंही तेज स्नातकाच्या विद्यातेजापासूनच उसनें घेतलें आहे असें एका गृह्यसूत्राचें मत आहे.[१] स्नातकास ज्या वेळी विद्वत्परिषदेंत नेण्यांत येई, त्या वेळीं त्यास रथ किंवा हत्ती बसावयास देत असत. पाहुणा घरीं आला म्हणजे वर्षांतून एकदाच त्याला मधुपर्क देण्यांत येई; स्नातकास मात्र तो येईल तितक्या वेळी द्यावयाचा असे. राजाच्या बाबतींतही तसेंच करावयाचें असे हें खरें, पण राजरस्त्यावर राजाला सुद्धा स्नातकाला प्रथम वाट द्यावी लागे.[२] विद्यासंपन्नतेस समाज किती महत्त्व देई तें यावरून दिसून येईल.

ब्रह्मचर्यांत शिकलेली विद्या नष्ट होऊं नये, म्हणून पंचमहायज्ञामध्यें स्वाध्यायास स्थान देण्यांत आलें होतें. प्रत्येक गृहस्थास दिवसांतील कांही थोडा तरी वेळ स्वाध्यायाची उजळणी करण्यांत घालवावा लागे. पुढें

---

१ एतदहः स्नातानां ह वा एष एततेजसा तपति। बौ. गृ. सू., २. १. ८.

२ मनुस्मृति, २. ११९.

पुढे एवढयाने काम भागत नाही असें जेव्हा आढळून आलें, तेव्हा उपाकर्म उर्फ श्रावणी संस्कार सर्वांना सक्तीचा करण्यांत आला. हेतु हा, की सर्व गृहस्थांनी वर्षाकांठी तीन चार महिने तरी शिकलेल्याची उजळणी करण्यांत घालवावेत.

आपल्या स्वाभाविक मनोवृत्तीवर नियंत्रण ठेवून विद्येमध्यें पराकाष्ठेचें प्राविण्य मिळविण्याकरितां जे यावज्जीव ब्रम्हचर्य पाळीत, त्यांना समाज किती मान देई हें आपण मागे पाहिलेंच आहे. त्यावरूनही हिंदु समाजास विद्येची किती चाड असे तें दिसून येईल.

आशौचामध्यें अध्ययन–अध्यापनाचें कार्य बंद करावयाचें असे. पण त्यामुळें शिक्षणकार्यांत विशेष व्यत्यय येऊं नये म्हणून ब्रम्हचाऱ्यांनी आशौच मुळींच पाळावयाचें नाही, व विद्वान् ब्राह्मणांनी दहा दिवसाच्या ऐवजीं एक दिवसच पाळावयाचें, असे नियम करण्यांत आले.[१] अध्ययनाच्या मार्गांतील धार्मिक स्वरूपाच्याही अडचणी काढून टाकण्यास धर्मशास्त्रकार कसे तयार असत हें यावरून दिसून येईल.

पितृऋणाच्या कल्पनेचाही समाजधुरीणांनी शिक्षणाचें महत्त्व लोकांच्या मनावर बिंबवण्याच्या कामीं उपयोग करून घेतला आहे. सामान्य समजूत अशी आहे की पुत्रोत्पत्तीने पितृऋणांतून मनुष्य मुक्त होतो; पण बृहदारण्यकोपनिषद् म्हणतें, की केवळ पुत्रोत्पत्ति या कार्यास पुरेशी नाही; पुत्र जर सुविद्य असेल तरच तो पित्याला पितृऋणांतून मुक्त करील.[२] माधवचार्यांचेंही तसेंच मत आहे. ते म्हणतात की बापाचें कर्तव्यकर्म पुत्रोत्पत्तीबरोबर संपण्याऐवजीं सुरू होतें; मुलगा जर यथासांग सर्व शास्त्रांचें अध्ययन करील व प्राचीन परंपरा राखूं शकेल, तरच पितृऋणांतून पिता मुक्त होईल.[३] बाप कितीही गरीब असला तरी त्यास मुलाचें उपनयन हें करावेंच लागे; याचा अर्थ असा की प्रत्येकास आपल्या

---

१ पराशर ३.५; मनु ५.९३.

२ तस्मात्पुत्रमनुशिष्टं लोक्यमाहुस्तस्मादेनमनुशास्ति । १.५.७.

३ न हि पुत्रजननमात्रेण पितुरानृण्यम् । किं तर्हि सम्यगनुशिष्टेन पुत्रेण आम्नायेषु कर्मसु सम्यगनुष्ठितेषु पश्चादानृण्यं संपद्यते। पराशर माधव, भा० १ पु० २, पान १०७.

मुलास प्राथमिक शिक्षण देऊन पुढे त्याच्या उच्च शिक्षणाचीही सोय करून द्यावी लागे. शिक्षणाकडे दुर्लक्ष करणारे कांही श्रीमंत समाजामध्यें असतील, नाही असें नाही[१]; पण सामान्यपणें हिंदु समाजांत शिक्षणाबद्दल जितकी कळकळ व आस्था प्राचीन काळीं असे, तितकी क्वचितच इतरत्र असेल असें वाटतें. खालसा होण्याच्या वेळची पंजाबची स्थिति वर्णन करितांना डॉ. लैट्नर म्हणतो, "पौर्वात्य देशांची विद्येस मान देण्याबद्दल प्रसिद्धि आहे; पंजाब हा या नियमास अपवाद नव्हता. परकीयांच्या स्वाऱ्या व आपसांतील यादवी यांनी देशांत बजबजपुरी माजली असतांनाही शिक्षणसंस्था पंजाबांत वाढतच होत्या. उलटया काळजाचे संस्थानिक, अत्यंत हावरे सावकार, फार काय, दरोडेखोर सुद्धा आपल्या पापाचें प्रक्षालन व्हावें, व मनास शांति प्राप्त व्हावी, म्हणून नवीन शाळा स्थापीत व विद्वानांचा परामर्ष घेत. अशी एक मशीद, देवालय, किंवा धर्मशाळा नव्हती, की जेथे धार्मिक शिक्षणाकरितां शेकडो मुलें जमत नसत. असे फार थोडे संपन्न लोक होते की जे आपल्या मुलांना, व त्याच्या बरोबर आपल्या स्नेह्यांच्या व नातेवाईकांच्या मुलांना, शिकवण्याकरितां आपल्या पदरीं मौलवी, पंडित किंवा गुरू यांना ठेवीत नसत. असे शेकडो साधु होते, कीं जे आपल्या धर्मबांधवांना, व त्या बरोबर कधी कधी विधर्मीयांना सुद्धा, आपलें कर्तव्य म्हणून फुकट शिक्षण देत असत. असा एकही गांवकरी नसे, की जो आपल्या उत्पन्नापैकी कांही भाग आपल्या गांवच्या शिक्षकास देण्यांत धन्यता मानीत नसे.[२]" १८४८ सालीं जर पंजाबमध्यें सुद्धा समाजास शिक्षणाबद्दल इतकी कळकळ वाटे, तर प्राचीन हिंदुस्थानांत ती किती वाटत असली पाहिजे, याची कल्पना करणें आम्ही वाचकांवरच सोपवितों.

आपल्या शिक्षणाबद्दलच्या आस्थेचें प्रत्यंतर हिंदुसमाजाने अनेक तऱ्हेने दिलेलें आहे. सर्व दानामध्यें विद्यादान हेंच सर्वश्रेष्ठ ठरविलें आहे.

---

१ रुरुजातकामध्यें शिकण्याचा त्रास नको म्हणून मुलास शाळेंत न घालणारा एक शेटजी आढळतो.

२ ए हिस्टरी ऑफ् इंडिजेनस् एजुकेशन् इन् दि पंजाब, पान १, एजुकेशन कमिशन, १८८३.

भूमिदान मोठें हें खरेंच, पण विद्यादान हें त्याहीपेक्षा पुण्यकर आहे असें बृहस्पति म्हणतो. समाजास बृहस्पतीचें हें मत मान्य होतें हें विद्यालयाकरितां व विद्याप्रसाराकरितां जीं अनेक दानें कोरीव लेखांत नमूद केलेलीं आढ-तात, त्यावरून दिसून येईल. कुदरकोट येथील एका वैदिक ब्राम्हणानें लढाईमध्यें कामास आलेल्या तक्षदत्त नांवाच्या आपल्या वेदविद्यापारंगत मुलाच्या स्मरणार्थ आठव्या शतकामध्यें एक वैदिक पाठशाला स्थापन केली होती.[१] तिसऱ्या कृष्णराजाच्या नारायण नांवाच्या एका प्रधानाने सालो-ट्गी शाळेची इमारत इ. स. ९४५ मध्यें बांधून दिली होती, हें आपण वर पाहिलेंच आहे. त्याच गांवच्या एका जमीनदाराने त्या शाळेच्या खर्चाकरितां २००० निवर्तन जमीन दान केली होती. भास्कराचार्याचा नातू चंगदेव याने खानदेशांतील पाटण गांवी आपल्या आजोबाच्या ग्रंथांचें अध्ययन व्हावें म्हणन एक ज्योतिष विद्यालय स्थापन केलें होतें.[२] होयसल राज-घराण्याच्या पेरुमल नामक प्रधानाने १२९० सालीं विजापुर जिल्ह्यां-तील मेटुंगी गांवीं वेद, शास्त्रें, व कानडी भाषा यांच्या अध्यापनाकरितां एक विद्यालय काढलें होतें.[३] एन्नायिरमूचें विद्यालय तेथील ग्रामपंचायतीनें जमीन इनाम देऊन चालविलें होतें. इ.स. १०२२ मध्यें बेलूर ग्रामपंचाय-तीनेही शिक्षणप्रसारार्थ ५० एकर जमीन दिली होती.[४] तेवढाच एका जमीनीचा तुकडा बेळगांव जिल्ह्यांतील सोरटुर गांवी एका डेप्युटी कले-क्टरसारख्या हुद्द्याच्या अधिकाऱ्याने अकराव्या शतकामध्यें शिक्षणप्रसारार्थ दिला होता.[५] इ. स. १०८४ साली धारवाड जिल्ह्यांतील एका सद्गृह-स्थाने २० एकर जमीन विद्यार्थ्यांच्या अन्नवस्त्राकरितां दिली होती. त्याच जिल्ह्यांतील एका व्यापारी संघाने एक संस्कृत कॉलेज बाराव्या शतकांत चालविलें होतें.[६]

---

१ ए. इं., ३, पान १८०
२ „ „ १ पान ३०
३ ए. क., ३. तिरुनसोपुर नं. २७
४ इं. अँ., १८. पान २७३
५ इं. अँ., १२, पान २५८
६ „ „ ८, पान १८५

देवालयामध्यें वेदवृत्ति व अध्ययनवृत्ति या करितां दिलेलीं अनेक दानें कोरीव लेखांत सापडतात. ज्या ब्राह्मणांना या वृत्ती मिळत, त्यांना देवालयांमध्यें वेदघोष करून पुराण सांगावें लागे व विद्यार्थ्यांना फुकट शिकवावें लागे. या वृत्तींमुळे हिंदु धर्म, संस्कृति व विद्या यांचें ज्ञान बहुजनसमाजांत पसरण्यास फार मदत होई. त्रिचनापल्ली जिल्ह्यांतील कुट्टलम् या एकाच गांवीं इ. स. १४११ ते इ. स. १५७३ या दरम्यानच्या वर्षांमध्यें सोळा वेदवृत्ती खासगी व्यक्तींकडून देण्यांत आल्या होत्या.[१] यावरून या वृत्ती देऊन धर्म, संस्कृति, व विद्या यांच्या प्रसारास हातभार लावण्याची समाजामध्यें किती प्रवृत्ति होती तें दिसून येईल. दक्षिण हिंदुस्थानांतील शिलालेखांमध्यें वेदवृत्तीचीं दानें पुष्कळच सापडतात; वर कुट्टलम्चें उदाहरण फक्त दिग्दर्शनार्थ दिलें आहे, स्मृतिपुराणांत वर्णिलेलें विद्यादानाचें महत्त्व समाजास कसें पटलें होतें, हें यावरून दिसून येईल.

प्राचीन काळीं छापखाने नसल्यामुळें पुस्तकें फार दुर्मिळ व महाग असत; विद्यालयांना ग्रंथसंग्रहालयाकरितां पुस्तकें मिळावीं, म्हणून पुस्तकें नक्कल करवून त्यांचें दान करणें फार पुण्यावह आहे, असें धर्मग्रंथ प्रतिपादूं लागले. जगाचें भविष्य शास्त्राप्रमाणें वागण्यावर आहे. तेव्हा महाप्रयासानेही शास्त्रें लिहवून त्यांचें दान करावें, असें नंदीपुराण म्हणतें.[२] निरनिराळ्या महिन्यांत कोणकोणत्या पुराणांचें दान करावें, याची एक यादी भविष्योत्तर पुराणांत दिलेली आहे.[३] या उपदेशाप्रमाणें लोक वागत हें मागे नालंदा, वलभि, वगैरे विद्यापीठांस 'सरस्वती भवना'करितां मिळालेल्या देणग्यांचा जो उल्लेख केला आहे, त्यावरून दिसून येईल. बंगालमधील अविघारक नांवाच्या व्यापाऱ्यानें कन्हेरी मठाला जें नवव्या

---

१ सौ. इं. ए. रि., १९१७ मधील ४८१ व ४८७ नंबरचे कोरीव लेख.

२ शास्त्रे यस्माज्जगत्सर्वं संश्रितं च शुभाशुभम् । तस्माच्छास्त्रं प्रयत्नेन दातव्यं शुभकर्मणा ॥ लोकान्सर्वान्कामपूर्णान्यान्ति सर्वशुभोदयान् । पुराणविद्यादातारस्त्वनन्तफलभागिनः ॥ आत्मविद्याप्रदातारो नरा धर्मसमाश्रयाः । न पुनर्योनिनिरयं प्रविशन्ति दुरत्ययम् ॥ अपरार्कोध्दृत नंदीपुराण (याज्ञवल्क्य १. २१२ वर)

३ वरील ठिकाणची अपरार्कटीका पहा.

शतकांत दान दिलें होतें, त्याचा एक हेतु त्या मठाच्या पुस्तकालयांत अधिक पुस्तकें विकत घेतां यावीं हा होता.[१]

हिंदु समाज शिक्षणास उत्तेजन देण्याचा आणखी अनेक तऱ्हेनें प्रयत्न करी. दान द्यावयाचें तें विद्वान् ब्राह्मणासच दिलें पाहिजे, अडाण्यास देतां कामा नये, कारण हवन करावयाचें तें अग्नीमध्यें करितात, राखे-मध्यें करीत नाहीत, असें मनु म्हणतो. श्राद्धास विद्वानांसच फक्त बोल-वावयाचें असे; पूर्वी लोक दर महिन्यास श्राद्ध करीत तेव्हा या नियमानें विद्योत्तेजनार्थ थोडी बहुत मदत होत असली पाहिजे. याच तत्त्वावर तक्ष-शिलेच्या अध्यापकांना व शिष्यांना आजूबाजूच्या गांवचे लोक पुष्कळदा जेवावयास बोलावीत.[२] सालोट्गीचे नागरिकही लग्न, मुंज वगैरे प्रसंगीं गांवच्या विद्यालयांतील शक्य तितके विद्यार्थी व अध्यापक कसे बोलावीत असत, हें आपण मागे पाहिलेंच आहे. गरीबांना, व विशेषत: विद्यार्थ्यां-ना, मोफत भोजन देणारीं सत्रेंही पूर्वीं पुष्कळ असत. कर्नाटकांतील कोळगल्ली, मनगोली, निलगुंड, नेसरगें, बागेवाडी, बेळगाम्वे, डंबल, गदग आणि बेहट्टी या गांवीं व कोंकणांतील खारेपाटण गांवांत मध्ययुगाच्या शेवटीं अशीं सत्रें होतीं हें उपलब्ध झालेल्या कोरीव लेखावरून दिसून येतें.[३] बर्नियरने सतराव्या शतकामध्येंही असलीं सत्रें पाहिलीं होतीं, आणि लोसक जातकामध्यें बनारसमधील फक्त विद्यार्थ्यांकरितां चालविलेल्या एका सत्राचा उल्लेख आढळतो. तेव्हा ही सत्राची चाल फार जुन्या कालापासून आधुनिक कालापर्यंत चालत आलेली आहे हें दिसून येईल.

शिक्षणाच्या उत्तेजनार्थ सत्रें स्थापण्याइतके संपन्न लोक संख्येने थोडेच असणार; ज्यांची इतकी ऐपत नसेल, त्यांनी ब्रह्मचाऱ्यास निदान मधु-करी तरी अवश्य घालावी असा शास्त्रकारांचा कटाक्ष आहे. घरामध्यें

---

१ इं. अँ., १३, पान १३४.

२ चित्तसंभूत जातक.

३ इन्स्क्रिपशन्स् फ्रॉम् मद्रास प्रेसिडेन्सी, बेल्लारी जिल्हा नं. ८२.; ए. इं. ५, पान २२; ए. इं., ३, पान २०८.; जे. बी. बी. आर. एस., १०; पान २५६; इं अँ., ७, पान ३०७; इं. अँ., ५, पान ४९; इं. अँ., १० पान १८८; इं. अँ., १, पान १०१; इं. अँ., ४, पान २७४; ए. इं., ४, पान ३५५ हीं अनुक्रमें पहा.

जें अन्न शिजतें त्यापैकी एखादा घास किंवा तुकडा मध्यान्हकाळीं मधु-करी मागण्यास आलेल्या ब्रह्मचाऱ्यास घालण्यानें कोणाच्या पोटास चिमटा बसण्याचा फारसा संभव नसतो; जे विद्यादानास इतकीही मदत करण्याचें नाकारतील त्यांचें सर्व पुण्य ब्रह्मचारी घेऊन जातो असें आपस्तंब ऋषि म्हणतात.[१] गरीबीमुळें गुरुदक्षिणा देण्याची ज्यांना शक्ति नसे ते लोकांकडून वर्गणी गोळा करून ती देत असत; अशा विद्यार्थ्यांस परत पाठवणें हें मोठें पाप आहे, असें शास्त्रकारांचें सांगणें आहे. समाजाचेंही तसें मत होतें. गुरुदक्षिणा मागण्यास आलेला विद्यार्थी इच्छा पूर्ण न होतां जर परत गेला तर आपली भयंकर बदनामी होईल या भीतीनेंच विश्ववित् यज्ञामुळें निर्धन झालेल्या रघुराजानें इन्द्रावर स्वारी करण्याचा बेत केला होता.[२] पोष्य राजानें तर आपल्या पट्टराणीची कुंडलें गुरुदक्षिणेंकरितां त्यांची याचना करणाऱ्या उत्तंक नांवाच्या विद्यार्थ्यास दिलीं होतीं.[३] विद्यासंपन्न होऊन समाजाची कार्यक्षमता वाढवण्यास ज्यानें मदत केली आहे, त्यास सर्वांनी विद्यार्जनाचा खर्च भागविण्यास शक्य ती मदत केलीच पाहिजे हें लोकमत प्रभावी होतें यांत शंका नाही.

समाजाप्रमाणें राजसत्तेसही विद्याप्रसाराची फार कळकळ असे. राजानें अनेक सऱ्हेने विद्यादानास मदत करावयाची असे. विद्वान लोकांना वृत्ती देण्याचें कर्तव्य तूं बजावतोस का नाहीस या बद्दल धर्मराजास प्रश्न विचारण्यास भीष्माचार्य विसरले नाहीत.[४] मनु व याज्ञवल्क्य यांनीही या कर्तव्याकडे राजाचें लक्ष वेधिलें आहे.[५] विद्वानांबरोबर कलावन्तांचाही राजानें परामर्ष घेतला पाहिजे, असें शुक्राचार्य म्हणतात.[६] अशी एकही स्मृति नाही, की जी मध्यें राजाच्या या कर्तव्यावर जोर दिलेला नाही. अर्थशास्त्रामध्ये ब्राह्मणांच्या आश्रमांकरितां खास अरण्यें राजानें

---

१ स्त्रीणां प्रत्याचक्षाणां समाहितो ब्रह्मचारी इष्टं दत्तं हुतं प्रजां पशून्ब्रह्म-वर्चसमन्नाद्यं वृंक्ते । आ. ध. सू. १. १. ३. २४–२५.

२ गुर्वर्थमर्थी श्रुतपारदृश्वा रघोःसकाशादनवाप्य कामम् !
गतो वदान्यांतरमित्ययंये मा भूत्परीवादनवावतारः ॥ रघुवंश, सर्ग ५

३ म. भा., आदिपर्व, अध्याय ३.

४ अनुशासन पर्व, अध्यय ५९, ६०.

५ मनु ७. ८२; ४. ३३; याज्ञवल्क्य १. १३०.

६ १. ३६९.

राखून ठेवावींत, व त्यांच्या निर्वाहाची तरतूज करावी. असें सांगितलें आहे.[१] एखादा ब्राह्मण जर राज्य सोडून जाऊं लागला तर हरप्रयत्नानें राजानें त्यास आपल्या राज्यामध्यें ठेवून घ्यावें, असें महाभारत म्हणतें.[२]

राजेलोक प्रत्यक्ष व्यवहारांत वरीलप्रमाणें वागत, याबद्दल पुष्कळ पुरावा मिळतो. विदेहाच्या जनकराजाची उपनिषत्काळीं विद्वानांचा परामर्श घेण्याबद्दल फार ख्याति होती. त्याच्या समकालीन बनारसच्या अजातशत्रु राजाची त्याच्यावर या बाबतींत मात करण्याची महत्वाकांक्षा होती.[३] अशोकाबद्दल कांही लिहावयास नकोच. कनिष्क राजाने अश्वघोष व चरक यांना आश्रय दिला होता. शातवाहन राजांची विद्येस उत्तेजन देण्याबद्दल इतकी कीर्ति होती की एकहजार वर्षांपेक्षाही जास्त काल ती टिकली.[४] विद्वानांच्या परामर्शाबद्दलच्या चन्द्रगुप्त विक्रमादित्याच्या अनेक गोष्टी अजून प्रचलित आहेत. त्याचा एक प्रधान शाब हा कवि होता हें एका कोरीव लेखावरून दिसून येते[५]. त्याचा मुलगा पहिला कुमारगुप्त यानें नालंदा विद्यापीठाचा कसा पाया घातला, व त्याच्या नंतरच्या तथागतगुप्त, बर्रासहगुप्त, बुधगुप्त, वगैरे गुप्त राजांनी त्या विद्यापीठास कशी सढळ हातानें मदत केली होती, हें आपण मागे पाहिलेंच आहे. हर्ष राजा हा कवींचा परामर्श घेणारास कवि होता. कनोजच्या यशोवर्म्याच्या पदरीं वाक्पति व भवभूति हे महाकवि होते. पाल घराण्यांतील धर्मपाल व देवपाल या राजांनी नालंदा व विक्रमशिला या विद्यापीठांस चांगली मदत केली होती. कनोजचे महेन्द्रपाल व महीपाल हे राजशेखराचे आश्रयदाते होते. मुंज, सिंधुराज, व भोज या परमार राजांच्या औदार्यामुळें दहाव्या व अकराव्या शतकांत धारानगरी ही संस्कृत विद्येचें माहेरघर झाली होती. सहाव्या विक्रमादित्यानें काश्मीराहून बिल्हण कवीस बहुमानपूर्वक आपल्या दरबारीं कल्याणीस आणलें होतें, मिताक्षराकार विज्ञानेश्वरही तेथेंच रहात होता. उमापति-

---

१ २. १.

२ शांतिपर्व, अध्याय ८९.

३ बृह. उ. २, १.

४ काव्यमीमांसा, पान ५५.

५ गुप्त इनस्क्रिपशन्स, नं. ६.

देव, घोई, गोवर्धन, व जयदेव बंगालच्या लक्ष्मणसेनाचे आश्रित होते. प्रसिद्ध जैन ग्रंथकार हेमचन्द्र हा चौलुक्य घराण्यांतील कुमारपालाचा राजगुरु होता. नैषधचरितकार श्रीहर्ष हा विजयचंद्र व जयचंद्र या गहडवाल राजांचा राजकवि होता. मुसलमानी अमलांतील हिंदु संस्थानिकही विद्येच्या परामर्शाबद्दल प्रसिद्ध होते.

प्रसिद्ध कवींनाच राजाश्रय मिळे अशी मात्र कोणी वरील यादीवरून समजूत करून घेऊं नये. वलभि, नालंदा, वगैरे विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना शक्य तोंवर सरकार नोकऱ्या देत असे, निदान उत्तेजनार्थ दक्षिणा तरी देण्यांत येई.[१] आतापर्यन्त सापडलेल्या असंख्य ताम्रपटावरून राजे लोक विद्वान् ब्राह्मणांना जमिनी किंवा गांवें वृत्तीकरितां देत, असें दिसून येतें राष्ट्रकट घराण्यांतील चवथ्या गोविंदराजाने तर राज्याभिषेकाच्या वेळीं ६०० गांवें विद्वान ब्राह्मणांना व ८०० गांवें देवालयांना इनाम दिलीं होतीं.[२] देवालयाच्या विद्यमानेही विद्यालयें चालवण्यांत येत हें विसरतां कामा नये. नालंदा विद्यापीठास दोनशें गांवें इनाम मिळालीं होतीं; वलभि विद्यापीठासही तसाच मोठा राजाश्रय होता. कांही राजे विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्याही देत.[३]

जमिनी, गांवें, वगैरे इनाम देऊन शिवाय राजे लोक दरसाल रोख दक्षिणाही देत असत. ही चाल पेशवाईपर्यंन्त चालत आली होती. पेशवे दरसाल पांच लाख रुपये या कामी खर्च करीत; 'पण', एल्फिन्स्टन म्हणतो, "या प्रत्यक्ष दक्षिणेशिवाय पुष्कळ अन्य रीतींनी पेशव्यांकडून विद्वानांस मदत मिळे. त्यामुळें धर्माचरणांत रत असलेल्या व विद्यादानांत काल घालवणाऱ्या ब्राह्मणांची संख्या आपणास वाटते त्यापेक्षा फारच मोठी होती.[४] "एकुणिसाव्या शतकामध्येंही हिन्दु राजाकडून जर एवढी मोठी विद्यादानास मदत मिळे, तर ज्यावेळीं श्रुतिस्मृतींचा पगडा समाजावर फार होता, त्या प्राचीन काळामध्यें काय स्थिति असावी याची कल्पना वाचकांनीच करावी. शिक्षणास मदत करणें हें राजसत्तेचें कर्तव्य

---

१ इत्सिंग, पान १७८–८.

२ ए. इ., ७, पान २६.

३ शरभंगजातक व शुक्रस्मृति १, ३६८ पहा.

४ रिपोर्ट ऑफ दि बॉंबे प्रॉव्हिन्शियल कमिटी, एजु. कमिशन, १८८२ पान ५.

होय हें तत्त्व यूरोपमध्यें मार्टिन् ल्यूथरने प्रथम समाजापुढे मांडलें; हिन्दुस्थानांत तें त्यापूर्वी अनेक शतकें मान्य होऊन राजाकडून अनुसरिलें जात होतें, हें वरील पुराव्यावरून दिसून येईल.

राजसत्तेकडून अप्रत्यक्ष रीतीनेंही शिक्षणकार्यास पुष्कळ मदत मिळे. विद्वान् ब्राह्मणांना कराची माफी असावी याबद्दल स्मृतींची एकवाक्यता आहे. अकराव्या शतकांतील कुलोत्तुंग राजाने आपल्या राज्यांतील सर्व शिक्षकांना घरपट्टी माफ केली होती.[१] कुमारपालराजाने श्रोत्रियांवरील कर बंद केला होता. ब्रह्मदेय गांवापासून कर घेण्यांत येत असें अनेक शिलालेखांवरून दिसतें. ज्या श्रोत्रियांना सरकारी इनामें मिळत, त्यांच्याकडून सरकारी कर घेण्यांत येई, पण जर एखाद्या विद्वान् ब्राह्मणास असें इनाम मिळालेलें नसल्यामुळें तो गरिबींत असेल, तर त्याकडून कर वसूल करीत नसावेत असें दिसतें.

भूमिगत द्रव्याच्या कायद्यांत विद्वान् ब्राह्मणांना बरीच सवलत असे. एखाद्या श्रोत्रियास जर मोहरांचा हंडा सापडला तर त्यावर त्याचा संपूर्ण हक्क असे; इतरांस सापडला, तर त्यांना १६ टक्के कर द्यावा लागे. राजाला जर तो सापडला तर त्याला त्यांतील निमे धन ब्राह्मणांना वाटून द्यावें लागे.[२] मुदतीच्या कायद्याची सामान्य मुदत तीस वर्षांची असे, पण गुरुगृहीं विद्यार्जनास राहिलेल्या ब्रह्मचाऱ्यास अन्यायाने अपहार केलेली मिळकत परत मिळविण्याकरितां ५० वर्षांत केव्हांही दावा आणतां येई. विद्यार्थ्यांच्याकडून नांवपट्टी घेण्यांत येत नसे; इतरही कर त्यांच्याकडून घेऊं नयेत, असें आपस्तंब धर्मशास्त्राचें म्हणणें आहे,[३] पण त्याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहार होत होता की नाही, हें समजण्यास कांही मार्ग नाही.

असो, वरील विवेचनावरून राजसत्तेकडून शिक्षणास कसें उत्तेजन मिळत असे, ते दिसून येईल. हल्ली सारखे हिंदु राजवटींत शिक्षणमंत्री किंवा डायरेक्टर ऑफ् पब्लिक् इन्स्ट्रक्शन्, एजुकेशन इन्स्पेक्टर वगैरे

---

३ ए. क., १०; मुलबागल नं; ४९ अ.

१ मनु, ८. ३५–३९; याज्ञवल्क्य, २. ३४–३५.

२ २. १०. २६. १५–१७.

सारखे अधिकारी नव्हते हें खरें; पण त्यास कारण, शिक्षणाकडे राजसत्तेचें लक्ष नव्हतें हें नसून, शिक्षणामध्यें विद्वानांना पूर्ण मुखत्यारी असे हें होतें. ब्राह्मणांना जमिनी इनाम देण्याच्या वेळीं किंवा अग्रहार गांवें निर्माण करण्याचे वेळी अध्यापन मोफत केलें पाहिजे, किंवा अमक्या अमक्या पद्धतीने केलें पाहिजे, अशा कांहीच अटी सरकार त्यांच्यावर घालीत नसे. विद्वानांना दान देणें हें राजाचें कर्तव्य होतें; समाजाकडून किंवा सरकाराकडून मदत मिळो, अगर न मिळो, फीबद्दल करार न करितां आपखुषीने देण्यांत येईल त्या गुरुदक्षिणेवर संतुष्ट राहून अध्यापन करणें हें ब्राह्मणांचें कर्तव्य होतें. प्रत्येक जण आपापलें कर्तव्य धर्मभावनेनें करी, त्यामुळे हल्लीप्रमाणें निरीक्षकांच्या तांड्यांची गरज भासली नाही.

आपण मदत करितों या अहंभावनेने राजे लोकांनी विद्वानांकडे तुच्छतेने पाहावयाचें नसे. मुलगा बापास जसा मान देतो तसा राजानें श्रोत्रियास द्यावयाचा असे. 'विनीतवेषेण नाम प्रवेष्टव्यानि तपोवनानि' असें म्हणून, सैन्यासह आश्रमांत प्रवेश करणें योग्य दिसणार नाही या कारणास्तव दुष्यंताने आपलें सैन्य मागे ठेवलें होतें.[१] गुरुदक्षिणेची याचना करण्यास आलेल्या कौत्सास रघुराजाने किती प्रेमाने व सन्मानाने वागविलें हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.[२] बालादित्य राजाने नालंदा विद्यापीठास फार मोठी इनामें दिलीं होतीं, तरी तो पुढे जेव्हा भिक्षु झाला तेव्हा त्यास मठाधिपति करण्यांत आलें नाही.[३] सर्व राजे लोक इतके निरहंकार नसतील, पण ध्येय हें असें होतें, व त्याप्रमाणें पुष्कळ राजे वागत, हें निर्विवाद आहे.

विद्वानांना समाजांत मोठा मान मिळे हें खरें, पण त्यांचें वर्तनही उच्च प्रकारचें व निर्लोभी असावें लागे. दक्षिणा मिळण्याचा संभव असो वा नसो, योग्य शिष्य आला म्हणजे त्यांना त्याला मोफत शिकवावें लागे. फी बद्दल करार करणें निंद्य मानलें जाई. अभ्यास संभाळून घरचें काम करावयास जर विद्यार्थी तयार असेल, तर त्याला गुरूला शिकवावेंच लागे. दक्षिणा मिळणार नाही, म्हणून गुरूने टाळाटाळी करावयाची नसे.

---

१ शाकुंतल, अंक १.
२ रघुवंश, सर्ग ५.
३ वॉटर्स, २, १६४-५.

हिंदु समाजाच्या इतिहासांत बऱ्याच प्राचीन काळीं निरनिराळे धंदे अनुवंशिक झाले. त्यानंतरही बराच काळ जरूर प्रसंगीं किंवा आपल्या आवडीप्रमाणें एखाद्यास आपला अनुवंशिक धंदा बदलतां येई, पण सामान्यत: धंदे वंशपरंपरेने चालत व बापाकडून मुलांना त्यांचें ज्ञान घरींच मिळे. उपनयन सक्तीचें व धंदे अनुवंशिक झाल्यामुळें, अध्यापन हें एका वर्गाचें निरपेक्ष मनाने करावयाचें धार्मिक कर्तव्य ठरल्यामुळें, व राजेरजवाडे, शेट सावकार, व जमीनदार इनामदार यांच्या कडून शिक्षणकार्यास एक सारखी सढळ हाताने मदत होत गेल्यामुळें, प्राचीन काळीं हिंदु समाजांत शिक्षणाची चांगल्या प्रकारची व्यवस्था झालेली होती. हिंदु संस्कृतीस इतर कारणामुळें उतरती कळा लागण्यापूर्वी समाजामध्यें शिक्षणप्रसार बराच होत असे. त्रैवर्णिकांमध्यें बाराव्या शतकाच्या अखेरीस सुमारें शेकडा तीस, गुप्त कालांत (म्हं० पांचव्या शतकांत) सुमारें शेकडा साठ, व मौर्यकालांत (इ. स. पू. तिसऱ्या शतकांत) सुमारें शेकडा ७५ लोक साक्षर होते, हें आपण मागे पाहिलेंच आहे. त्या वेळीं जगामध्यें इतरत्र कोठेही साक्षरतेचा एवढा मोठा प्रसार असलेला अजून तरी माहीत नाही. वैद्यक, धातुशास्त्र (Metallurgy) ज्योतिष, रसायनशास्त्र, शिल्पकला, विणकाम वगैरे क्षेत्रांतही हिंदूंची प्रगति इतर देशांच्या त्या वेळच्या प्रगतीशीं तुलना करतां चांगल्या प्रकारचीच होती. नवव्या शतकापासून हिंदु संस्कृतीस उतरती कळा लागली; तिची कारणें काय होतीं तें पुढील प्रकरणीं पाहूं.

---

## प्रकरण दहावें

# ध्येय व गुणदोषविवेचन

हिंदु शिक्षणपद्धतीचे ध्येय व उद्देश काय होते, ते कितपत साध्य झाले, त्याचप्रमाणें तिच्यामध्यें गुणदोष कोणते होते, यांचें विवेचन आपण आता करूं.

शिक्षणाच्या ध्येयाविषयीं किंवा निरनिराळ्या शिक्षणपद्धतीविषयीं, किंवा त्यांतील मूलभूत तत्त्वाविषयीं विशेष चर्चा हिंदु वाङ्मयांत आढळत नाही. शिक्षणपद्धति बऱ्याच प्राचीन काळीं एका ठराविक सांचाची बनली. तिचें ठराविक वर्णन धर्मग्रंथांत सापडतें. तिजमध्यें पुढे थोडेसे फरक पडले, नाही असें नाही. पण आमच्या शास्त्रकारांची प्रवृत्ति हे फरक का पडले, याची मीमांसा करण्याऐवजी, ते झाकून ठेवण्याकडेच जास्त आहे. त्यामुळें शिक्षणशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांच्या विकासाच्या इतिहासाच्या दृष्टीने प्राचीन हिंदु शिक्षणाचा इतिहास फारसा महत्वाचा नाही. पण येथे हेंही नमूद केलें पाहिजे, की शिक्षणशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांची चर्चा यूरोपमध्येंही अलिकडेच सुरू झाली आहे. वाङ्मयात्मक शिक्षण जास्त उपयोगी का धंदेशिक्षण जास्त फायदेशीर, याची चर्चा सतराव्या शतकांत बेकनने प्रथम सुरू केली. मुलांच्या मनोरचनेचा व आवडीनावडीचा विचार करून त्या मानाने शिक्षणाची रूपरेषा ठरविली पाहिजे, हें तत्त्व अठराव्या शतकांत प्रथम पुढें आलें. पाठशक्ति व बुद्धिविकास यांत अधिक महत्वाचें कोण; विद्यार्थ्यांनी वाचनांत जास्त वेळ घालवावा का विचारांत; शिक्षणाने मनुष्याच्या स्वाभाविक शक्तींचा फक्त विकास होतो, का कांही नवीन प्राप्त होतात; शारीरिक, नैतिक, बौद्धिक, सौंदर्यविषयक (aesthetic), व धार्मिक शिक्षण यांचें सापेक्ष महत्त्व काय, व त्यांचा योग्य काल कोणता; वगैरे शिक्षणविषयक प्रश्नांवरील चर्चा गेल्या शंभर वर्षांतच यूरोपअमेरिकेंत सुरू झाली आहे. या प्रश्नांपैकीं कांही कांही प्रश्नांवर मधून मधून प्राचीन वाङ्मयांत थोडेसे

विचार आढळतात, पण सोपपत्तिक चर्चा अशी कोठें सापडत नाही. अध्यापकांना दिलेलें पूर्ण स्वराज्य हें याचें बऱ्याच अंशानें कारण असावें. अध्यापक आपलें कर्तव्य करतात, त्यांना आपण मदत केली म्हणजे झालें, अशी समाजाची वृत्ति होती; अध्यापकही जुन्या चाकोऱ्यांनी आपली अध्यापनाची गाडी हाकत होते. समाजाकडून त्यांच्या कार्यावर टीका होत गेली असती, तर शिक्षणशास्त्रांतील मूलभूत तत्त्वांचा अनेक दृष्टींनी विचार करून त्यांनी टीकांस उत्तर म्हणून शिक्षणशास्त्रविषयक ग्रंथ लिहिले असते. हेंही आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे की वरील प्रश्नांपैकी कांही प्रश्नांची चर्चाच होणें प्राचीन हिंदुस्थानांत शक्य नव्हतें. वाङ्मयात्मक शिक्षण श्रेष्ठ की धंदेशिक्षण श्रेष्ठ, असा प्रश्न कोणी काढला असता तर ' कांही वर्गांना वाङ्मयात्मक शिक्षण इष्ट, तर कांहींना धंदेशिक्षण हितकारक; यामुळे त्यांच्या सापेक्ष गुणदोषाचा प्रश्नच उद्भवत नाही असें समाजधुरीणांनी उत्तर दिलें असतें.

हिंदु शिक्षणाचे उद्देश काय होते, व ते कितपत साध्य झाले, हें आता आपण पाहूं. शीलसंवर्धन, उत्तमगुणपरिपोष, व व्यक्तित्व विकसन, (Development of personality) स्वकर्तव्यक्षमता व प्राचीन संकृतिसंरक्षण हे चार हिंदु शिक्षणपद्धतीचे उद्देश होते; ते कितपत साध्य होत होते, याचा आता आपण विचार करूं.

प्राचीन हिंदु शिक्षणपद्धतींत शीलसंवर्धनाइतकें दुसऱ्या कशासच महत्त्व दिलेलें नाही. वेद म्हणजे देववाणी कसा समज असल्यामुळें वेदाध्ययनास किती महत्त्व दिलें जात असे, हें आपण पाहिलेंच आहे; तरी देखील मनूसारखा पुराणप्रिय ऋषि, गायत्री मंत्रच शिकलेला पण सच्छील ब्राह्मण वेद पारंगत पण दुराचारी ब्राह्मणापेक्षा शतपट श्रेष्ठ, असें बिनदिक्कत म्हणतो.[१] दुर्वर्तनी मनुष्यास वेदाध्ययन, यज्ञयाग, दानधर्म, वगैरेचा काडी-इतकाही उपयोग होणार नाही. सद्विचार व सद्वर्तन यामुळेंच अखेर मोक्ष मिळतो, असेंही बजावण्यास मनु विसरत नाही.[२]

---

१ सावित्रीमात्रसारोऽपि वरं विप्रः सुयंत्रितः। नायंत्रितस्त्रिवेदोऽपि सर्वाशी सर्वविक्रयी ॥ २.११८.

२ २.९७ व ९८.

विद्यार्थी सच्छील बनावेत म्हणून अनेक तऱ्हेची खबरदारी शास्त्रकारांनी घेतली आहे. गुरूच्या जवळ शिष्याने राहावयाचें असे, व त्याच्या अभ्यासाप्रमाणें वर्तनावरही गुरूने नजर ठेवावयाची असे. ब्रह्मचर्य हा एक आयुष्यांतला अत्यंत पवित्र काल आहे, आपण आपलें पावित्र्य राखलें तर परमेश्वर आपला पाठीराखा होईल, जर आपलें वांकडे पाऊल पडलें तर आपला सत्यानाश होईल, वगैरे गोष्टी उपनयनामध्यें व नंतर ब्रह्मचर्यकालामध्यें वारंवार शिष्याच्या मनावर ठसविण्यांत येत. राम, बलभीम, भीष्माचार्य, युधिष्ठिर, हरिश्चंद्र वगैरे सारख्या विभूतींची चरित्रें विद्यार्थ्यांपुढे आदर्श म्हणून ठेवण्यांत येत; त्याचाही चांगला परिणाम झाल्याशिवाय रहात नसे.

या सर्व शिकवणीचा व प्रयत्नांचा प्रत्यक्ष परिणाम कितपत होई, तें आता आपण पाहूं. सर्व समाजामध्यें नेहमीं कांही दुर्वर्तनी व कांही सद्वर्तनी लोक असतात, व इतिहासांत अशाच असामान्य व्यक्ति चमकतात; त्यामुळें सामान्य लोकांचें शील विशिष्ट कालामध्यें कोणत्या प्रकारचें होतें, हें ठरविणें बरेंच अवघड असतें. सुदैवानें कांही विदेशी प्रवासी, यात्रेकरू, व व्यापारी हिंदुस्थानांत प्राचीन काळीं येऊन गेले होते, व त्यांनी हिंदूंच्या चारित्र्याबद्दल आपलें मत नमूद केलेलें आहे. हे लोक हिंदूंचे पक्षपाती नव्हते हेंही सिद्ध करून देतां येतें, तेव्हा त्यांच्या मतांचा आपणास येथे चांगला उपयोग होईल.

या विदेशी लेखकांपैकी मेगॅस्थेनीस सर्वांत जुना होय. तो ग्रीक होता, व ग्रीक लोक हे या वेळीं हिंदूंचे राजकीय वैरी व प्रतिस्पर्धी होते. कांही कांही चालींबद्दल मेगॅस्थेनीसने हिंदूंची चेष्टाही केली आहे; पण हिंदूंच्या चरित्र्यासंबंधीं लिहितांना तो म्हणतो, "सत्य व सद्गुण यांचे हिंदु लोक मोठे चाहते आहेत; एकाही हिंदूला खोटें बोलण्याबद्दल शिक्षा झालेली नाही.[१]" शेवटचें विधान अक्षरशः सत्य मानणें चुकीचें होईल; पण त्यावरून लबाडी व फसवेगिरी हिंदु समाजांत फारच कमी प्रमाणांत असावी, हें अनुमान काढण्यास बिलकुल हरकत नाही. स्ट्रॅबो व मेगॅस्थेनीस हे दोघेही पुढे म्हणतात, "कज्जेदलाली हिंदुस्थानांत बिलकूल नाही;

१ फ्रॅग्मेंट, ३५.

विश्वासानें ठेव ठेवतेवेळीं साक्षीदार व मोहोर यांची गरज लागत नाही, कारण एकमेकांचा एकमेकांवर चांगला विश्वास असतो. हिंदु लोक घरां-नाही कडीकुलुपें सामान्यतः लावत नाहीत." १

सातव्या शतकांतील हिंदूंच्या शीलाबद्दल युआन् च्वांगनेही वरील प्रकारचेच उद्गार काढले आहेत. निरनिराळ्या प्रान्तांतील लोकांच्या स्वभावांतील गुण व दोष हे दोनीही या चिनी यात्रेकरूनें काळजीपूर्वक नमूद केले आहेत; पण एकंदर हिंदूंच्या चारित्र्याविषयीं आपलें मत देतांना तो म्हणतो, "हिंदू हे स्वभावानें चंचल, पण चरित्रानें सच्छील आहेत. अन्यायानें ते कशाचाच अपहार करीत नाहीत; योग्य असेल त्या पेक्षा अधिकच ते आपल्या प्रतिपक्षीयास देतात. कपटानें ते कधीही वागत नाहीत, व आपलें वचन ते नेहमीं पाळतात."२ यावेळचे हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोक युआन् च्वांगच्या धर्माचे प्रतिपक्षी होते. तरीही त्यानें त्यांच्याबद्दल वरील प्रशंसोद्गार काढले आहेत। तेव्हां ते खरे मानण्यास कांहींच हरकत दिसत नाही.

बाराव्या शतकांतील पश्चिम हिंदुस्थानांतील लोकांबद्दलही अलइद्रिसि नांवाच्या आरबी व्यापाऱ्यानें अशाच आशयाचे उद्गार काढले आहेत:— "न्यायानें वागण्याची हिंदूंमध्यें स्वाभाविक प्रवृत्ति असते, व त्यांची वर्तणूक तदनुसार असते. सद्धेतु व प्रामाणिकपणा यांबद्दल त्यांची फार प्रसिद्धि आहे, त्यामुळें व्यापाराकरितां त्यांच्या देशामध्यें चोहोंकडले लोक येतात व त्यांची भरभराट होते."१ अल् इद्रिसि हा विदेशी व विधर्मी होता. तेव्हां हिंदूंच्या पक्षपातानें त्यानें लिहिलें असण्याचा फारसा संभव नाही, हें सर्वांस कबूल करावें लागेल.

तेराव्या शतकांतील पश्चिम हिंदुस्थानांतील ब्राह्मणांबद्दल मार्कोपोलो नांवाच्या इटालियन् प्रवाशानें असेच प्रशंसोद्गार काढले आहेत. तो

---

१ मेगॅस्थेनिस, फ्रॅगमेंट ३५.

२ वॉटर्स, १, पृ. १७१.

१ ईलियट, भा १, पृ ८८.

म्हणतो 'या ब्राह्मण व्यापाऱ्यासारखी नेकी व सचोटी इतर कोठे सापडणार नाही, कारण कशानेंही आमिष दाखविलें, तरी ते कधीच खोटें बोलत नाहीत. जर एखाद्या परदेशी व्यापाऱ्याने त्यांच्याजवळ आपला माल विक्रीस ठेवला, तर ते त्यास शक्य तितका फायदा होईल अशी काळजी घेऊन तो विकून टाकतात, व आलेले पैसे त्याचे त्यास परत करतात. आपलें कमिशनही ते आपणहून मागत नाहीत; तो स्वखुषीने जें कांही देईल, त्यावर ते संतुष्ट असतात.[१] व्यापारी वर्गांत जेव्हा इतकी उच्च प्रकारची सचोटी असते, तेव्हा सामान्य लोकांत ती त्यापेक्षा कमी तरी असणार नाही हें निर्विवाद होय. नंदुरबार व देवगिरी या टापूंतील लोक प्रामाणिक, धार्मिक, व विश्वासार्ह आहेत असें चौदाव्या शतकांतील इब्न बतुता नामक एका मुसलमानी प्रवाशाने लिहून ठेवलें आहे.[२]

व्यापारी व प्रवासी लोकांना विदेशी लोकांबद्दल प्रायः विडंबनात्मक लिहिण्याची प्रवृत्ति असते; जेव्हा इतक्या निरनिराळ्या धर्मांचे, देशांचे व काळाचे विदेशी लेखक हिंदूंच्या शीलाबद्दल वरील प्रकारचे प्रशंसोद्गार मनापासून काढतात, तेव्हा हिंदु शिक्षणपद्धतीचें शीलसंवर्धनाचें ध्येय बऱ्याच मोठ्या प्रमाणावर साध्य झालें होतें असें गृहीत धरण्यास कांहीच हरकत नाही. सतराव्या अठराव्या शतकाच्या पुढे कांही इंग्रज व्यापारी व अधिकारी हिंदूंच्या चारित्र्यावर टीका करीत असलेले आढळतात; पण त्यांच्या उलट तऱ्हेचें मत दुसरे इंग्रज अधिकारी प्रतिपादित असलेलेही सापडतात. पहिल्या प्रकारच्या निरीक्षकांपैकी कांही पूर्वग्रहदूषित होते, व कांहींचा संबंध समाजांतील अत्यंत नीच व्यक्तींशीं आला होता; हेही अशक्य नाही की, या वेळीं पांच सातशें वर्षं परकी अंमल सुरू असल्यामुळें, व शेवटीं शेवटीं १७७०च्या सुमारास बंगाल्यांत जुलमाची परमावधि झाली असल्यामुळें, हिंदूंचें चारित्र्य बिघडूं लागलें असावें. प्राचीन कालीन हिंदूंसंबंधी एकाही विदेशी लेखकाने अशा तऱ्हेचे उद्गार काढलेले नाहीत हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

---

२ यूल, मार्को पोलो, भा. २, पृ. ३६३ (तिसरी आवृत्ति.)

१ इब्न बतूता, पृ. २२८.

व्यक्तित्व विकास ( Development of Personality) व उत्तमगुणगणपरिपोष हें शिक्षणपद्धतीचें दुसरें ध्येय होतें. हिंदु शिक्षणपद्धतींत वैयक्तिक आवडीनावडींना वाव नव्हता व प्रत्येकास ठराविक तऱ्हेचें शिक्षण घ्यावें लागे असा एक समज आहे पण तो निर्मूल आहे. सर्व लोक कसे बारा वर्षे वेदाध्ययन करीत नसत; वेद, वेदान्त, न्याय, सांख्य, धर्मशास्त्र, पुराणें, काव्य, नाटयशास्त्र, अर्थशास्त्र यांपैकी एखादा विषय प्रत्येकजण आपापल्या आवडीप्रमाणें कसा निवडून घेई; धंदे अनुवंशिक झाल्यावरही विशेष प्रसंगीं किंवा आवडीनुसार उत्साही किंवा धाडसी तरुणास जन्मसिद्ध धंद्याव्यतिरिक्तही धंदा कसा शिकतां येई, हें मागे निरनिराळया ठिकाणीं दाखविलेंच आहे.

व्यक्तित्वविकास (Development of personality) उत्तमगुणपरिपोषामुळें होतो, असें शिक्षणशास्त्रज्ञांचें मत होतें म्हणून ते त्यावर विशेष जोर देत. स्वाभिमान, आत्मविश्वास व इन्द्रियनिग्रह यांचें चांगलें संवर्धन झालें म्हणजे सर्व उत्तम गुणांचा परिपोष होतो व त्यामुळें पुढे प्रत्येकाच्या व्यक्तित्वाचा विकास होतो; म्हणून या तीन बाबींवर प्राचीन काळीं विशेष जोर देण्यांत येई. ब्रह्मचारी हा हिंदु संस्कृतीचा संरक्षक आहे; राष्ट्राची व धर्माची भरभराट होणें हें त्याच्या योग्य कर्तव्यपालनावर अवलंबून आहे; इन्द्रासही त्यांचें स्वर्गातील श्रेष्ठत्व ब्रह्मचर्यानेंच प्राप्त झालें; स्नातकाची योग्यता राजापेक्षांही श्रेष्ठ होय ; प्रत्यक्ष सूर्यनारायणाचें तेजही स्नातकापासूनच त्यास प्राप्त झालें आहे, वगैरे तऱ्हेचे चे विचार ब्रह्मचर्यामध्यें विद्यार्थ्यांच्या कानावर पडत त्यामुळें त्यांच्या ठायीं स्वाभिमानाचा चांगलाच परिपोष होई. विद्यार्थी आत्मविश्वासी व्हावेत याबद्दलही पुष्कळ खबरदारी घेण्यांत येई. योग्य तऱ्हेनें कर्तव्यपालन करणाऱ्या ब्रह्मचाऱ्यास परमेश्वरी साहाय्य मिळतें, असें उपनयनामध्येंच विद्यार्थ्यास आश्वासन देण्यांत येई. दारिद्र्यामुळें हल्ली प्रमाणें विद्यार्थ्यांचा धीर खचत नसे; कारण भिक्षानिर्वाहच विद्यार्थ्यांना सर्वांत भूषणभूत होय अशी घोषणा शिक्षणशास्त्रज्ञ नेहमीं करीत असत, व आठवड्यांतून एक वेळही भिक्षा न मागणाऱ्यासच प्रायश्चित्तही देण्यांत येई. फुरसतीच्या वेळीं काम करण्यास तयार असलेल्या कोणाही विद्यार्थ्यास शिक्षण हक्कानें माग-

तां येई, व मिळे. स्वावलंबनाच्या संवयीमुळें विद्यार्थ्यांचा आत्मविश्वासही वाढे. 'पुढे काय होईल' या चिंतेनेही आत्मविश्वास नाहीसा होत नसे; धंदेशिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यास त्याचा धंदा असेच; निरनिराळ्या धंद्यांमध्यें गुदमरण्याजोगी गर्दीही झालेली नव्हती. वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांचें द्रव्यार्जन हें ध्येयच नसे; सर्वांत निष्किंचन श्रोत्रियास समाज सर्वांत अधिक मान देई. श्रोत्रिय ब्राह्मणांच्या गरजा थोड्या असत; ते अल्प वेतनावर संतुष्ट असत व तेवढे त्यांना मिळे हें आपण मागें पाहिलेंच आहे. सारांश, सर्व परिस्थिति आत्मविश्वासाच्या विकासास अनुकूल अशीच होती. आत्मसंयमनावर कसा विशेष जोर देण्यांत येई, हें आपण मागें पाहिलेंच आहे. आत्मसंयमनाच्या अभावानें दुर्गुण बळावतात, व परिपोषामुळें सद्‌गुण फोफावतात; म्हणून त्यावर जो जोर देण्यांत येई तो बिलकुल अनाठायीं नव्हता.

रहाणी साधी असावी व योग्य तो इंद्रियनिग्रह असावा एवढीच शिक्षणशास्त्रज्ञांची अपेक्षा होती. ब्रह्मचाऱ्यानें उपास करावयाचे नव्हते; भरपूर जेवावयास त्यास परवानगी होती; फक्त जेवण साधें असावें एवढाच निर्बन्ध होता. कपडे भरपूर वापरा पण छानछोकीचे वापरूं नका; करमणुकींत कांही वेळ घालवा, पण चावटपणा करूं नका, असें धर्मशास्त्राचें म्हणणें होतें. पुढे संन्यास घ्यावयाचा म्हणून नव्हे, तर विवाह करावयाचा याकरितांच विद्यार्थ्यानें ब्रह्मचर्य अस्खलित पाळावयाचें असे. स्वाभाविक शक्ति किंवा मनोवृत्ति दडपून टाकण्याचा शास्त्रकारांचा हेतु नव्हता; आत्मसंयमनाचा उद्देश शारीरिक व बौद्धिक शक्तींचा योग्य परिपोष व विकास होण्यास मदत व्हावी एवढाच होता.

सारासार विवेक, योग्यायोग्य विचार, ग्राह्याग्राह्यज्ञान, वगैरे गुणही वाङ्मयात्मक विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं चांगले विकास पावत. न्याय, मीमांसा, वेदान्त काव्यशास्त्र, वगैरे विषयांमध्यें अनेक विवादविषय असत. विद्यार्थी शास्त्रार्थांमध्यें स्वपक्षमंडन व परपक्षखंडन करीत असत; त्याकरितां प्रथम साधक बाधक प्रमाणांची चांगली छाननी त्यांना करावी लागे, व त्यामुळें त्यांची विवेचक शक्ती चांगली विकसित होई.

असो; आत्मविश्वास, स्वाभिमान, मन:संयमन व विवेचक शक्ति यांचें शिक्षणक्रमांत योग्य संवर्धन होत असल्यामुळे विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा व सद्‌गुणांचा विकास होण्यास चांगली संधि मिळे.[१] प्रत्यक्ष व्यवहारांत हें ध्येय कितपत साधत असे हें सांगणें कठीण आहे. प्राचीन हिंदुस्थानांत आत्मविश्वासाचे कर्तबगार पुरुष पुष्कळ होऊन गेले; पण सामान्य लोकांमध्यें आत्मविश्वास व व्यक्तिमत्त्व हीं कितपत असत हें सांगणें कठीण आहे. ज्ञानाच्या निरनिराळ्या शास्त्रांमध्यें व कर्तबगारीच्या निरनिराळ्या क्षेत्रांमध्यें हिंदूंनी जी प्रगति केली होती, व जें यश मिळविलें होतें, त्यावरून आत्मविश्वास, स्वाभिमान, वगैरे गुणांचा बहुजनसमाजांत चांगलाच परिपोष झाला असला पाहिजे असें अनुमान काढण्यास हरकत दिसत नाही. मध्ययुगाच्या शेवटीं ही परिस्थिति बदलली. बालविवाह प्रचारांत आल्यामुळें खऱ्या ब्रह्मचर्याचा व त्यामध्यें परिपोष होणाऱ्या सद्‌गुणांचा लोप झाला; श्रुतिस्मृतिपुराणाबद्दल वाटणारा आदर बेसुमार वाढल्यामुळें विवेचक शक्ति ऱ्हास पावूं लागली; चिरकालीन परकी अमलाने व धार्मिक जुलूमाने स्वाभिमान व आत्मविश्वास हे नाहीसे होऊं लागले. या कारणसमुच्चयामुळें ब्रिटिश अंमलाच्या प्रारंभीं जुन्या तऱ्हेनें पढलेल्या पंडितांपैकी सर्वांमध्यें पूर्वीचें तेज, आत्मविश्वास, स्वाभिमान व विवेचक शक्ति ही दिसून आलीं नसतील; पण तेवढ्यावरून पूर्वीचेही पंडित तसेच होते, असें अनुमान करणें चुकीचें होईल.

सामाजिक व नागरिक कर्तव्यांकडेही विद्यार्थ्यांचें विशेष लक्ष वेधण्यांत येई.[१] स्नातकाने आपलपोटेपणा टाकून समाजाच्या हिताकडे लक्ष द्यावयाचें असे. संस्कृति व वंश टिकावा म्हणून गृहस्थाश्रमी बनून त्यानें आपल्या मुलांना उत्तम शिक्षण द्यावयाचें असे. पुत्र, पति व पिता या तीन्ही नात्याचीं कर्तव्यें त्याने सदसद्विवेकबुद्धीस स्मरून करावयाचीं

---

१ स्वदेशाभिमान या सद्गुणाचा विकास करण्याकडे हिंदु समाजधुरीणांचें लक्ष नव्हतें हें कबूल करावें लागेल. राजसत्तेचा व समाजसंस्थांचा फारसा निकट संबंध नाही, अनेक राज्यें मोडून गेलीं, तरी समाजसंस्था तशाच टिकतात अशा विचारसरणीमुळें स्वदेशाभिमानसंवर्धनाकडे लक्ष दिलें गेलें नाही असें वाटतें. ही प्राचीन विचारसरणी तर्कदुष्ट आहे हें सांगण्याची जरूर नाही.

असत. आपण निढळघा घामाने मिळवलेल्या द्रव्यावरही सर्वस्वी आपला हक्क नाही; आर्त, दरिद्री, व शेजारी यांच्याकरितां त्याचा कांही हिस्सा तरी काढून ठेवला पाहिजे, याकडे त्याचें लक्ष वेधण्यांत येई. गुरूची रजा घेतांना वरील गोष्टीबद्दल जो त्यास उपदेश करण्यांत येई, तो खरोखरच फार उदात्त व हृदयस्पर्शी आहे यांत संशय नाही.[१]

समाजाचा घटक या दृष्टीने प्रत्येक व्यक्ति कार्यक्षम असावी, हाही एक शिणक्षपद्धतीचा उद्देश होता. समाजाने जातिभेद व जातिनिष्ठ व्यवसाय हीं तत्त्वें मान्य केलीं होतीं; त्यामुळें प्राचीन हिंदुस्थानांत प्रत्येक मुलास त्याच्या अनुवंशिक धंद्याचें शिक्षण मिळे. या पद्धतीने कांही कर्तबगार तरुणांना योग्य कार्यक्षेत्र मिळालें नसेल, हें निस्संशय खरें आहे; पण तिने सामान्य प्रतीच्या मुलांची सोय चांगली होत असे, हें कबूल करावें लागेल. शिवाय कर्तबगार व धाडशी तरुणांना आपला अनुवंशिक धंदा सोडून आवडेल तो धंदा करण्यास प्रत्यक्ष व्यवहारांत जातिभेदामुळे आडकाठी येत नसे, हे आपण मागे पाहिलेंच आहे. सामान्य प्रतीच्या तरुणाने अनुवंशिक धंदा चालवणें बरें, व कर्मविभागानेच समाजाचें कल्याण होईल, असें हिंदू समाजशास्त्रज्ञांचें मत होतें.

परंपरागत-प्राचीन-संस्कृति-संरक्षण हें शिक्षणपद्धतीचें मुख्य ध्येय होतें. अनेक शतकें काळजीपूर्वक जतन केलेलें वाङमय व संस्कृति अविच्छिन्न स्वरूपांत भावी पिढीस प्राप्त व्हावीत, अनुवंशिक धंद्यांतील कसब बापाकडून अगर योग्य गुरूकडून मुलास प्राप्त होऊन त्याच्याकडून त्यास तें पुढील पिढीस मिळावें, याबद्दल शिक्षणपद्धतीचा फार कटाक्ष असे. वेद अपौरुषेय मानले जात, व त्यांचा नाश होऊं नये म्हणून सर्व त्रैवर्णिकांनी वेदाध्ययन शक्य तर बारा वर्षें करावें असें सांगण्यास स्मृती कचरल्या नाहीत. हा नियम अर्थात् पाळण्यांत आला नाही, पण तो होता म्हणूनच ब्राह्मणांपैकी कांहींनी तरी वेदसंरक्षणाच्या कामास आपणास वाहून घेतलें. या वैदिक ब्राह्मणांच्या परिश्रमाचें कौतुक करावें तितकें थोडेंच होईल. आपणास जरी अर्थ समजला नाही, तरी इतरांस पुढें मागे उपयोग होईल, म्हणून त्यांनी आपलें सर्व आयुष्य वेदमंत्र कंठगत

---

१ तै. उ, १.११.

करण्यांत घालविलें. वेदपठनापासून आर्थिक फायदाही श्रमाच्या मानानें कांही विशेष नव्हता, तेव्हा वैदिक ब्राह्मणांचें विद्याप्रेम खरोखर निस्सीम व निरपेक्ष होतें यांत शंका नाही. न्याय, व्याकरण, मीमांसा, वेदांत, वगैरे विषयांच्या अध्ययनामध्यें संस्कृतिरक्षण व प्राचीन ग्रंथसंगोपन हें ध्येय प्राधान्यानें होतें. या शास्त्रांतील प्राचीन ज्ञान टिकावें, व त्याचें संवर्धन व्हावें, याबद्दल विद्यालयांचे सर्व प्रयत्न होत असत. द्रव्यार्जन हा फार तर अत्यंत गौण हेतु होता, असें म्हणतां येईल. 'यस्यागमः केवलजीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजं वदन्ति' हें याबद्दलचें कालिदासवचन मागें आपण पाहिलेंच आहे.

विद्यार्थ्यांनी अनेक विषय अभ्यासावयाची प्रथा पडली तर ते कच्चे राहतील, व त्यामुळें प्राचीन संस्कृति व वाङ्मय जसें उत्कृष्टपणें जतन व्हावें, तसें होणार नाही, म्हणून विद्यार्थ्यांनी थोडेच विषय शिकण्यास घ्यावेत, पण त्यांचें अध्ययन सांगोपांग करावें, अशी मागें पद्धत होती. 'एक घड ना भाराभर चिंध्या' अशा तऱ्हेचें अद्यापही जुन्या तऱ्हेनें पढलेल्या पंडितांचें ज्ञान नसतें, हें कोणालाही कबूल करावें लागेल.

वेदांची भाषा दुर्गम असल्यामुळें व वेदान्ताची मांडणी कठीण असल्यामुळें पुढे ज्या वेळीं सामान्य जनसमूहास त्यांमधील ज्ञान व सिद्धांत समजेनासें झालें, तेव्हा त्यांच्या उपयोगाकरितां पुराणग्रंथ लिहिण्यांत येऊं लागले. धर्म, नीतिशास्त्र, व तत्वज्ञान यांतील महत्त्वाचे सिद्धांत सोप्या भाषेंत सांगून या ग्रंथामध्यें गोष्टींच्या साहाय्यानें ते विशद करून लोकांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केलेला आहे. पुढे पुराणांतील सोपी भाषाही जेव्हा समाजास समजेनाशी झाली, तेव्हा त्यांचा अर्थ लोकभाषेंत समजून सांगण्याचें काम कांही ब्राह्मणांनी वृत्ति म्हणून सुरू केलें. त्यामुळें स्त्रिया व सामान्य लोक जरी संस्कृतानभिज्ञ होते, तरी त्यांना आपल्या धर्माची, नीतिशास्त्राची, तत्वज्ञानाची व संस्कृतीची सामान्य रूपरेखा चांगली माहीत असे. पुढे मध्ययुगांत संत कवींच्या कार्यांचाही तोच परिणाम झाला. संस्कृतीचें जतन व्हावें म्हणून अशा तऱ्हेची खटपट विद्वान् लोकांकडून एकसारखी होत असे व त्यामुळें शिक्षणपद्धतीचें हें ध्येय चांगलेंच साधलें, हें कोणासही कबूल करावें लागेल. वैदिक वाङ्मय

एवढें अफाट, पण तेंही जवळ जवळ सर्व एका स्वराचाही कोठें फरक न होतां जसें होतें तसें आजतागायत जतन झालेलें आहे. लेखनकलेचें माहात्म्य न घेतां हें कसें घडवून आणलें, याचा अचंबा वाटल्याशिवाय रहात नाही. वेदोत्तरकालीन ग्रंथांपैकीही नष्ट झालेल्या महत्त्वाच्या ग्रंथांची संख्या फारशी मोठी नाही. अनेक मठ व देवालयें व त्यांतील पुस्तकालयें यांचा मुसलमानी मूर्तिभंजकांकडून जर विध्वंस झाला नसता, तर नष्ट झालेल्या ग्रंथांची संख्याही हल्लीपेक्षा फारच लहान दिसली असती.

हिंदुस्थानांतील निरनिराळया व दूरदूरच्या प्रांतांत भाषाभेद, वंशभेद, वगैरे असूनही संस्कृतीचें सामान्य स्वरूप जें सारखेंच दिसतें,त्यास कारण म्हणजे प्राचीन शिक्षण पद्धतीने संस्कृतिसंरक्षणावर दिलेला भर हेंच होय. समान धार्मिक आचार,समान नैतिक कल्पना, समान तत्त्वज्ञान-विषयक परंपरा, हिंदुमात्राविषयीं बंधुभाव, काश्मीरपासून कामोरीन-पर्यंतच्या देशाच्या पावित्र्याची व आत्मीयतेची जाणीव, वगैरे कारणामुळें हिंदुमात्रामध्यें राष्ट्रीय ऐक्याची भावना उत्पन्न होण्यास जी मदत होते तिचें श्रेय शिक्षणपद्धतीस दिलें पाहिजे हें निर्विवाद होय.

हिंदु शिक्षणपद्धतीत दोष कोणते होते, ते आता पाहूं.

धर्माचा पगडा हिंदु मनावर फार असतो, हें सर्वश्रुतच आहे. शिक्षण-पद्धतीवरही धर्माची बरीच छाया पडलेली आहे, व त्यामुळें सार्वत्रिक उपनयन व शिक्षण वगैरे सारख्या कांही चांगल्या गोष्टीही घडून आल्या होत्या. पण चांगल्या बरोबर कांही वाईट परिणामही शिक्षणपद्धतीवरील धर्माच्या पगड्याने घडून आले आहेत, हें कोणाही निःपक्षपाती इतिहास-कारास कबूल करावें लागेल.

हिंदु शिक्षणपद्धतीवर धर्माची घनदाट छाया पसरल्यामुळें तिचें ध्येय ऐहिकव्यापारक्षमतेऐवजी परलोककल्याणसाधन हें झालें असा पुष्कळांचा समज आहे, पण तो बरोबर नाही हें प्रथम नमूद करणें जरूर आहे. वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांचें ध्येय पारलौकिक आहे, पण ब्रह्मचर्याचें नाही. आपल्या आश्रमाचे नियम पाळले, म्हणजे ब्रह्मचाऱ्यास मोक्ष मिळतो, अशा तऱ्हेचीं विधानें आढळतात हें खरें, पण ब्रह्मचर्या-श्रमाचे जे नियम आहेत त्यांचा हेतु मन त्रिगुणातीत करण्याचा नसून

विद्यार्थी गृहस्थाश्रमाच्या व ऐहिक व्यवहाराच्या दृष्टीने कार्यक्षम बनव-ण्याचा आहे हें वर स्पष्ट करून दाखवलेंच आहे. परलोकावर दृष्टि ठेवून हिंदु शिक्षणपद्धति बनवलेली होती, या म्हणण्यांत विशेष सत्य मुळीच नाही.

वाङमयात्मक शिक्षणाचे बहुतेक शिक्षक प्राचीन काळी ब्राह्मण होते. यूरोपमध्येंही अकराव्या शतकापर्यंत मठाधिपांच्या हातांतच शिक्षण होतें, तेव्हा हिंदुस्थानांतील परिस्थिति कांही अनन्यसाधारण नव्हती. आपल्या हातांत शिक्षण असल्याचा गैरवाजवी फायदा घेऊन ब्राह्मणांनी आपल्या पोळीवर तूप ओढण्याचाही प्रयत्न केला नाही. पण ते स्वतः पुरोहित वृत्तीचे असल्यामुळें त्यांच्याकडून, न कळत कां होईना, वेदवेदान्तादि-कांच्या अध्ययनावर अधिक जोर देण्यांत येऊं लागला. त्यामुळें इतिहास गणित, भौतिकशास्त्रें, यांच्या अध्ययन-अध्यापनाकडे जितकें लक्ष देणें जरूर होतें तितकें दिलें गेलें नाही. पण यूरोपमध्येंही त्या वेळीं अशीच परिस्थिति होती हें येथे नमूद केलें पाहिजे. मठपतींच्याच हातीं अकराव्या शतकापर्यंत शिक्षण राहिल्यामुळें बायबल, धर्मपर कविता, व ख्रिस्ती साधूंचीं चरित्रें, यांवरच शाळांमध्यें भर देण्यांत येई. ऐहिक कार्यक्षमतेवर शिक्षणपद्धतीने जोर दिला पाहिजे, आत्मा, स्वर्ग, नरक, परमेश्वर वगैरे सर्व नसले, तरीही तरुणांना शिक्षण देण्याची आवश्यकता आहे, असें प्रथम ल्यूथरने प्रतिपादण्यास युरोपमध्यें सुरुवात केली. ऐहिक कर्तव्य-क्षमता हा उद्देश हिंदुस्थानांत ल्यूथरच्या पुष्कळ आधी मान्य झाला होता, हें वर दर्शविलेंच आहे.

इसवी सनानंतर कांही शतकांनी हिंदुस्थानमध्यें वचनप्रामाण्याचें जें अतिशय प्रस्थ माजलें,व तर्कशुद्ध सिद्धान्तांना हीन लेखण्यांत येऊं लागलें, त्याची बरीचशी जबाबदारी पुरोहित वर्गाच्या हातीं शिक्षण गेलें होतें या परिस्थितीवर टाकणें भाग आहे. फार प्राचीन काळीं वचनप्रामाण्याचें इतकें स्तोम नव्हतें. उपनिषदांतील ऋषी तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन करितांना स्वतःच्या बुद्धीला किंवा अनुभवाला पटतील, किंवा योग्य दिसतील, तेच सिद्धान्त मांडीत. वेदांमध्यें किंवा ब्राह्मण ग्रंथांमध्यें जे तत्त्वज्ञानविषयक सिद्धांत आढळतात, त्यांना अनुसरून आपलें म्हणणें आहे की नाही, याची ते फिकीर फारशी बाळगीत नसत. सांख्य, मीमांसा व न्याय या

तत्त्वज्ञानपद्धतींत तर जगन्नियंत्या परमेश्वराचेंही उच्चाटण करण्यांत आलें आहे; आणि तरीही या पद्धतींना वेदबाह्य मानण्यांत येत नव्हतें. यावरून बुद्धीस पटेल तें प्रतिपादण्याची, ज्यांना आपण पुराणमताभिमानी म्हणतो अशा लोकांमध्येंही, कशी प्रवृत्ति होती, तें चांगलेंच दिसून येईल. इ. स. पू. सातव्या शतकांत सुमारें त्रेसष्ट तत्त्वज्ञानपद्धती प्रचलित होत्या; यावरून त्या वेळी वचन प्रामाण्यास किती थोडें महत्त्व देण्यांत येई तें चांगलें समजून येईल.

दुर्दैवाने इ. स. पू. सहाव्या शतकानंतर वेद, ब्राह्मण, व उपनिषदें वगैरे ग्रंथ अपौरुषेय मानण्यांत येऊ लागले व त्यामुळें त्या ग्रंथामधील सिद्धांत तेवढे खरे, तद्विरुद्ध सर्व खोटे, असें समजण्याची प्रवृत्ति समाजामध्यें बळावूं लागली. पुढे जेव्हा स्मृती, पुराणें वगैरे ग्रंथ निर्माण झाले, तेव्हा ते साक्षात् अपौरुषेय नसले, तरी ईश्वरी प्रेरणेने लिहिले आहेत, अशी समजूत रूढ झाली. त्यामुळें वेद, ब्राह्मण, उपनिषदें, स्मृती व पुराणें यांचें महत्त्व फार वाढलें; व एखादें मत ग्राह्य कीं आग्राह्य हें त्याच्या तर्कशुद्धतेवर अवलंबून न राहतां, श्रुतिस्मृप्रतिपादित सिद्धान्ताशीं तें जुळतें की नाही या कसोटीवर त्याची युक्तायुक्तता ठरवण्यांत येऊं लागली. शंकर, रामानुज, वगैरे सारख्या पंडितांना आपल्या तत्वज्ञानपद्धति स्मृतिप्रतिपादित सिद्धांतांशीं कशा जुळतात, हें सिद्ध करण्याकडे आपल्या बुद्धीचें फार मोठें बळ खर्च करावें लागलें. श्रुतिस्मृतीच्या बाहेर जावयाचें नाही, ही मुख्य अट असल्यामुळें अर्थाचा निष्कारण कीस काढण्याकडे प्रवृत्ति वाढली व तत्वज्ञानाचा स्वाभाविक विकास खुंटला.

अशी परिस्थिति झाल्यामुळे स्वतंत्र विचार प्रतिपादण्याची । स्वतंत्र शोध करण्याची प्रवृत्ति दिवसेंदिवस नष्ट होऊं लागली. येथे एक प्रत्यक्ष उदाहरण देऊं, म्हणजे वरील विधानाची सत्यता सर्वांस पटेल. ज्या वेळी ज्योतिषशास्त्रामध्यें विशेष प्रगति झालेली नव्हती त्यावेळीं चंद्रसूर्यांना राहुकेतुनामक राक्षसांनी ग्रासल्यामुळें ग्रहणें होतात असा समाजांत समज होता. दुर्दैवाने या मतास पुराणामध्यें स्थान मिळाले व त्यामुळें जेव्हा ग्रहणाची खरीं कारणें ज्योतिषशास्त्रज्ञास अवगत झाली तेव्हा देखील त्यांवर लोकांचा विश्वास बसणें अशक्य होऊन गेलें. पृथ्वीच्या

छायेमुळें ग्रहणें लागतात, हा महत्त्वाचा शोध आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त, वराह-मिहिर वगैरे हिंदु ज्योतिषांनी सुमारें १५०० वर्षांपूर्वीच लावला होता. पण राहुकेतुकल्पना चुकीची, व नवा सिद्धांत खरा, हें बहुजन समाजास पटवून देण्यास जी चळवळ करावयास पाहिजे होती, ती ज्योतिष-पंडितांच्या हातून झाली नाही. श्रुतिस्मृतींबद्दल वाटणाऱ्या आदरामुळें या पंडितांनी सत्यज्ञानप्रसारार्थ खटपट केली नाही एवढेंच नव्हे, तर सत्यसिद्धांत ते लोकांपासून दडवूनही ठेवूं लागले. उदाहरणार्थ ब्रह्मगुप्ताला ग्रहणांचीं खरीं कारणें माहीत होतीं, व त्यांच्याच साहाय्याने त्याने ग्रहणांचे विवेचन केलें आहे. पण ब्रह्मसिद्धांताच्या पहिल्या अध्यायांत बहुजनसमाजांत सवंग लोकप्रियता मिळावी म्हणून 'राहुकेतूंनी ग्रासल्या-मुळें ग्रहणें लागतात हेंच मत खरें आहे, कारण अपौरुषेय वेद व ऋषिप्रणीत मनुस्मृति व गर्गसंहिता या ग्रंथांमध्यें तेच मत प्रतिपादन केलें आहे, व तें खोटें कसें असेल, असें प्रतिपादण्यास ब्रह्मगुप्त मागे पुढे पहात नाही.[१] पण एवढ्यावर सुद्धा ब्रह्मगुप्त थांबत नाही. आर्यभट्ट, वराहमिहिर, श्रीषेण, विष्णुचंद्र, वगैरे ज्योतिष्यावर पृथ्वीच्छायेने ग्रहणें लागतात, हा श्रुतिस्मृतिबाह्य सिद्धांत प्रतिपादन केल्याबद्दल तो आग पाखडण्यास कमी करीत नाही! केवढा हा अप्रामाणिकपणा! पण त्यास कारण म्हणजे, श्रुतिस्मृतींत लिहिलेलें तें खरें, असें मानण्याची जी समाजांत प्रवृत्ति होती तिला दुजोरा देऊन सवंग लोकप्रियता मिळवण्याचा मोह ब्रह्मगुप्तास आवरतां येईना हेंच होय. बृहत्संहितेंत एके ठिकाणी वराह-मिहिराने राहुकेतु कल्पना कशी खोटी हें विशद केलें आहे,[२] पण पुढें श्रुतिस्मृतींत तिचा पुरस्कार केला असल्यामुळें, तिचाही वाटला तर

---

१ ब्रह्मसिद्धांत हल्ली उपलब्ध नाही, पण त्यामधील वरील आशयाचें अवत-रण अल्बेरुनीने आपल्या ग्रंथांत दिलें आहे. भा. २, पान ११०.

२ यदि मूर्तो भविचारी शिरोऽथवा भवति मंडली राहुः।
भगणार्धेनान्तरितो गृह्णाति कथं नियतचारः ॥ ५.४.

अथ भुजगेन्द्ररूपः पुच्छेन मुखेन वा स गृह्णाति ।
मुखपुच्छान्तरसंस्थं स्थगयति कस्मान्न भगणार्धम् ॥ ५.६.

लोकांनी अंगीकार करावा असें तो म्हणतो.[१] आर्यभट्ट मात्र पृथ्वीछायेच्या मताचा जोरानें पुरस्कार करितो; पण पुराणांतील मत चुकीचें असें तो फक्त ध्वनित करतो,[२] त्यावर उघड हल्ला चढवीत नाही. पृथ्वीछायेचें कारण ज्योतिषांना गेलीं १५०० वर्षें माहीत असून समाजामध्यें राहुकेतु कल्पना जी रूढ आहे, तिला कारण म्हणजे वचन प्रामाण्याचें माजलेलें स्तोम हेंच होय. ब्राह्मण, बौद्ध व जैन यांनी जो शेतकीवर बहिष्कार घातला व आयुर्वेद विद्यालयांमध्यें शवच्छेदन जें बंद झालें, त्यासही कारण समाजाच्या मनावर धर्माची वाढती पगड हेंच होय. श्रुतिस्मृतींत प्रतिपादिलेले सर्व सिद्धांत यावच्चन्द्रदिवाकरौ पाळलेच पाहिजेत, असें मत प्रबळ झाल्यावर वरील गोष्टी घडणें अपरिहार्य होतें.

पण येथे हें नमूद केलें पाहिजे, की यूरोपमध्येंही या काळीं धर्माची समाजावर अशीच दृढ पगड होती. वचनप्रामाण्याचें प्रस्थ तेथे-ही हिंदुस्थानाइतकेंच माजलेलें होते. गॅलिलियोला आपल्या ज्योतिषा-मधील शोधाबद्दल बराच छळ सोसावा लागला. मध्ययुगामध्यें परंपरेनें आलेलीं मतें व सिद्धांत शिकवावयाचे हेंच शिक्षणसंस्थांचें ध्येय होतें; स्वतः विचार करून आपल्या बुद्धीस पटतील ते सिद्धान्त प्रतिपादण्याची पात्रता विद्यार्थ्यांत यावी, अशी मुळीच कोणाचीही खटपट नव्हती. ल्यूथर हाच युरोपमध्यें विचारस्वातंत्र्याचा पहिला कैवारी होता. आपल्या चळ-वळीच्या प्रारंभी 'जें विचारास पटत नाही तें देवासही मान्य व्हावयाचें नाही' असें तो प्रतिपादत असे; पण आपल्या आयुष्याच्या शेवटी विचार-स्वातंत्र्याचा तो पक्का द्वेष्टा बनला. 'विचारस्वातंत्र्य जसजसें अधिक वाढतें तसतसा मनुष्य अधिक भयंकर राक्षस बनतो' असें तो म्हणूं लागला.[३] पांचव्या शतकापासून पुढे हिंदुस्थानांत विचारस्वातंत्र्य नष्ट झालें हें नमूद करितांना युरोपखंडामध्येंही तें सोळाव्या शतकापर्यंत नव्हतें याकडे इतिहासकाराचें लक्ष वेधणें जरूर आहे. पण दीड दोन हजार वर्षें

१ एवमुपरागकारणमुक्तमिदं दिव्यदृग्भिराचार्यैः ।
राहुः कारणमस्मिन्नित्युक्तः शास्त्रसद्भावः ॥ ५१३

२ यदसज्ज्ञानसमुद्रात्समुध्दृतं देवताप्रसादेन । सज्ज्ञानोत्तमरत्नं मयानिमग्नं स्वमतिनावा ॥ गोलभाग ४९.

३ मन्रो, पान २८, २९.

विचारस्वातंत्र्य हिंदुस्थानांत नांदल्यावर पुढे वचनप्रामाण्याच्या फाजील स्तोमामुळें तें नष्ट व्हावें, याचें कोणासही खेद वाटल्याशिवाय राहणार नाही. उपनिषत्काळीं विचारस्वातंत्र्य होतें, तें पुढे तसेंच राहिलें असतें, तर ज्ञानाच्या विविध शाखामध्यें आपली केवढी प्रगति झाली असती, याचा विचार केला तर या घटनेबद्दल खेद वाटल्याशिवाय रहात नाही.

अनेक शतकेंपर्यंत, संस्कृतीचा पूर्व ठेवा जतन करण्याइतकेंच तो वाढविण्याकडेही विद्वानांचें लक्ष होतें. समाजात पूर्ण विचारस्वातंत्र्य होतें. बुद्धीच्या साहाय्यानें गूढ गोष्टींचें आलोडन करून नवे सिद्धांत मांडण्याची पूर्ण मुभा होती, व तिचा विद्वान् लोक पुष्कळ फायदाही घेत होते. यामुळें तत्त्वज्ञान, भाषाशास्त्र, व्याकरण, ज्योतिष, वैद्यक, वगैरे शाखांमध्यें सुमारें आठव्या शतकाच्या अखेरपर्यंत हिंदूंची चांगली प्रगति होत होती; बहुतेक इतर सर्व देशांमध्यें या ज्ञानशाखांमध्यें जें या वेळीं ज्ञान होतें, त्याच्यापेक्षा हिंदूंचें ज्ञान बरेंच अधिक होतें, हें निस्संशय आहे.

सुमारें नवव्या शतकापासून हिंदुस्थानात नवविचार बंद होऊन नवीन शोधही लागेनासे झाले. निरनिराळ्या ज्ञानक्षेत्रांत दोन हजार वर्षें अनिरुद्ध संचार करून नवनवे शोध लावलेली हिंदूंची बुद्धि या वेळी थकून गेल्यासारखी झाली होती, असें दिसतें. ज्ञानाचा व वाङ्मयाचा पूर्वठेवाच या वेळी एवढा मोठा झाला होता की तो जतन करून ठेवण्यामध्येंच नवीन पिढीचें बहुतेक सर्व शक्तिसर्वस्व खर्च होऊं लागलें. ज्ञानाचें कृतयुग संपलें, या कलियुगामध्ये अव्वल दर्जाचे नवीन ग्रंथ निर्माण होणें शक्य नाही; फार तर पूर्वकालातील अपौरुषेय किंवा ऋषिप्रणीत ग्रंथांवर या युगांत टीका लिहितां येतील, किंवा त्यांच्या सारांश स्वरूपाचे निबंध सोप्या भाषेंत निर्माण करितां येतील असें विद्वानांना वाटूं लागलें. असली मनोवृत्ति असल्यामुळें स्वतंत्र विचाराचे व संशोधनाचे ग्रंथ लिहिण्याची उमेद असलेले तरुण यापुढे हिंदु शिक्षणपद्धतीस उत्पन्न करितां आले नाहीत. गेल्या हजार बाराशें वर्षांमध्यें जुन्या ग्रंथांवर टीका लिहिण्यापलीकडे हिंदु विद्वानांच्या हातून विशेष कांही झालेलें नाही. शेवटीं मात्र हेंही नमूद केलें पाहिजे की या मध्ययुगाच्या काळामध्यें चोहोकडेच स्वतंत्र विचाराचा व संशोधनाचा अभाव [illegible] होता. यूरोपमधील विद्वानांच्या हातून

सोळाव्या शतकापर्यंत मूळ ग्रंथावर टीका करण्याशीकडे विशेष कांही स्वतंत्र स्वरूपाचें काम झालें नाही. रिनैसन्स व रेफर्मेशन् याच्या नंतरच यूरोपमध्यें स्वतंत्र विचारास चालना मिळाली व नवनवीन ज्ञानक्षेत्रांत बुद्धि धडाडीने प्रवेश करून तेथे महत्त्वाचे शोध लावू लागली. हिंदुस्थानांत या वेळी परकी अंमल सुरू असल्यामुळे जुन्या चाकोऱ्यांतून चालत असलेला ज्ञानरथ नव्या मार्गावर जाऊं शकला नाही.

प्राचीन परंपरेबद्दल जो लोकांना या वेळीं अतिशय आदर वाटू लागला होता, त्यामुळे चोकस बुद्धीने निरीक्षण करून, एखादी गोष्ट शिकण्याजोगी आढळली तर ती शिकून, परंपरागत ज्ञान वाढविण्याकडे हिंदु विद्वानांचें या वेळीं बिलकूल लक्ष नसे. पूर्वी असली कूपमंडूकवृत्ती नव्हती. हिंदु शिल्पकारांनी ग्रीक शिल्पकारांची कलापद्धति पाहून, ती हस्तगत करून, तिजपासून योग्य तो बोध इसवीसनाच्या प्रारंभीं घेतला होता. अलेग्झांड्रिया येथील ज्योतिषी काय शोध लावतात, याकडे आर्यभट्ट, वराहमिहिर, वगैरे ज्योतिषांचे नेहमीं लक्ष असे. ग्रीक लोक म्लेच्छ म्हणून त्यांच्यापाशीं शिकण्याजोगें कांही असणें शक्य नाही अशी उत्तरकालीन मनोवृत्ति सातव्या शतकापर्यंत देखील नव्हती. वराहमिहिर म्हणतो:—

"म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक्शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते........॥"

'यवन हे म्लेच्छ हें खरें, पण त्यांचा या ज्योतिषशास्त्राचा व्यासंग मोठा आहे, म्हणून त्यांना आपण ऋषिप्रमाणें मान देतों.'

अशा प्रकारची सत्यान्वेषणवृत्ति या वेळीं विद्वानांमध्यें होती. पण पुढे सुमारें दोन तीनशे वर्षांच्या आंत ती पार मावळली. प्राचीन ज्ञान व परंपरा याबद्दल वाटत असलेल्या फाजील अभिमानामुळे हिंदूंमध्यें या सुमारास कूपमंडूकवृत्ति, अहंकार व दुरभिमान हे फार वाढू लागले. दुसऱ्याकडून किंवा परदेशस्थाकडून कांही शिकतां येणें शक्य आहे हें त्यांना खरेंही वाटेनासें झालें. जुनें ज्ञान आहे तेंच त्रिकालाबाधित सत्य होय, त्यामध्यें वाढ होणें शक्य नाही, तें चुकीचें असणें तर सर्वस्वीं अशक्य आहे अशी समाजाची मनोवृत्ति बनली. अकराव्या शतकांतील हिंदूसंबंधीं अल्बेरुनी म्हणतो, "ते दुराग्रही, मूर्ख व अहंमन्य

आहेत. आपणाशिवाय इतर कोणत्या लोकांमध्यें किंवा आपल्या देशा-शिवाय इतरत्र कोठे ज्ञानाचा किंवा शास्त्रांचा व्यासंग होत असेल, याची कल्पनाही त्यांना शिवत नाही. पर्शियामध्ये किंवा खुरासानमध्यें अमके अमके विद्वान् लोक आहेत, व त्यांची अशीं अशीं मतें आहेत, असें जर कोणी त्याना सांगितलें तर तो मनुष्य असत्यवादी किंवा गाढव असला पाहिजे असा ते निष्कर्ष काढतात. त्यांनी जर ज्ञानार्जनाकरितां बाहेर प्रवास करणें सुरू केलें, किंवा परदेशांत निरनिराळ्या ज्ञानक्षेत्रांत काय घडा-मोडी होत आहेत याचा अभ्यास केला, तर त्यांचा दृष्टिकोन बदलेल.' पूर्वीचे हिंदु लोक अशा मनोवृत्तीचे नव्हते, असें म्हणून तें सिद्ध करण्यास अल्बेरुनीनें, वराहमिहिराने ग्रीक ज्योतिषांच्या स्तुतीपर जे उद्‌गार काढले आहेत ते उद्धृत केले आहेत.[१]

अल्बेरुनीच्या वेळी महंमद गझनीच्या स्वाऱ्या नुकत्याच होऊन गेल्या होत्या, त्यामुळें मुसलमान व मुसलमानी विद्या याबद्दल हिंदूंना द्वेष व तुच्छता वाटणें स्वाभाविक होते. अल्बेरुनीने वरील उताऱ्यांत थोडी अतिशयोक्तीही केली असेल. तथापि या वेळच्या हिंदू विद्वानांचे अल्बेरुनीने रंगविलेलें वरील चित्र बरेंचसें विश्वसनीय आहे, असें मानावें लागतें. या वेळीं हिंदूंना प्राचीन परंपरेबद्दल इतका अभिमान वाटत असे, व श्रुतिस्मृतिपुराणांमध्येंच जगांतील सर्व सत्य साठवलें आहे, याबद्दल इतकी खात्री असे, की वराहमिहिराप्रमाणें ज्योतिषांतील प्राविण्याबद्दल यवनांनाही ऋषीप्रमाणें मान देणारा एखादा तरी विद्वान् त्यांच्यामध्यें साप-डला असता की नाही, याबद्दल जबरदस्त शंका वाटू लागते. दूषित पूर्वग्रहांचें निराकरण करणें, निराधार परंपरेला सोडून देण्याचें मनोधैर्य उत्पन्न करणें, शक्य त्या सर्व बाजूंनी व उपायांनी ज्ञानवृद्धि करून घेण्याची लालसा उत्पन्न करणें, वगैरे कार्य या वेळीं हिंदु शिक्षणपद्धतीच्या हातून होईनासें झालें होतें. माणिक्य, धन्वंतरि, वगैरे वीस पंचवीस वैद्य इ. स. ८००च्या सुमारास खलिफा हरूनच्या निमंत्रणावरून बगदादला गेले होते हें खरें, पण त्यांचें कृत्य समाजास आवडलें की काय, ते परत हिंदुस्थानांत आले की नाही, आले असल्यास त्यांना जातिबहिष्कृत केलें

---

१ मागे पान १९५ पहा

की काय, याबद्दल कांहीच माहिती मिळत नाही. पण हें निर्विवाद आहे की यापुढच्या कालांत परदेशामध्यें वसाहती करितां किंवा ज्ञानार्जनाकरितां जाणें हिंदुस्थानांत अजीबात थांबलें. वसाहतीकरितां पांचव्या सहाव्या शतकापर्यंत बरेच हिंदू जावा, सुमात्रा, वगैरे बेटांत जात होते. पण त्या वेळीं सुद्धा ज्ञानार्जनाकरितां कोणी जात होतें की नाही याची शंकाच वाटते. संस्कृत वाङमयामध्यें हिंदुस्थानच्या आजूबाजूंच्या देशांच्या भूगोलाची, त्यांतील लोकांच्या इतिहासाची, अगर चालीरीतींची विश्वसनीय माहिती देणारा एकही ग्रंथ नाही. पुराणांमध्यें जी असंख्य भूवर्णनें आहेत त्यांच्या लेखकांपैकी एकाने तरी हिंदुस्थानचा किनारा कधीं काळीं सोडला होता की काय याबद्दल शंका वाटल्याशिवाय राहत नाही.

प्राचीन काळी प्रथमप्रथम हिंदूंना हस्तव्यवसाय व धंदेशिक्षण याबद्दल तुच्छता मुळीच वाटत नसे हें मागें आपण पाहिलेच आहे.[१] हस्तव्यवसाय व वाङमय या दोहोंचेंही तरुणांना शिक्षण देण्यांत येई. धनुर्वेद, आयुर्वेद, धातुशास्त्र, वगैरे शास्त्रांचें अध्ययन ब्राह्मणही करीत. विणकरी लोकही वाङमय, लोककथा, ज्योतिष व तिरंदाजी या विषयांचा आवडीने व्यासंग करीत.[२] पण पांचव्या सहाव्या शतकानंतर ही परिस्थिति बदलली. हस्तव्यवसाय हीन दर्जाचे मानण्यांत येऊं लागल्यामुळें उच्चकुलीन व बुद्धिमान् लोक ते करीनासे झाले. वैश्यलोकांचा दर्जा शूद्रांइतका हीन झाला, व निरनिराळ्या धंद्यांतील लोकांना आपल्या धंद्याशिवाय इतर कांहीच येईनासें झालें. त्यांच्यामधून नवव्या शतकाच्या सुमारास साक्षरतेचेंही उच्चाटन झालें.[३] त्यामुळें नवव्या शतकापासून शिल्पकला, स्थापत्यशास्त्र, चित्रकला, खनिशास्त्र, वगैरे शास्त्रांमध्यें हिंदूंची प्रगती जवळ जवळ थांबल्यासारखी झाली. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत जगांतील जवळ जवळ सर्व व्यापारी पेठा हिंदू विणकऱ्यांच्या ताब्यांत होत्या हें खरें; पण याही धंद्यांत कापड उत्पन्न करण्या-

१ मागे पान ९६, १०० पहा.

२ मागे पान ९५ पहा.

३ मागे पान १२० पहा.

ह्या पद्धतींत गेल्या बाराशें वर्षांत कांही प्रगति झाली असें वाटत नाही. स्पर्धा नसल्यामुळें परदेशी व्यापारी पेठा हिंदूंच्या ताब्यांत राहिल्या एवढेंच.

हिंदूंची ज्या वेळीं ज्ञानक्षेत्रांत चोहोकडे प्रगति होत होती त्या वेळीं समाजाचा बराच मोठा भाग साक्षर होता. प्राचीन अथेन्समध्यें दहांत एकास, व स्पार्टामध्यें पंचविसांत एकास, शिक्षण मिळे; स्त्रीशिक्षणाकडे तेथे मुळीच लक्ष दिलें जात नसे.[१] हिंदुस्थानांत त्रैवर्णिकांमध्यें मौर्यकालीं शेकडा ७५ व गुप्तकाली शेकडा ५० लोक साक्षर होते व स्त्रीशिक्षणाकडेही मौर्यकालापर्यंत थोडें बहुत लक्ष दिलें जाई. पुढे पुढे सर्व स्थिति बदलली. स्त्रीशिक्षण जवळ जवळ बंद पडल्यासारखें झालें.साक्षरतेचें प्रमाण दहाव्या अकराव्या शतकामध्यें शेकडा तीस पर्यंत उतरलें. त्यामुळे स्वाभाविकच समाज कमी कार्यक्षम बनला; ज्ञानामध्यें प्रगति होईनाशी झाली. आता हें खरें की यूरोपमध्येंही मध्ययुगाच्या अखेरपर्यंत बहुजनसमाज निरक्षर व शिक्षणद्वेषी होता. पण त्यामुळें हिंदुस्थानांत एके काळीं साक्षरता इतक्या प्रमाणावर असूनही बाराव्या शतकांत तिचें प्रमाण इतकें कमी व्हावें, याबद्दल वाटावयाचा खेद कांही कमी होत नाही.

पांचव्या शतकांत झालेल्या संस्कृतच्या पुनरुज्जीवनामुळें बहुजन-समाजांतील ज्ञानप्रसाराचें काम अधिक कठीण झालें. जो तो संस्कृतमध्यें ग्रंथ लिहूं लागला; त्यामुळें प्राकृत वाङ्मयाची अभिवृद्धि होणें थांबलें. जोपर्यन्त सामान्य लोकांना संस्कृत साधारण समजत असे, तोपर्यंत या-पासून विशेष अपाय झाला नाही. पण नवव्या दहाव्या शतकापासून प्राकृत व अपभ्रंश या लोकबोलीच्या भाषा संस्कृतपासून इतक्या विभिन्न झाल्या की सामान्य लोकांस संस्कृत समजेनासें झालें. बहुजनसमाजांत ज्ञानप्रसार होण्याकरितां या वेळीं विद्वानांनी प्राकृत वाङ्मयाच्या अभि-वृद्धीकडे लक्ष द्यावयास पाहिजे होतें; पण तसे घडून आलें नाही. कांही कांही शाळांमध्यें मराठी, कानडी, तेलगू, वगैरेसारख्या प्राकृत भाषा शिकवत असत, पण एकंदरीत सर्व गोष्टींचा आढावा काढतां संस्कृतवरच विशेष भर दिला जात असे व प्राकृतची हेळसांड होत असे असें वाटल्या-

१ मन्रो, ए टेक्स्ट बुक ऑफ हिस्टरी ऑफ एजुकेशन्, पानें २६, २९.

शिवाय रहात नाही. अल्बेरुनीचेही मत तसेंच बनलें होतें.[१] यूरोपमध्येंही या वेळी ग्रीक व लॅटिन यांचेंच स्तोम माजलें होते, व सतराव्या शतकापर्यंत सर्व शिक्षण लॅटिनच्याच द्वारें होई हें खरें आहे; पण महावीर व बुद्ध या थोर व दूरदर्शी पुरुषांनी प्राकृत भाषांच्या अभिवृद्धीस जी इ. स. पू. सहाव्या शतकांत चालना दिली होती, ती जर तशीच पुढे टिकली असती, तर बहुजनसमाजामध्यें ज्ञानप्रसार होण्यास फार मदत झाली असती, व त्यामुळें निरनिराळ्या ज्ञानक्षेत्रांतील हिंदूंची प्रगति, झाली त्याच्या पेक्षा पुष्कळच जास्त झाली असती, असे वाटल्याशिवाय रहात नाही.

हिंदू पंडित आपापल्या शास्त्रांचें संपूर्ण अध्ययन करीत, पण इतर शास्त्रांचेही विहंगावलोकन करून ज्ञानशाखांचे परस्पर संबंध व परस्परोपकारित्व यांचा ते फारसा विचार करीत नसत. त्यामुळें वाङ्मय, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, गणित, ज्योतिष, वगैरे विषयांपैकीं प्रत्येकाच्या अध्ययनानें बुद्धिविकासावर काय काय परिणाम होतात याची विशेष चर्चा कोठेंच झालेली दिसत नाही. हल्ली दुय्यम शिक्षणक्रमामध्यें वाङमय, इतिहास, भूगोल, व्याकरण, भौतिक शास्त्रें, वगैरे विषयांच्या मूलभूत तत्त्वांचें विद्यार्थ्यांना थोडें थोडे ज्ञान मिळतें, व त्यामुळें बुद्धीमध्यें थोडी चतुरस्रता आली, म्हणजे मग विद्यार्थी उच्चशिक्षणक्रमामध्यें आवडीच्या विषयाचें विशेषाध्ययन करितात. प्राचीन हिंदुस्थानांत निरनिराळ्या विषयांची मूलतत्त्वें शिकवणारा असा विस्तृत दुय्यम शिक्षणक्रम नव्हता. व्याकरण, तर्कशास्त्र व वाङमय यावर भर दिला जाई व इतिहास, गणित, ज्योतिष, वगैरे विषयांकडे दुर्लक्ष केलें जात असे. यूरोपमध्यें पण या वेळी अशीच स्थिति होती. तेथेंही व्याकरण व विवादशास्त्र यांवर जोर देऊन इतर विषयांकडे दुर्लक्ष करीत. ख्रिस्ती सण केव्हा येतात तें समजण्यास जरूर तेवढेंच गणित विद्यार्थ्यांस शिकवत. भौतिक शिक्षणक्रमामध्यें शास्त्रांचा सुमारें १०० वर्षांपूर्वींच यूरोपमध्यें प्रवेश झाला आहे. दुय्यम शाळांत भौतिक शिक्षण देण्यास जर्मनीमध्यें १८१६ सालीं सुरुवात झाली. १८५६ सालच्या रॉयल कमिशनने फारच विनवणी केली, म्हणून इंग्लंडमधील

---

१ सचौ, भाग १ पान, १८.

कांहीं हायस्कुलांनी वर्षांतून दहाबारा तास भौतिक शास्त्र शिकवण्याचा उपक्रम सुरू केला. लंडन युनिव्हर्सिटीमध्यें फॅकल्टी ऑफ् सायन्सचीही शाखा १८६० मध्येंच उघडण्यांत आली.

हिंदु शिक्षणांतील सर्व दोष वर प्रांजळपणें व निःपक्षपातानें दाख-विले आहेत. त्यांपैकी बरेचसे आठव्या नवव्या शतकाच्या पुढें उत्पन्न झाले आहेत. लोकभाषेंतून शिक्षणाचा अभाव, शास्त्रीय शिक्षणाकडे दुर्लक्ष, वगैरे दोष युरोपमध्येंही परवापरवापर्यंत होते. प्राचीन हिंदु शिक्षणपद्धतीचें गुणदोषविवेचन करितांना आपल्या मनश्चक्षूपुढें हल्लीची पाश्चात्य शिक्षणपद्धति येणें अपरिहार्य असतें; पण आपण हें ध्यानांत ठेवलें पाहिजे, की युरोपमध्यें गेल्या तीनशे वर्षांमध्यें ज्ञानशाखांची व शिक्षणाची एक सारखी प्रगति होत आहे, पण हिंदुस्थानांत गेल्या हजार वर्षांमध्यें परकीय अंमल व त्यांचे स्वाभाविक दुष्परिणाम यामुळें ज्ञानाचा एकसारखा ऱ्हास होत आहे. मुसलमानी अंमलाचा हिंदू ज्ञानविकासावर काय परिणाम झाला, याबद्दल एका मुसलमानाचेंच मत येथें उद्धृत करूं. अल्बेरुनी म्हणतो, "( राजसत्तेचा आश्रय व प्रोत्साहन नसल्यामुळें ) हल्लीचा काळ ज्ञानवृद्धीस बिलकुल अनुकूल नाही. हिंदुस्थानांत या वेळीं एखादें नवें शास्त्र उत्पन्न होणें किंवा नवा शोध लागणें ही गोष्ट अशक्य आहे. पूर्वीच्या काळीं जें ज्ञान अवगत होतें, त्याचे थोडे अवशेष मात्र हल्लीं शिल्लक राहिले आहेत.[१]" सतराव्या शतकांतील काशींतील विद्यापीठासंबंधीं लिहितांना बर्नियर म्हणतो, 'काशीमध्यें १०–१२ वर्षे मुलें अध्ययन करितात, पण सर्वच काम फार संथपणें चालतें. राजाकडून सन्मान होईल, किंवा हुशार विद्यार्थ्यांना पारितोषिकें मिळतील, अशी कांहीच आशा नसल्यामुळें अभ्यास करण्यामध्यें मुलांना कांहीच हुरूप वाटत नाही.'[२] १८८२ च्या एजुकेशन कमिशनच्या बंगाल शाखेचा रिपोर्ट म्हणतो, "मुसलमानी सत्तेचा हिंदु शिक्षणावर फारच भयंकर परिणाम झाला. हिंदूंच्या मालकीच्या बऱ्याच जमिनी गेल्या. राजभाषा बदलली. हिंदु शिक्षणाचे बहुतेक आश्रयदाते नाहीसे झाले. संपन्न हिंदु

---

१ अल्बेरुनी, १, पान २५२.

२ पान २४४.

लोक जेत्यांची भाषा व वाङमय शिकूं लागले. संस्कृत शाळांमध्यें पुरोहितांची मुलें तेवढीं जाऊं लागलीं; उच्च व मध्यम हिंदु वर्गातील मुलें मुसलमानी शिक्षकांच्या हाताखालीं उर्दू शिकूं लागली, त्यामुळें संस्कृत पाठशाळा जवळ जवळ ओस पडून गेल्या.[१]"

गेल्या हजार वर्षांत हिंदु शिक्षणाची व ज्ञानशाखांची किती दुर्दशा झाली आहे हें वरील तीन निःपक्षपाती साक्षीदाराच्या मतांवरून दिसून येईल, त्यामुळें तीनशे वर्षे एकसारखे अनुकूल परिस्थितीत फोफावलेल्या युरोपियन ज्ञानवृक्षाची हजार वर्षे परकी अंमलाच्या विषारी वातावरणामुळे बऱ्याचशा वठून गेलेल्या हिंदु ज्ञानवेलीशी तुलना करणें समजस होणार नाही. निःपक्षपाती इतिहासकारांस हें कबूल करावें लागेल, की हिंदु संस्कृतीच्या उत्कर्षाच्या काळीं शिक्षण बहुतेक सर्व वर्गांत फैलावलेलें होतें, व स्त्रियांनाही तें मिळत असे. जें शिक्षण दिलें जात असे त्यामुळें शीलसंवर्धन व सद्गुणपरिपोष होऊन, व्यक्तिमात्रांचीं समाजिक व कौटुंबिक कर्तव्यें प्रत्येकास कळत, व आपापला धंदा चालवून उदरनिर्वाह करण्याची पात्रता अंगीं येई. प्राचीन ज्ञान, संस्कृति, व वाङमय याचें शिक्षणामुळे संगोपन झालें व त्यांमध्यें बराच काल पर्यंत वेळोवेळी भरही पडत गेली. विचारस्वातंत्र्य, गुरुकुलपद्धति, प्रत्येक विद्यार्थ्याकडे वैयक्तिक लक्ष, साधी रहाणी व उच्च विचारसरणी, सार्वत्रिक शिक्षण, वाङमयात्मक व उपयुक्त शिक्षणाची सांगड,—वगैरे ज्या तत्त्वांवर प्राचीन शिक्षणपद्धति अधिष्ठित होती, तीं तत्त्वें सत्य व उपयुक्त आहेत व परिस्थतीप्रमाणें थोडा बहुत फेरफार करून जर त्यांवर आजही कोणी शिक्षणपद्धति बसवील तर ती कार्यक्षम व फलदायी झाल्याशिवाय राहाणार नाही.

—समाप्त—

---

१ पान २.

# संदर्भ ग्रंथांची यादी



## मूलग्रंथ

ऋग्वेद, अथर्ववेद, काठक संहिता, मैत्रायणीय संहिता.

शतपथ ब्राह्मण, गोपथ ब्राह्मण, सामविधान ब्राह्मण.

बृहदारण्यक, छांदोग्य व तैत्तिरीय उपनिषदें.

ऋक्प्रातिशाख्य, तैत्तिरीय प्रातिशाख्य.

निरुक्त, पातंजल महाभाष्य.

मानव, गोभिल, जैमिनि, वाराह व बौधायन गृह्यसूत्रें.

आपस्तंब, वशिष्ठ, बौधायन व गौतम धर्मसूत्रें.

रामायण, महाभारत.

चरक व सुश्रुत संहिता.

कौटिलीय अर्थशास्त्र.

मनु, याज्ञवल्क्य व नारद स्मृति; अपरार्क टीका व मिताक्षरा.

स्मृतिचंद्रिका, आचार व संस्कार कांड.

पराशर माधव.

वीरमित्रोदय, संस्कार प्रकाश.

गाथासप्तशती, रघुवंश, उत्तररामचरित्, हर्षचरित्, काव्यमीमांसा.

महावग्ग, मिलिन्दपण्ह व जातकें.

प्राचीन शिलालेख व ताम्रपट.

## विदेशी प्रवासी व इतिहासकार

मेगॅस्थेनीज, स्ट्रेबो.

Watters : *On Yuan Chwang.*

Takakusu : *Itsing.*

Alberuni : *India Ed. by Sachau.*

## आधुनिक ग्रंथ

**Gile** : *Ibm Batuta.*

**Tavernier** : *Travels in India.*

**Bose** : *Indian Teachers of the Budhist Universities.*

***Report** of the Indian Education Commission 1882.*

**Keay** : *Ancient Indian Education.*

**Das** : *Education System of the Ancient Hindus.*

**Bokil** : *History of Education in India Part I.*



## संकेतात्मक संक्षिप्तें ( Abbreveations )

| | |
|---|---|
| अ. वे. | अथर्ववेद |
| इं. अँ. | Indian Antiquary |
| उ. | उपनिषदें |
| ऋ. वे. | ऋग्वेद |
| ए. इं. | Epigraphia Indica |
| ए. क. | Epigraphia Carnatica |
| गृ. सू. | गृह्यसूत्र |
| ध. सू. | धर्मसूत्र |

(गृह्यसूत्र, धर्मसूत्र) यांच्या पाठीमागील अक्षर विशिष्ट धर्म किंवा गृह्य-सूत्राचें आद्याक्षर असतें, उदाहरणार्थ आ. ध. सू. आपस्तम्ब ध. सू.

| | |
|---|---|
| वी. मि. सं. | वीरमित्रोदय, संस्कार प्रकाश |
| श. प. ब्रा. | शतपथ ब्राह्मण |
| सो. ए. इं. ए. रि. | South Indian Epigraphia Report |
| स्मृ. चं. | स्मृतिचंद्रिका |



# सूची


अग्रहार गांवें-शिक्षणकेंद्रें, १६१-४
अंतर्जातीय भोजन, ८९
अंतेवासी पद्धत, ९२-९४
अध्ययन वृत्ति, १७१
अध्यापक विद्यालयें, ३३
अनुवांशिक धंदे,-शिक्षणावरील परिणाम, ११०, कार्यक्षमतेवरील परिणाम, १८७
अभ्यासक्रम, वाङ्मयात्मक, वैदिक कालीन, ६६-९; इ. स. पू. १०००-ते १ पर्यंतचा, ६९-७२; इ. स. १ ते १२०० पर्यंतचा, ७२-८; त्याची कालमर्यादा, ६०-३; त्याची युरोपांतील लोकप्रियता, १९०; बौद्ध विद्यालयांतलि, ७५-६
अरबलोक व आयुर्वेद, १०४-५
अल्इद्रिसी व हिंदु चारित्र्य, १८२
अल्बेरुनी व ब्रह्मगुप्त १९२; व हिंदु विद्वानांची कूपमंडूकवृत्ति, १९५-६
अशौच नियम, त्यास अपवाद, १६८
अक्षरस्वीकरण संस्कार, २-४
आत्मविश्वास व विद्यार्थी, १८४-५
आयुधजीवी संघ, १०१
आयुर्वेदशिक्षण, ९७-९८, १०१-५
आयुर्वेदोपनयन, २९
आर्यभट्ट, व ग्रहणें, १९२-३
आश्रम विद्यालयें, ५३-४
आश्रमसंस्था, ८-९
आश्वमेधिक व्रत, २२
इंद्रियनिग्रह व विद्यार्थी, ५३, १८५
इब्न बतूता व हिंदु चारित्र्य, १८३
उत्तमगुणपरिपोष, १८४
उत्सर्जन विधि, २६
उपनयन, त्याची प्राचीनता, ५; एकदा का अनेकदा, ६-७; आवश्यक संस्कार, ८-९; अंधमूकांचें, १०; प्रायश्चित्ताकरितां, ११; त्याचा काल, १२-१४; संस्कारवर्ण, १५-२२; स्त्रियांचें, १२४-५; क्षत्रियवैश्यांचें, ८९-९१; आयुर्वेदीय २९; धनुर्वेदीय, २९
उपाकर्म, २२-२६
एन्नायिरम् विद्यालय, १५७-८
ओदंतपुरी मठ, १५५
औद्योगिकशिक्षण, 'धंदेशिक्षण' पहा
करमाफी, १७६
कळास विद्यालय, १६३
कार्यक्षमता, ऐहिक, १८७
क्रमिक पुस्तकें, त्या बद्दल चढाओढ, ७७
खनिशास्त्र, ९९
खरग बंधाई, ३०
गायत्री मंत्र, १९-२१
गुरु, त्याचें महत्त्व, ३१-३४, गृहस्थाश्रमी, ३४-५; त्याची प्राप्ति, ३५-६; त्याची जात, ३४;-शिष्य संबंध, ३८-४६; त्याची विविध कर्तव्यें, ४२; त्याच्या घरचें काम, ४४; व विद्यार्थ्यांस देहदंड, ४४-५.
गुरुकुलपद्धति, ५३-५५
गुरुदक्षिणा, ४०-४२
ग्रहणें, १९१-३
ग्रंथालयें, १४७, १५०, १६२, १७१
ग्रीक ज्योतिष, १९५

ग्रीकभाषेत शिक्षण, १३८–९
घरचा अभ्यास, ४८
चाकेंपट्टी, ७९–८१
चिनपति मठविद्यालय, १५५
चौलसंस्कार व विद्यारंभ, ४–५
छात्रालयें, १५६–६२
छुरिकाबंध संस्कार, २०
जमिनदार व संस्कृत पाठशाळा, १६४
जयेन्द्रमठविद्यालय, १५४
जातिभेद, व धंदे, ८८–९; व उपनयन, ८९-९२; व गायत्री मंत्र, १९–२०, व सामाजिक कल्याण, १८७
जालंदर मठविद्यालय, १५५
टीकालेखन, त्यावर भर, १९१
टोल, १६४
टेनिंग कॉलेजें, ३२–३
तत्त्वज्ञानाचा अभ्यास, ७४–५
तक्षशिला, १३८–४१
तिबेटमध्यें बौद्धधर्मप्रसार, ४९१, १५
तिरुमुक्कुडुल विद्यालय, १५९
तिरुवोरियुर विद्यालय, १६०
तीर्थें, शिक्षणकेंद्रें, १३७
दंड, ब्रह्मचाऱ्याचा, २१
दिनचर्या, विद्यार्थ्यांची, ४८
देवालय विद्यालयें, १५५–१६३
देहदंड, विद्यार्थ्यांना, ४४–५
धनुर्वेदोपनयन, २९
धंदेशिक्षण, व वाङ्मय शिक्षण, ७०; व जातिभेद, ८८–९; निरनिराळ्या कालखंडांतील, ९६–१०९; मध्ययुगांतील अवनति, १११; विद्यालयांचा अभाव ११०; व समाज, ९६; व कारागिरांचें कौशल्य, १००
नागरिककर्तव्यें व शिक्षणपद्धति, १८६–७
नालंदा, १४३–१५०
निधि, १७६
नैष्ठिक ब्रह्मचारी, ६४–५
निबंधन, ९९
परंपरा, व शिक्षणक्रम, ८६–७
परकीयांचें ज्ञान व हिंदु विद्वान, १९६
परीक्षा, ८५–७
पशुवैद्यक, १०५–६
पितृऋण, व शिक्षण, १६८
पुराणें, त्यांचा अभ्यास, ७५
पेशवे, व विद्वानांस दक्षिणा, १७५
पौष्य राजा व स्नातक, १७३
प्रतिभा, तिचा अभाव व त्याचे परिणाम, १९४
प्रवेशपरीक्षा, १४७, १५२
प्राथमिक शिक्षण, ११२–१२१
फी, ४०–४२, प्राचीन ग्रीसमध्यें, ४०
बनारस, १४१–३
ब्रह्मगुप्त, १९२–३
ब्रह्मचर्य, त्याचें महत्व ५, १८४; त्याचा काल, ६०–१; त्याचे नियम, ५१–
ब्रह्मचारी, 'विद्यार्थी' पहा.
ब्रह्मवादिनी, १२५
ब्राह्मण, व वेदाध्यापन, ३३–४; व इतर धंदे, ७०–१, ८८–९; व करमाफी १७६; शिक्षक असल्याचे परिणाम १९०–२
भिक्षाचरण, व विद्यार्थी, ४९–५०; केव्हा निषिद्ध, ५१
भोजनव्यवस्था, विद्यार्थ्यांची, ४९–५
मठ-विद्यापीठें, १५३–५; त्यांची अंतर्व्यवस्था, १५२; युरोपांतील, १५४
मध्ययुग, त्यांतील बौद्धिक गुलामगिरी १९४–५; व शिक्षण, १९४–५

मल्कापुरम् विद्यालय, १६०
मार्को पोलो व हिंदु चारित्र्य, १८२-३
मुदतीचा कायदा, १७६
मुसलमानी अंमल, व हिंदु शिक्षण, २००
मेखला १६
मेगॅस्थेनिस व हिंदु चारित्र्य, १८१-२
मेधाजनन संस्कार, २१
यज्ञोपवीत, १६-८
युआन् च्वांग, व हिंदु चारित्र्य, १८२
रघुराजा व स्नातक, १७३
रसायनशास्त्र, १११
रहस्य व्रत, २२
राजधान्या, शिक्षण केंद्रें, १३७
राजे लोक, व विद्वानांचा परामर्श; १७३-६; विशिष्ट उदाहरणें, १७४-५; मोठेपणाचा आंव, १७७; 'सरकार' ही पहा.
राष्ट्रीय भावना, १८९
राहण्याची व्यवस्था, विद्यार्थ्याची, ५०
राहुकेतु व ग्रहणें, १९१-२
रुग्णालयें, १०४-५; व विद्यालयें १५९-६०
ललितकला, व स्त्रिया, १२३, १३३; त्यांचें शिक्षण, १०७
लष्करी शिक्षण, १००-१०१,१०८-११०
लिपिज्ञान, ३-४
ल्यूथर, त्याची शिक्षणविषयक मतें, १९०; व बुद्धिस्वातंत्र्य, १९३
वराहमिहिर व ग्रहणें, १९२; व ग्रीक ज्योतिषी, १९४
वर्ग, त्यातील विद्यार्थ्यांची संख्या; ८२-३
वर्णव्यवस्था,-'जातिभेद' पहा.
वलभि विद्यालय, १५०-१
वार्षिक अधिवेशन, ५७-८
विक्रमशिला मठविद्यालय, १५१-३
विचार स्वातंत्र्य, त्याचें प्रथम आस्तित्व १९०-१,व पुढे अभाव,१९१-२ त्याचे परिणाम, १९१-२; युरोपमध्यें, १९१
विणकाम, ९९; व स्त्रिया, १३५
विद्या, तिजबद्दल आदर, १६५-९
विद्यारंभ संस्कार, २-४
विद्यार्थी, व शिक्षक, ३८-४६; व शिक्षकाचे घरकाम, ४४; व भिक्षाचरण, ४८-५१; व गुरुगृहवास ५४-६, व जेवण्याची व राहण्याची व्यवस्था, ४८-५६; व विवाह, ६३; त्यांची दिनचर्या, ४७; त्यांच्याबद्दल सामान्य नियम, ५१-३
विद्यालयें, आधुनिक पद्धतीचीं, प्रथम नव्हतीं, १३६; कशीं व केव्हा झालीं, १३७
विवाहकाल, २७, १३०; व विद्यार्थिदशा, ६३
विवेचक शक्ति, १८५
वेदवृत्ति, १७१
वेदाभ्यास, व घोकंपट्टी, ७८-९; निरनिराळ्या कालखंडांतील, ६६-९; ७२-३; व क्षत्रियवैश्य, ८९-९२
वैद्य व समाजमान्यता, १०५
वैद्यकशिक्षण, ९७-८, १०१-१०५; व स्त्रिया, १३२
व्यक्तित्वविकसन १८६
व्याकरणाचा अभ्यास, ६९, ७४
व्यापारी शिक्षण, १०७-८
शस्त्रक्रिया शिक्षण, १०२-४
शाळेचा वळ, ४८
शिल्पकला शिक्षण, १०६
शिल्पप्रकार, ७०

शिक्षण, प्रारंभकाल, २–४, १२–३; कोणास द्यावयाचें, ३६–८; कितपत मोफत; ४०–२; गृहस्थाश्रमांतील, ६२–३; खासगी तन्हेने, १३६–७; वैविध्याभाव, १९०
शिक्षणकेंद्रें, त्यांचे प्रकार, १३६–८
शिक्षणक्रम, 'अभ्यासक्रम' पहा
शिक्षणपद्धति, तिचीं ध्येयें, १८०; कितपत साधलीं, १८१–९ ध्येय ऐहिक का पारलौकिक, १८९–९०; तिजवर धर्माचा, हिंदुस्थानांत व युरोपांत पगडा व त्याचे परिणाम, १९०–३; तिजसंबंधीं चर्चेचा अभाव, १७९–८०; तिचा ऱ्हास, १८९–२००
शिक्षण संस्था, १३६
शील, हिंदूंचें, त्याबद्दलची विदेशीयांचीं मतें, १८३–५
शीलसंवर्धन, शिक्षणाचें ध्येय, १८०–३
शूद्र व वेदाध्ययन, ३७
श्रावणी, २२–५
श्रेणि, १०६–७
मत्रें, १७२
समाज, त्याची शिक्षणास मदत, १६९–७३; त्याची शिक्षणाबद्दल आस्था, १६५–९
समावर्तन संस्कार, २६–८
सरकार, व स्नातकांना नोकऱ्या, १५१, १७५; व विद्वानांचा भूमिदानानें व दाक्षिणेनें परामर्श, १७५; व विद्वानांना करमाफी, १७६; व शिक्षण नियंत्रण, १७७
सर्वज्ञपुर विद्यालय, १६३
संघ (Guilds), ९५
संस्कृतचें पुनरुज्जीवन, त्याचे परिणाम, १९८–९
संस्कृतिसंरक्षण, शिक्षणाचें ध्येय, १८७–८
सालोटगी विद्यालय, १५६–७
सावित्री मंत्र, १९–२१
साक्षरता, तिचें प्रमाण, ११४, ११८, १२१–२; स्पार्टा व अथेन्समध्यें, १९८ मध्ययुगीन युरोपांत, १९८
सुट्ट्या, ५८–९
स्त्रिया, त्यांचें शिक्षण, वेदांचें, १२३–४; तत्त्वज्ञानाचें, १२५; वैद्यकाचें, १३२, लष्करी, १३४; बौद्ध धर्मात, १२५; जैन धर्मात, १३३; कुलीन घराण्यांत, १३१; सामान्य घराण्यांत, १३३; राजघराण्यांत, १३४; मुसलमानी कालात, १३३; त्यांचें उपनयन, १२३–५; त्यांच्या मधील साक्षरता, १३४; त्यांचा विवाहकाल १३०–१; त्यांची आर्थिक स्थिति, १३५–६; अध्यापक, १२६; कवी, १३१; मंत्रद्रष्ट्या, १२३, अधिकारी, १३४ ब्रह्मयज्ञांत निर्दिष्ट विदुषी, १२६
स्थापत्यशास्त्रशिक्षण, १०६–७
स्मृतींचा अभ्यास, ७५; त्यांचा मान, १९१–२
स्वदेशाभिमान, १८६
स्वाभिमान, १८४
स्टॅबो व हिंदु चारित्र्य, १८१–२
हरुन खलिफा व हिंदु वैद्य, १०४–५
हिंदु चारित्र्याबद्दल विदेशीयांची मतें, १८१–३
हॉस्पिटल, 'रुग्णालय' पहा.